ईश्क (कादंबरी)




लेखक :अनिकेत समुद्र
Phone no. 9604602448
Email:
aniket.com@gmail.com
ब्लॉग 'डोक्यात भुणभुणणारा मराठी भुंगा'
(http://manaatale.wordpress.com)

# प्रस्तावना

आपलं मन किती विचीत्र असतं नाही का? म्हणतात ना, मनुष्याच्या मनाचा थांगपत्ता अजुनही कुणाला लागला नाही. ते कोणत्या क्षणी कसे वागेल, काय विचार करेल हे कोणीच सांगू शकत नाही.. आणि प्रेमात पडल्यावर तर? तर तर मग प्रेमात सैरभैर झालेले मन म्हणजे जणू 'माकडाच्या हाती कोलीतच..'

कथेचा नायक, कबीर, नुकताच ब्रेक-अप झालेला.. दोन पुस्तकांच्या यशानंतर तिसरे पुस्तक दणकुन आपणार ह्याची खात्री असलेला, कर्जबाजारी होण्याच्या मार्गावर असतानाच एक प्रेम-कथा लेखनाचा प्रस्ताव घेतो. ह्या मार्गात त्याची भेट होते राधाशी.. अतीशय चंचल, स्वच्छंदी, स्वतःच्याच मनाप्रमाणे वागणारी बोल्ड-बेधडक राधा पहाताक्षणी त्याच्या मनाचा ठाव घेते. पण राधाला एक इतिहास असतो.. राधाच्या स्वतःच्या आयुष्याकडुन काही अपेक्षा असतात.. कबीर तिच्याशी आपल्या प्रेमाचा इजहार करण्याआधीच ती त्याच्या आयुष्यातुन निघुन जाते. दुखावलेला कबीर पुन्हा आपल्या गावी परततो. प्रेमासाठी आसुसलेल्या कबीरच्या आयुष्यात रती नावाची छ्यानशी, गोड मुलगी येते. तिच्या सहवासात कबीर राधाला विसरण्याचा प्रयत्न करतच असतो तोच राधा पुन्हा परतते.

कबीर दुवीधेत अडकतो.. रती की राधा?

अतीशय छ्यान आणि हळुवार तसंच मनाला चटका लावणारी ही कथा आहे. गुगल-प्लेस्टोवर वरुन दहा-हजाराहुन अधीक वाचकांनी ही कथा आपल्या मोबाईलवर उतरवुन वाचली. शेकडो लोकांनी प्रतिसाद देऊन कथा आवडल्याचे कळवले. आशा करतो की ही कथा तुम्हालासुध्दा आवडेल, आपलीशी वाटेल.

जरुर वाचा.. इश्क...

हे पुस्तक माझ्या ब्लॉगच्या असंख्य वाचकांना अर्पण

ज्यांनी वेळोवेळी मला प्रतिक्रिया देऊन माझ्या लेखनाचा हुरुप वाढवला.

--- अनिकेत समुद्र

या कादंबरीतील सर्व पात्रे व नावे काल्पनिक असून त्यांचं कोणाही वास्तवातील व्यक्तींशी साम्य आढळल्यास तो निव्वळ योगायोग समजावा.

# इश्क

कोरेगाव पार्कातल्या क्रॉसवर्डच्या बाहेर ‘मिडनाईट-ब्लॅक’ रंगातली फोर्ड-ईको-स्पोर्ट गाडी येऊन थांबली. दार उघडून एक साधारण तिशीच्या आसपासचा एक युवक उतरला. गाडीच्या रंगाशीच सार्धम्य सांगणारा काळा कुळकुळीत सॅटीनचा शर्ट, ग्रे रंगाचं स्पोर्ट्‌र्स जॅकेट, पायात क्रोकोडाईल शुज, बारीक फ्रेमचा चंदेरी चष्मा आणि जेल लावून मागे वळवलेले केस. दाराशीच उभ्या असलेल्या बॉयला व्हॅलेसाठी गाडीची किल्ली देऊन तो क्रॉसवर्डमधील एका कोपऱ्याकडे वळला.

कोपऱ्यात जमलेली ८-१०च लोकं बघून त्या तरूणाच्या चेहऱ्यावरील हास्य किंचीत मावळले.त्याला आलेले बघताच गळयात मोठ्ठालं ओळखपत्र, कानाला ब्ल्यु-टूथ हेड्‌सेट लावून वावरणारा संयोजक टाईप्स एक युवक धावतच दाराकडे आला.

“वेलकम कबीर सर.. प्लिज वेलकम..”, तो संयोजक त्या तरुणाशी हातमिळवणी करत म्हणाला.

“जित.. अरे काय? इतकीच लोकं?”, काहीश्या नाराजीच्या स्वरात कबीर म्हणाला

कबीर, एक नविनच नावारुपाला आलेला लेखक. वर्षभरातच प्रकाशीत झालेली त्याची पहीली दोन पुस्तंक सुपर-हिट ठरली होती. गुन्हेगारी कथांमधील नविन उगवता तारा म्हणून मेहतांचा प्रतिष्ठेचा पुरस्कार त्याने पटकावला होता. पहीले बॅंक-रॉबरी आणि दुसरे किडनॅपींगवर बेतलेली त्याची दोन्ही पुस्तकं हातोहात खपली होती. अनेकांनी ती पुस्तकं एकाच बैठकीत वाचून काढली होती. शेवटच्या क्षणापर्यंत उत्सुकता ताणून धरणाऱ्या त्याच्या कथा उत्सुकतेचा विषय ठरल्या होत्या. त्यामानाने त्याचे तिसरे पुस्तक म्हणावे तसे प्रसिध्द होऊ शकले नाही. आणि आज कबीरचे चौथे पुस्तक प्रकाशीत होत होते.

परंतू प्रकाशनासाठी जमलेली जेमतेम ८-१० लोकं पाहून कबीर काहीसा निराशच झाला होता.

“जित.. इतकीच लोकं?”, कबीर

“आय एम सॉरी सर.. अॅड्व्हरटाईज तर व्यवस्थीत केले होते पण… येतील सर.. अजून येतील लोकं..”, जित उसने अवसान आणून म्हणाला

“एनीबडी फ्रॉम मिडीय़ा?”, कबीर

“नो सर..”, खाली मान घालून जित पुटपुटला..

“ओके! व्हेअर ईज रोहन?”, कबीरने विचारलं.

“येतोय सर तो, सेकंड फ्लोअर-वर आहे, मी इन्फॉर्म केलंय त्यांना तुम्ही आला आहात म्हणून..”, जित म्हणाला

“वेल देन.. शुड वुई प्रोसीड?”, कबीर जॅकेटची बटणं ठिक करत म्हणाला..

“वन सेकंद सर..”, असं म्हणून जितने आपला फोन लावला… आणि म्हणाला.. “कबीर इज मेकींग एन्ट्री, स्पॉटलाईट अॅन्ड क्लॅपींग्ज प्लिज…”

दोन सेकंद थांबुन जितने कबीरला चलण्याची खुण केली. त्याचबरोबर एक मोठ्ठा स्पॉटलाईट कबीरवर येऊन स्थिरावला. पाठोपाठ स्टेजवरच्या निळया साडीतील एका तरूणीने केलेली अनांन्समेट आणि काही मोजक्या टाळयांच्या गजरात कबीर स्टेजवर चढला.

समोरच्या प्रेक्षकांत फारसं कोणी उत्साही दिसत नव्हते. पहील्या रांगेत तर बहुदा दोन चार रिकामे-पेन्शनरच येऊन बसले होते. त्यांना बघून कबीरचे धाबे दणाणलेच. मागच्या प्रकाशनाच्या वेळी अश्याच एका वयस्कर माणसाने कबीरच्या पुस्तकातील अनावश्यक अश्लीलतेबद्दल चार खडे बोल सुनावले होते. आणि ह्यावेळी त्यावरून किंचीतही बोध न घेता

कबीरने ह्याही पुस्तकात नेहमीचे गरम प्रसंग घुसडले होतेच. कपाळावर मोठ्ठ कुंकु लावलेली एक स्त्री, दोन तिशीच्या आसपासचे तरुण आणि ५-६ कॉलेज युवक-युवतींचा ग्रुप.. बस्स…

“थॅंक्यु माय फ्रेंड्स…”, कबीरने माईकचा ताबा घेतला…”मला माहीती आहे, मला थोडा उशीरच झाला यायला.. त्याबद्दल मनापासून दिलगीर आहे. मागच्या माझ्या तिन पुस्तकांना जो तुम्ही भरभरून प्रतिसाद दिलात तसाच ह्या नव्या-कोऱ्या चौथ्या पुस्तकाला मिळेल अशी मी आशा बाळगतो. माझे हे चौथे पुस्तक ‘रोड-ट्रीप’ वर आधारीत आहे. एक कपल आपल्या ॲनीव्हर्सरीनिमीत्त ट्रीपला निघते आणि मग वाटेत काही घटना घडतात. मर्डर, किडनॅपींग, रोमॅन्स सर्व काही ह्या पुस्तकात आहेच…”

कबीर मुक्तपणे आपल्या पुस्तकाची तारीफ करत होता इतक्यात त्याच्या मोबाईलवर एक मेसेज आला.

कबीरने एस.एम.एस उघडला, रोहनचाच होता…

“कबीर.. फार पाल्हाळ लावू नकोस, जमली आहेत ती पण लोकं जातील.. पट्कन उरकून वरती ये, मेहता साहेब तुझी वाट बघत आहेत…”

कबीरने वरती बघीतले, दुसऱ्या मजल्यावरच्या व्हरांड्यात गुटगुटीत, जुन्या काळच्या अजय-देवगणसारखी हेअर-स्टाईल असलेला गोरा-गोमटा रोहन उभा होता. रोहन.. म्हणाल तर कबीरचा जिवाभावाचा मित्र, म्हणाल तर कबीरचा मॅनेजर. त्याचे पब्लीकेशन्स, त्याच्या मिटिंग्स, मिडीआ-कनेश्कन्स सगळं तो एकहाती सांभाळायचा.

त्याने कबीरला पटकन वरती यायची खुण केली आणि तो निघून गेला.

“फ्रेंड्स, फक्त आजच्या दिवसापुरती ह्या पुस्तकावर ३०% डिस्काऊंट आहे, शिवाय.. मी अर्धा तास इथेच आहे, जे कोणी पुस्तक विकत घेतील त्यांना माझी साईन्ड कॉपी मिळेल ह्याची व्यवस्था आहे.. सो गाईज.. हिअर वुई गो…”

निळया साडीतील त्या दुसऱ्या संयोजक युवतीने मरून-रंगाच्या वेस्टनमध्ये गुंडाळलेले पुस्तक कबीरच्या हातात दिले. कबीरने काळजीपुर्वक वेस्टन उघडले आणि आपले पुस्तक उंच धरले.

घेतलेल्या पैश्याला जागण्यासाठी संयोजक मंडळींनी जोरदार टाळया वाजवल्या, बाकी प्रेक्षकांमधून काही मोजके सन्माननीय अपवाद वगळता फारसा कोणी उत्साह दाखवला नाही.

प्रकाशन संपवून कबीर कोपऱ्यातील टेबलावर जाऊन बसला. जित टेबलापाशी येऊन कबीरच्या कानाशी म्हणाला, “सर बुक-रिडींग करणार होतात ना? आय मीन पुस्तकातील काही मोजकी पानं तुम्ही वाचणार असं रोहनने कळवलं होतं.. तसं सांगीतलंय आपण..”

“लुक अराऊंड जित.. कुणाला इंटरेस्ट नाहीये… अर्धी लोकं उठून गेली सुध्दा.. लेट्स कॅन्सल इट..”, कबीर म्हणाला

“ओके सर.. “, असं म्हणून जित तेथून निघून गेला

अख्या गर्दीतील (!) फक्त दोन तरुणींना एक पुस्तक खरेदी करताना कबीरने पाहीले. त्या दोघीही स्वताच्या गप्पांमध्येच मग्न होत्या. बोलत बोलतच त्यांनी पुस्तक कबीरच्या टेबलावर ठेवले. कबीरने काही बोलण्यासाठी तोंड उघडले पण त्यांचे त्याच्याकडे लक्षच नव्हते. कबीरने गुमान सही ठोकली, तसे ते पुस्तक घेऊन दोघी निघून गेल्या.

कबीरने मोबाईल काढुन रोहनला फोन लावला.

“हॅलो.. रोहन.. अरे काय हे.. कसला थंडा रिस्पॉन्स… फक्त एकच पुस्तक विकलं गेलं..”, कबीर

“ते सोड.. तू वरती ये आधी.. मेहता सर थांबलेत..”, रोहन

“अरे पण.. मी सांगीतलं होतं ना त्यांना, त्यांची ऑफर मी आत्ता घेऊ शकत नाही म्हणून…”, कबीर..

“हे बघ कबीर.. चिडू नकोस, पण आपलं तिसरं पुस्तक फारसं चाललं नाही.. आणि चौथ्याकडूनही मला फारश्या आशा नाहीत..”, रोहन

“अरे पण का? पहीली दोन पुस्तक किती मस्त प्रॉफीट देऊन गेली..” “का? अरे एका तिसऱ्या माणसाच्या नजरेतून तू तुझं पुस्तक वाचं. पुर्ण टाईप-कास्ट झाला

आहेस तु. तेच खुन, त्याच मारामाऱ्या, संधीसाधू बाई, माफीया, एखादा गरीब बेचारा परीस्थीती-का-मारा क्लर्क/मॅनेजर, प्रेडीक्टेबल झालंय अरे.. हे पुस्तक नाही गेलं विकलं तर तुला माहीती आहे का, आपल्याला केवढा मोठ्ठा लॉस होणारे..??"

"हो.. पण ते नंतर बघु ना, आत्ता त्या मेहताला घालवून दे..." "हे बघ कबीर.. अर्धा तास झाला, त्यांच्यासारखा मोठ्ठा माणुस तुझी वाट बघत थांबलाय, निदान त्याची कदर म्हणून तरी तू भेट."

"पण यार, मला लव्ह-स्टोरी लिहीण्यात काडीचाही इंटरेस्ट नाहीये.. माझा जॉनरच नाहीये तो.."

"हे सगळं आपण समोरा-समोर बसून नाही का बोलु शकत?.. तू वरती ये आधी.." असं म्हणून रोहनने फोन बंद केला.

एव्हाना समोरची गर्दी पांगली होती. संयोजकांनीही फारसा पेशन्स नं दाखवता आवरा-आवरीला सुरुवात केली होती.

कबीरने एक दीर्घ श्वास घेतला आणि तो क्रॉसवर्डच्या दुसऱ्या मजल्यावर गेला.

समोरच्याच सोफ्यावर साधारणपणे साठीच्या आसपासचे, चंदेरी केस असलेले एक गृहस्थ बसले होते. रोहन त्यांच्याच शेजारी बसला होता.

कबीरला येताना पहाताच ते गृहस्थ, मेहता, उठून उभे राहीले..

"वेलकम यंग मॅन.. वेलकम.. ग्रिटींज्स फ्रॉम मेहना-एन-मेहता पब्लीकेश्नस ऑन युअर न्यु बुक.."

"थॅंक्स अ लॉट सर...", कबीर त्यांच्याशी हात मिळवत म्हणाला.. "प्लिज बसा ना सर.. "

दोघंही सोफ्यावर बसले…

“कॉफी?”, रोहनने विचारलं…

“नो.. थँक्स रोहन.. बसं..”, कबीर म्हणाला, “बोला मेहता सर, काय काम काढलंत?”

“काम वेगळं काहीच नाही”, कोटाची बटणं काढुन रिलॅक्स होत मेहता म्हणाले, “तेच, जे मागे आपण बोललो होतो…” असं म्हणून त्यांनी कोटाच्या खिश्यातून एक पांढरे एन्व्हलोप काढुन कबीरला दिले

“काय आहे हे..?”, कबीरने प्रश्नार्थक नजरेने मेहतांना विचारले. “सि इट युअरसेल्फ..”, मेहता

कबीरने ते पाकीट उघडले, आतमध्ये त्याचं नाव घातलेला एक लाख रुपायाचा चेक होता.

“अ‍ॅडव्हॅन्स आहे, बाकीच्या टर्म्स मी रोहनशी बोललो आहे.. तो सांगेल सगळं…”

“पण सर, लव्ह-स्टोरी.. मला नाही जमायची.. आणि त्यात माझी पर्सनल लाईफ..”

“हो.. मला रोहनने सांगीतलं सगळं.. पण मला वाटतं, तुम्ही नक्की लिहु शकाल. तुमची लेखन शैली मला खुप आवडली. मला वाटतं तुम्हाला सुध्दा एका हिटची गरज आहे…”

“मी.. मी थोडं विचार करून सांगतो मेहता सर..”, कबीर म्हणाला “मला आत्ता कमीटमेंट हवीय कबीर. मी खुप दिवस थांबलो. येस… ऑर नो…”, मेहता निर्वाणीच्या सुरात म्हणाले..

“टेक ए ब्रेक कबीर.. कुठल्या तरी दुसऱ्या गावी जा, जिथे तू फक्त तू असशील, सगळयांपासून दूर… तुझ्या इथल्या पर्सनल प्रॉब्लेम्सपासून दूर.. कदाचित तुझी लव्ह-स्टोरी तुला तिकडे सापडेल.. मेहता इज रेडी टु स्पॉन्सर युअर ट्रीप”, रोहन म्हणाला

“ओके हिअर इज अ डिल..”, कबीर म्हणाला.. “आय विल गिव्ह-इट-अ-ट्राय… से ३ आठवडे, पण त्यामध्ये काहीच कंस्ट्रक्टीव्ह नाही झालं तर वुई-विल कॅन्सल धिस डिल.. आणि मी हा चेक रिटर्न करेन, एक्स्पेट द टुर एक्स्पेन्सेस.. मेहता विल बेअर दोज.. ओके?”,

“डील..”, काही क्षण विचार करून मेहता म्हणाले

“ग्रेट देन… बुक मी ए व्हिला इन माथेरान.. पुर्ण शांतता आहे तेथे..”, कबीर म्हणाला..

“माथेरान? अरे तुला लव्ह-स्टोरी लिहायची आहे, मेडीटेशनवर बुक नाही..”, हसत हसत मेहता म्हणाले, “माथेरान किती अंधारलेले, बंद-बंद गाव आहे.. यु निड टु गो टु सम लाईव्हली प्लेस.. कलरफुल.. फुल्ल ऑफ युथ प्लेस.. यु आर गोईंग टु गोवा.. उद्या सकाळपर्यंत मी प्लेन टिकीट्स आणि हॉटेल बुकिंग डिटेल्स रोहनला मेल करतो..ओके?” मेहता सोफ्यावरून उठत म्हणाले…

“थॅंक्यु सो मच सर..”, रोहन आणि कबीर मेहतांना म्हणाले…

“फॉल इन लव्ह यंग मॅन.. ॲन्ड मेक अस फॉल इन लव्ह विथ युअर स्टोरी…”, कबीरच्या खांद्यावर दोन बोटं वाजवत मेहता म्हणाले आणि मागे वळून निघून गेले…

“वन लॅक्स?”, कबीर डोळे उडवत रोहनला म्हणाला..

“मग ! सांगत होतो तुला.. अरे हा तर ॲडव्हान्स आहे.. चल कॉफी घेऊ आधी.. मी तुला बाकीचे डिटेल्स ब्रिफ करतो..”, रोहन म्हणाला..

दोघं जण क्रॉसवर्डच्या कॉफी कॉर्नरकडे निघाले.

कबीर गोवा एअरपोर्टच्या बाहेर आला आणि समुद्राचा खारा, दमट वारा त्याच्या नाकात शिरला. कबीरने डोळे बंद करून तो वारा शरीराच्या नसा-नसांत भरून घेतला. शहरांतला तो पेट्रोलचा, पोल्युशन्सचा, कचऱ्याचा, कोंदलेल्या श्वासांचा, गल्लोगल्ली उभारलेल्या हातगड्यांवरील खाद्यपदार्थांचा.. सर्वा-सर्वांपेक्षा वेगळा…

काही क्षणच कबीर त्या स्वर्गीय अनुभुतीत होता. त्याची तंद्री भंगली ती टुरीस्ट-टॅक्सीवाल्यांच्या आवाजांनी.

“पणजीम..पणजीम.. म्हाप्सा.. म्हाप्सा..” च्या आवाजांनी परीसर गजबजून गेला.

कबीरने एक दीर्घ श्वास घेतला, आपली ट्रॉली बॅग ओढली आणि तो टॅक्सीत जाऊन बसला.

“सर, फर्स्ट टाईम गोवा?”, ड्रायव्हरने टॅक्सीच्या आरश्यात कबीरकडे बघत विचारलं. कबीर स्वतःशीच हसला आणि मानेनेच त्याने नाहीची खुण केली.

कबीरला त्याची शेवटची, सहा महीन्यांपुर्वीची गोवा-ट्रीप चांगलीच लक्षात होती. त्याच्या चार मित्र-मैत्रीणींबरोबर तो गोव्याला आला होता..त्यापैकी एक होती मोना.. मोना, अर्थात मोनिका, कबीरची गर्लफ्रेंड.. तेंव्हाची. एक महीन्यापुर्वीच कबीर आणि मोनिकाचं ब्रेक-अप झालं होतं.

मोनिका, एकदम स्मार्ट, आऊटगोईंग, व्यवसायाने एक प्रो-फोटोग्राफर, तर कबीर मात्र काहीसा एकलकोंडा, स्वमग्न, स्वतःच्या आणि पुस्तकांतील पात्रांच्या सहवासात रमणारा.

पुस्तकाच्या कव्हरपेजच्या फोटोशुटच्या वेळी कबीर आणि मोनाची भेट झाली. म्हणतात ना, 'ऑपोझिट ॲट्रॅक्ट्स' त्याप्रमाणे कबीर आणि मोना एकमेकांकडे ओढले गेले. मोनिका सतत बडबड, तर कबीर कानसेन. तिची दिवसभराची बडबड तो आवडीने ऐकायचा. तिचे क्लायंट्स, फोटोशुट्सच्या गमतीजमती, फोटोग्राफीतील गिमिक्स ती सांगायची, तो ऐकायचा. दोघांचं चांगलं जमायचं. दिसायला सुध्दा दोघंही एकमेकांना अनुरुप होते. पण सतत शांतच असणाऱ्या कबीरचा काही दिवसांनी मोनिकाला कंटाळा यायला लागला. बोलून बोलून सर्व विषय संपले तसे दोघांमधील संवाद कमी होऊ लागला. फोटोग्राफीला लाभलेल्या ग्लॅमरमुळे बाकीही अनेक स्मार्ट-डॅशींग लोकांशी मोनिकाच्या नविन ओळखी होत होत्या, त्यांच्यापुढे तिला कबीर खुपच लो-प्रोफ़ाईल वाटायला लागला. आणि मग दोघांमध्ये बारीक-बारीक गोष्टींवरून कुरबुरी सुरु झाल्या. महीन्याभरातच दोघांमधली भांडणं विकोपाला गेली आणि दोघांमध्ये कायमचे ब्रेक-अप झाले.

मोनिका त्या ग्लॅमरस जगात सहज मिसळून गेली, पण आधीच एकलकोंडा असलेला कबीर मात्र अजूनच स्वतःमध्ये गुरफटत गेला. कदाचित हे सुध्दा एक कारण असेल की कबीरचं तिसरं पुस्तक म्हणावं तितकं प्रसिध्द होऊ शकलं नाही.

कबीरने मोबाईलची फोटो-गॅलरी उघडली आणि मोनिकाचे फोटो बघण्यात तो गुंग होऊन गेला.

"सर, गोवाऩ इंटरनॅशनल, तुमचं हॉटेल आलं..", ड्रायव्हर कबीरला म्हणाला.. कबीरने मोबाईलमधून आपलं डोकं काढलं आणि त्याने टॅक्सीच्या खिडकीतून बाहेर बघीतलं. समोर अवाढव्य पसरलेले 'गोवाऩ इंटरनॅशनल' हॉटेल उभे होते. आवारात वेगवेगळया रंगाचे

झेंडे वाऱ्याबरोबर फडफडत होते. विस्तीर्ण लॅन्ड्स्केपमध्ये तऱ्हेतऱ्हेची झाडं, फुलं डौलाने डुलत होती. ट्रॅडीशनल ड्रेसेसमध्ये दरबान आपल्या झुपकेदार मिश्या सांभाळत उभे होते.

कबीरने मिटर पे केला आणि तो हॉटेलच्या लॉबीमध्ये गेला. पाठोपाठ ड्रायव्हर त्याचे लगेज घेऊन आतमध्ये आला.

"गुड-इव्हनिंग सर, हाऊ मे आय हेल्प यु?", मेकॅनिकल आवाजात रिसेप्शनिस्टने कबीरला विचारलं.

"आय हॅव्ह अ बुकिंग, कबीर द नेम..", नाकावर घसरणारा चष्मा पुन्हा सरळ करत कबीर म्हणाला..

"जस्ट अ सेकंद सर..", असं म्हणून त्या रिसेप्शनिस्टने आपली लांबसडक बोटं संगणकाच्या किबोर्डवर फिरवायला सुरुवात केली.

काही क्षण गेल्यावर तिने कबीरकडे पाहीलं आणि म्हणाली, "जस्ट ए मोमेंट सर", आणि ती मॅनेजरच्या केबीनमध्ये गेली.

कबीर चलबिचल करत तेथेच उभा राहीला. दीड-तासाची का असेना, फ्लाईटच्या प्रवासाने त्याला थकवा आला होता. मस्त हॉट-टब बाथ घेण्याची स्वप्न रंगवत तो उभा होता.

थोड्याच वेळात रिसेप्शनिस्ट आणि पाठोपाठ एक सुटाबुटातला माणुस बाहेर आला. त्रासिक नजरेने त्याने संगणकावर नजर फिरवली.

"चेक फॉर द सुट्स..", मॅनेजर म्हणाला

"आय हॅव ऑलरेडी सर.. उद्या सकाळी एक व्हेकंट होईल, आत्ता तरी..."

"एनी प्रॉब्लेम?", कबीरने त्या रिसेप्शनिस्टला विचारलं.

"सर.. द रुम दॅट वॉज ॲलोकेटेड टु यु इज हॅविंग सम प्लंबिंग प्रॉब्लेम..., बाथरुम इज नॉट वर्कींग ॲन्ड रुम इज फिल्ड विथ वॉटर..", चेहरा पाडत रिसेप्शनिस्ट म्हणाली

"ओह, दॅट्स ओके, गिव्ह मी अनदर रुम, आय विल पे एक्स्ट्रा..", खिश्यातून पाकीट काढत कबीर म्हणाला..

"यु डोन्ट हॅव टु पे सर, प्रॉब्लेम इज फ्रॉम अवर साईड, वुई विल अपग्रेड यु टु सुट्स विदाऊट एनी एक्स्ट्रा चार्ज.. बट..", रिसेप्शनिस्ट

"बट? बट व्हॉट.."

"सर.. सुट्स सगळे फुल्ल आहेत, इन्फॅक्ट ऑल रुम्स आर ऑक्युपाईड, सुट कॅन बी ॲरेंज्न्ड टुमारो मॉर्निंग ओन्ली..", मॅनेजर..

"सो.. आय मीन.. मग मी आत्ता काय करु?, संध्याकाळचे ८.३० होतं आलेत..", कबीर आवाज चढवून म्हणाला..

"आय एम सॉरी सर, बट द प्रॉब्लेम इज बियॉन्ड अवर कंट्रोल..", मॅनेजर

"अरे पण मग मी काय करु तोपर्यंत? गिव्ह मी बुकिंग इन सम अदर हॉटेल्स देन.."

"सॉरी सर, पण आमचं कुठल्या हॉटेलबरोबर टाय-अप नाहीए..", मॅनेजर..

"धिस इज रिडीक्युलस...ॲन्ड अनप्रोफ़ेशनल.. आय वॉन्ट टु कॅन्सल माय बुकिंग इमीडीयटली.. प्लिज रिटर्न द अमाऊंट पेड..", कबीर

"वुई अंडरस्टॅन्ड युअर कन्सर्न सर.. बट..."

"नो यु डोन्ट अंडरस्टॅन्ड, माझं बुकिंग रद्द करा लगेच..", कबीर काऊंटरवर हात आपटत म्हणाला

“ओके सर.. प्लिज बी सिटेड..”, रिसेप्शनिस्ट लॉबितल्या सोफ्याकडे हात दाखवत म्हणाली.

कबीरचे डोकं संतापाने भडकले होते, एव्हढं ‘इंटरनॅशनल’ नाव दिलंय हॉटेलला आणि साधे प्लंबींगचे प्रॉब्लेम्स सॉल्व्ह होत नाहीत म्हणजे काय. तो जवळच उभा असलेल्या ड्रायव्हरकडे वळला.

“लगेज टॅक्सीमे रखो, हम दुसरा हॉटेल चलेंगे..”, कबीर म्हणाला..
“का सर? काय झालं?”, ड्रायव्हर

कबीरने झालेला किस्सा त्याला सांगीतला…

“सर, बुकिंग कॅन्सल मत करो.. चाहीए तो आज की रात के लिए कही रह लो.. अभी सिझन है तो बुकिंग मिलना मुश्कील है बाकी जगह..”

“अरे काय.. उलट ऑफ सिझन आहे.. दिवाळीचा सीझन तर संपला.. कुठेतरी मिळेलच ना..”, कबीर

“सर, आजकाल वर्षभर फुल्ल गर्दी असते गोव्यात.. आणि ख्रिसमस तोंडावर आहे”

“सर.. युअर रिफंड..”, दोघांचं बोलणं चालु होतं तेंव्हा रिसेप्शनिस्ट एक पांढर पाकीट पुढे करत म्हणाली..

कबीर तणतणत काऊंटरवर गेला आणि त्याने ते पाकीट घेतले आणि तसाच माघारी फिरला.

पुढचा दिड तास कबीर टॅक्सीमधून फिरत होता, परंतू ड्रायव्हर म्हणाला तसे खरोखरच हॉटेल्स फुल्ल होते.

कबीरने घड्याळात नजर टाकली, एव्हाना साडे-दहा वाजत आले होते.

“ड्रायव्हर.. कोई छोटा हॉटेल है तो देखो रात के लिए, कल सुबह ढुडेंगे अब, थक गया हु मै..”, वैतागून कबीर म्हणाला

“जी सर, मेरे एक पैचानवाला है, देखता हु..”, ड्रायव्हरने आपल्या एका मित्राला फोन लावला.. दोन मिनिट बोलल्यावर तो कबीरला म्हणाला, “चलिए सर, कल शामतक एक रुम मिल जाएगा”

कबीरच्या परवानगीची वाट न बघताच ड्रायव्हरने टॅक्सी वळवली.

अर्ध्या तासानंतर टॅक्सी थोडी गावाच्या बाहेरच आली होती. सर्वत्र बऱ्यापैकी शांतता आणि अंधार होता. छोट्या मोठ्या गल्लींमधून फिरल्यानंतर टॅक्सी एका निळसर जुनाट इमारतीपाशी येऊन थांबली. मळकट झालेल्या ट्युबलाईट्सचा पिवळट-अंधुक प्रकाश रस्त्यावर पसरला होता. आजुबाजुला सामसुमच होती. इमारतीच्या खाली एक छोटेसे मेडिकल-शॉप चालु होते.

कबीरने प्रश्नार्थक नजरेने ड्रायव्हरकडे बघीतले.

“कल शाम तक साब..दुसरा अब नही मिलेगा.. सुबह दुसरा ढुंड लेना…”, ड्रायव्हर म्हणाला

“नसिब ही खराब है साला..”, कबीरने लाथेनेच दार उघडले, परंतू ते इतक्या जोरात उघडले गेले की ज्या वेगाने ते उघडले होते त्याच वेगाने ते पुन्हा कबीरवर आदळले.

कबीर टॅक्सीतून उतरतच होता, तोच ते दार येऊन कबीरच्या डोक्यावर आपटले.

कबीर डोकं धरून खाली बसला…

“सर.. आप ठिक तो हो..”, खाली पडणाऱ्या कबीरला सावरत ड्रायव्हर म्हणाला.

कबीरच्या डोक्याला हलकीशी जखम झाली होती.

“सर.. खुन निकल आया है थोडा, रुको मै मेडिकलसे पट्टी लेता हु..”, ड्रायव्हर म्हणाला..

“रहने दो.. मै ठिक हु.. लेता हु मै.. मिटर कितना हुआ?”, कबीर डोक चोळत म्हणाला…

कबीरने टॅक्सीचे बिल भरले तसा टॅक्सीवाला तेथून निघून गेला.

कबीरने आपली बॅग उचलली आणि तो जिने चढुन हॉटेलमध्ये गेला. दारातच लॉबीवजा छोट्याश्या कोपऱ्यात मोडकळीस आलेल्या टेबलावर एक पोऱ्या बसला होता. कबीरला बघताच तो बाहेर आला.

“रुम नै है साब..”, कबीरला तो म्हणाला..

“अरे.. अभी वो टॅक्सीवालेने फोन करके बोला था ना?”

“कौन? हेन्रीने भेजा क्या आपको.. हा.. आओ साब..”, त्या पोऱ्याने कबीरची सुटकेस घेतली आणि तो हॉटेलमध्ये गेला

एका क्षणासाठी अडकलेला श्वास सोडत कबीर त्या पोऱ्याच्या मागोमाग हॉटेलमध्ये शिरला

हॉटेलचे अंतरंग सुध्दा बरेचसे जुनाटच होते, नावापुरते असलेले फर्नीचर सुध्दा जुने, मोडकळीस आलेले होते.

त्या पोऱ्याने कबीरला त्याची रुम दाखवली आणि तो परत निघून गेला.

कबीर चरफडत रुममध्ये शिरला, आपली बॅग कोपऱ्यात ढकलली आणि बाथरुममधल्या आरश्यासमोर जाऊन उभा राहीला.

कपाळावर बारीकसे खरचटले होते आणि टेंगुळ आल्यासारखे सुजून कपाळाचा तो भाग काळानिळा पडला होता. कपाळाला काहीतरी लावणे गरजेचे होतेच, पण एक पेन-किलर पण आवश्यक होती, नाहीतर रात्री झोपेचे खोबरे नक्की होते.

कबीरने खोलीचे दार ओढून घेतले आणि तो खालच्या मजल्यावर असलेल्या मेडिकल-शॉप मध्ये गेला.

मख्ख चेहऱ्याचा, साठीकडे झुकलेला एक गृहस्थ दुकानाची आवरा-आवर करत होता. कबीरला येताना पाहून त्याने कपाळावर आठ्या चढवल्या.

“एक बैन्डेड देता का?”, कपाळावरील जखमेकडे बोट दाखवत कबीर म्हणाला, “आणि एक पेन किलर पण द्या, डोकं दुखीवर”

त्याने ड्रोवर मधून बैन्डेड आणि दोन गोळया काढून कबीरकडे दिल्या. कबीर तिथल्याच एका बाकावर बसून बैन्डेड कपाळावर लावतच होता इतक्यात एक मुलगी दुकानात घुसली. निळया रंगाने रंगवलेले केस, पांढरा टी -शर्ट आणि त्यावर मळलेले जीन्सचे जैकेट, पांढरट पडलेली निळया रंगाची जीन्सची शॉर्ट, हातात रंगेबिरंगी डझनभर बांगड्या आणि पाठीला एक छोटी सैक. ओठांवर भडक लाल रंगाची लिपस्टिक होती, गडद काळया रंगाचे आय-लायनर आणि पापण्यांवर हलक्या गुलाबी रंगाचे शेडींग.

तोंडावर हात दाबतच ती दुकानात शिरली.

“काय पाहिजे?”, दुकानदार म्हणाला

“मळमळतय , पटकन गोळी द्या…”

दुकानदाराने ड्रावर मधून एक गोळी काढून तिच्या हातात दिली

“हि नको, काल घेतली होती मी, पण आज परत मळमळतय”, ती तरुणी तोंड दाबत म्हणाली

दुकानदाराने ती गोळी परत घेतली आणि दुसरी दिली.

“हि पण नको, सकाळी घेतली होती, अजून दुसरी आहे कुठली?”, ती तरुणी म्हणाली

“नक्की काय होतंय तुम्हाला?”, दुकानदाराने वैतागून विचारलं.

“खूपच मळमळतय, डोकं जड झालंय, अंग दुखतंय... चक्कर करतेय कालपासून..”, ती तरुणी बोलत होती.

त्या दुकानदाराने एकदा कबीरकडे पाहिले आणि त्या तरुणीला जवळ बोलावून तिच्या कानात हळूच म्हणाला, “पिरिएड मिस झालेत का?”

“एक्स्क्युज मी?”, ती तरुणी काहीशी संतापून म्हणाली, पण तिच्या चेहऱ्यावर किंचितशी भीतीची एक लकेर पसरून गेली. तिने भीतीने एक आवंढा गिळला.

दुकानदाराने मागच्या कपाटातून एक खोकं काढून तिच्याकडे दिले आणि म्हणाला, “मागे बाथरूम आहे, प्रेग्नंसी चेक करा..”

त्या तरुणीने ते खोकं कबीरला दिसु नये म्हणून पट्कन हिसकाऊन घेतलं आणि दुकानदाराने दर्शवलेल्या दरवाज्याकडे पळाली.

“हम्म.. तुम्हाला काय हवंय अजून?”, दुकानदाराने कबीरला विचारलं.

“नाही, काही नाही..”, कबीर

“मग, निघा की आता..”

“नाही ते.. त्यांच काय होतंय बघितलं असत तर..”

"कश्याला नसत्या चौकश्या तुम्हाला? निघा.."

"हो.. निघतो..", असं म्हणून कबीर उठून निघतंच होता, तोच ती तरुणी परत धावत धावत आली, हातातलं खोकं तिने काऊंटरवर ठेवलं आणि पळत दुकानाच्या बाहेर गेली.

दुकानदारही तिच्या मागोमाग गेला. रस्त्याच्या कोपऱ्यावर ती तरुणी उलट्या करत होती.कबीरने पट्कन टेबलावर पडलेले ते प्रेग्नंन्सी किट उघडून बघीतले.. रिझल्ट निगेटीव्ह होता.

कबीरने ते किट परत टेबलावर ठेवले आणि तो दुकानाच्या बाहेर पडला. त्याने एकवार त्या तरुणीकडे बघीतले. झाडाला टेकून ती उभी होती. कबीरने रुमकडे जायला जिना चढायला सुरुवात केली. चार-पाच पायऱ्याच चढला असेल तोच दुकानदाराने त्याला हाक मारलेली ऐकू आले.

"ओ.. इकडे या पट्कन..", तो दुकानदार कबीरला हाक मारत होता. मगाशी झाडाला टेकून उभी असलेली ती तरुणी एव्हाना जमीनीवर कोसळली होती.

कबीर धावत धावतच त्यांच्याकडे गेला.

"काय झालं?"

"चक्कर येऊन पडल्यात ह्या…"

"अरे बापरे.. दवाखान्यात फोन करा पट्कन.."

"इथं कुठं आला दवाखाना.. २०-२५ किमी वर जवळपास काही नाही इथं.."

"मग? आता काय करायचं?"

"तुम्ही वरती हॉटेलमध्येच रहाताय ना?"

“हो..”

“मग एक काम करा, हिला घेऊन जा वरती, मला वाटतं अशक्तपणामुळे चक्कर येऊन पडल्यात.. १५-२० मिनीटांत येतील शुध्दीवर..”

“अहो काही तरी काय? मी ओळखत पण नाही हिला..”, कबीर वैतागून म्हणाला. “१० मिनिटांचा प्रश्न आहे.. येतील त्या शुद्धीवर”, दुकानदार समजावत म्हणाला, “मला आधीच उशीर झालाय, शेवटची बस गेली तर घरी जायचा प्रश्न होईल.. नाही तर मी थांबलो असतो इथं..”

“नाही नाही, मला नाही जमायचं ते.. तिचा अवतार बघा.. कॉल-गर्ल वगैरे वाटतेय, मी नाही न्हेणार तिला हॉटेलवर…”, कबीर निर्धाराने म्हणाला

“राहु द्या मग हिला इथंच.., शुध्दीवर येईल तेंव्हा जाईल..”, दुकानदार त्या तरुणीला तेथेच ठेवून दुकानाकडे जाऊ लागला

“अहो पण.. असं रात्री हिला इथं रस्त्यावर सोडायचं म्हणजे…”, कबीर

“मग तेच तर म्हणतोय मी… तुम्हीच ऐकेना..”, दुकानदार नव्या जोमाने म्हणाला….

“बरं बर.. धरायला मदत करा तिला, जिन्यावरून एकट्याला नाही न्हेता यायचं मला..”

“कोण बघतंय तुम्हाला इथं.. उलट गोव्यात तुमच्याबरोबर कोणी नसंल तर लोकं बघतील… घ्या उचला हिला..”, असं म्हणून दुकानदाराने त्या तरुणीला उभं केलं

कबीर आणि त्या दुकानदारानं तिला कसंबसं उचललं आणि जिन्यावरून कसरत करत करत कबीर तिला आपल्या हॉटेलच्या रुममध्ये घेऊन आला.

त्या तरुणीला सोफ्यावर ढकलून तो दुकानवाला निघून गेला.

कबीरचं डोकं सॉल्लीड ठणकत होतं, त्यातच त्या तरुणीला जिना चढवून आणल्याने त्याला सॉल्लीड धाप लागली होती. डोक्याला हात लावून तो खुर्चीत बसतच होता तोच त्याचा फोन खणखणु लागला. चार शिव्या हासडत त्याने फोन उचलला..

“कबीर सर.. रोहन बोलतोय…, काय म्हणतंय गोवा…”

धाप लागल्याने कबीरला निट बोलताच येत नव्हते.. “ठिक.. ठिके.. ठिके गोवा…”

“अरे काय रे? काय झालं?”, रोहनने काळजीच्या सुरात विचारलं..”अश्या धापा का टाकतोयेस…? एव्हरीथिंग ऑलराईटना?”

“एक मिनीटं थांब, मी जरा पाणी पितो आणि मग बोलतो ओके?”, कबीर..

“ओके.. ओके, मी होल्ड करतो..”, रोहन म्हणाला

टेबलावरचा पाण्याचा जग कबीरने तोंडाला लावला, गटागटा पाणी प्यायल्यावर त्याला थोडी हुशारी आली..

हनुवटीवर ओघळलेले पाणी हाताने पुसत त्याने परत फोन कानाला लावला..”हं..बोल..”

“काय झालं.. सगळं ठिक आहे ना? हॉटेल मस्त आहे कि नै..”, रोहन

“तोंड उघडायला लावु नको माझं त्या हॉटेलचं नाव काढुन..”, कबीर संतापाच्या स्वरात म्हणाला…

“म्हणजे..?”

“सांगतो.. सगळं सांगतो..”, असं म्हणून गोव्याला आल्यापासून ते त्या तरुणीला खोलीमध्ये आणेपर्यंतचा सगळा वृत्तांत त्याने रोहनला ऐकवला..

“च मायला.., म्हणजे ती तरुणी आत्ता तुझ्या रुम मध्ये आहे?”, रोहन

“हो ना.. अरे तो म्हातारा ऐकायलाच तयार नाही.. आणि तिला असं रस्त्यावर एकटीला सोडून येणं…”

“ते ठिके रे.. पण.. कशी आहे दिसायला.. म्हणजे..”

“सोड ते.. मला तर कॉल गर्ल वाटतेय.. नकोच ती ब्याद.. शुध्दीवर आली की लगेच देतो घालवुन..”

“लेका.. नशिबाने संधी दिलीय.. घाई करु नकोस.. मी काय म्हणतो..”

“ओह् शिट्ट..”, कबीर अचानक किंचाळलाच…

“काय रे.. काय झालं असं ओरडायला..”, रोहन

“अब्बे.. काही तरी झोल आहे.. तिचे केस…”, कबीर खुर्चीवरून हळुच उठत म्हणाला…

“काय झालं तिच्या केसांना?”,

एव्हाना कबीर त्या तरुणीच्या जवळ गेला होता…

“अबे खोटे आहेत ते केस..”

“कश्यावरून..”, रोहनची उत्सुकता ताणली गेली होती..

“अरे कश्यावरून काय.. ते निळसर केस एका बाजुने निघाल्यासारखे वाटताएत..आणि…”

“अरे असा थांबु नको.. आणि काय…?”

“आईच्या गावात रोहन.. गळयात मंगळसुत्र आहे.. पायात जोडवी… च्यायला मॅरीड आहे कोण तरी..”, कबीर

“कबीर, मला वाटतं घरातून पळून वगैरे आलेली केस आहे.. कोणी ओळखु नये म्हणून हा असला गेट-अप केला असेल..”

“असेल रे.. मला पण तसंच वाटतंय..”, कबीर

“कबीर, मला वाटतं, तुला तुझी स्टोरी सापडली.. स्टे विथ हर… बघ काय झोल आहे..”, रोहन

“ए प्लिज.. असला फालतू पणा मला जमणार नाही, आणि मला ‘दिल है के मानता नही’, ‘जब वुई मेट’ वगैरेंसारखी कथा तर बिलकुल लिहायची नाहीए..”, कबीर भडकून म्हणाला..

“कबीर.. एक काम कर.. तिची पर्स उघड.. बघ लायसन्स वगैरे काही आहे का? तिचं नाव, गाव, पत्ता वगैरे कळेल तरी..”, रोहन
“गुड आयडीआ.. होल्ड कर…”

फोन कान आणि खांद्याच्या मध्ये अडकवून कबीर सावकाश त्या तरुणीपाशी गेला.. तिची पर्स सोफ्याच्या खालीच पडली होती. कबीरने ती पर्स अलगद उघडली आणि तो आतमध्ये लायसन्स शोधू लागला. त्याचवेळी ती तरुणी अचानक उठून बसली. कबीर फोनवर बोलत असतानाच ती तरुणी शुध्दीवर येत असलेली कबीरला दिसलेले नव्हते.

थाड्कन तिन कबीरच्या हातातली पर्स हिसकावून घेतली. कबीर काही बोलणार ह्याच्या आतच त्या तरुणीने पर्समधून एक स्प्रे-सदृश्य बाटली बाहेर काढली आणि कबीरच्या डोळयात फवारली.

लक्षावधी मुंग्या डोळयाला चावाव्यात तश्या वेदना कबीरला झाल्या आणि तो किंचाळत मागे सरकला. त्या तरुणीने त्याला जोरात भिंतीवर ढकलले आणि पर्स उचलून तिने खोलीच्या बाहेर पळ काढला.

बेसावध कबीरचे भिंतीवर जोरात डोकं आपटलं आणि त्याची शुध्द हरपली..

नक्की काय घडतंय ह्याचा अंदाज नसलेल्या रोहनचा फोनवर "हॅलो.. हॅलो कबीर.. आर यु ओके?.. कबीर.. काय झालं कबीर.." एव्हढाच आवाज त्या शांत खोलीमध्ये ऐकू येत होता.

*"कबीर, अरे बोल काहीतरी, असा मख्खा सारखा नको बसून राहुस नुसता…", मोनिका कबीरला म्हणत होती*

*"मग काय करु म्हणतेस? तुझ्यासारखा आक्रस्ताळेपणा करु?", कबीर..*

*"आक्रस्ताळेपणा? कबीर मी जस्ट बोलतेय तुझ्याशी..", मोनिका*

*"इट्स वन ॲन्ड द सेम..", कबीर*

*"कबीर प्लिज.. खरं सांग काय प्रॉब्लेम आहे तुझा? का वागतो आहेस असा तु? माझं काही चुकलं असेल तर तसं सांग… गप्प राहून प्रश्न सुटणार नाहीएत कबीर.."*

*"खरं आहे मोना, गप्प राहून प्रश्न सुटणार नाहीत.. पण मला प्रश्न सोडवायचेच नाहीएत. माझं काही चुकलं असेलच तर, मी इतके दिवस गप्प राहीलो, पण…"*

*"ओह, म्हणजे तुला म्हणायचंय काही चुकलं असेल तर माझं.. तू १००% बरोबर.. असंच ना?"*

*"कोण चुक? कोण बरोबर.. मला ह्यात पडायचं नाहीए मोना. जसं मी तुला समजून घेतो तसंच तू मला घ्यावंस एवढीच माझी अपेक्षा आहे. मान्य आहे, बऱ्याचदा तुझ्या पार्टींमध्ये*

*मी एकटाच कोपऱ्यात बसून असतो. पण मी एक लेखक आहे मोना.. बऱ्याचदा पुढची कथा मला काळ-वेळ न ठरवता सुचते. अश्यावेळी मला खरंच एकांत हवा असतो. कित्येकदा आपण फिरायला जातो तेंव्हा तू काही सुंदर गोष्टी असतील तर फोटो काढण्यात मग्न होतेसंच ना? इतकी की तुला माझा विसर पडतो.. मग तेंव्हा मी दोष देतो का तुला? नाही.. कारण आय कॅन अंडरस्टॅन्ड कॅमेरा इज युअर फिल्ड.."*

*"इनफ़ कबीर.. आय गेस.. आपण ह्यावर कित्येक महीने, वर्ष वाद घालत बसु आणि त्यातून निष्पन्न मात्र काही होणार नाही.. सो आय गेस.. आपण इथेच थांबाव.. तुला तुझा मार्ग मोकळा आहे.. मला माझा..."*

*कबीरच मन आतून आक्रंदत होतं, मोनाला थांबवावं, तिला नेहमीप्रमाणे समजावून सांगावं, तिला मिठीत घ्यावं.. तिच्या कुरळया कुरळया केसांमध्ये आपली बोटं गुंतवावीत.. पण त्याला हे सुध्दा माहीती होतं की, कदाचित नेहमीप्रमाणे ह्या वेळेस सुध्दा मोना थांबेल.. त्यांच्यातले हे भांडण मिटेल.. पण पुन्हा कधीतरी दोघांमधील स्वभावातला फरक भांडणांच्या रुपाने उफाळून येणारच. गेले काही महीने ह्या ना त्या कारणाने दोघांमधल्या कुरबुरी वाढल्याच होत्या आणि त्यासाठी दुसरा कुठलाच मार्ग कबीरला आता सुचत नव्हता..*

*कदाचित.. कदाचित मोना म्हणत होती तोच योग्य मार्ग होता..*

*कबीर काहीच बोलला नाही.*

*"ऑलराईट मिस्टर रायटर... गुडबाय देन..."*

*मोनिकाने घराचे दार उघडले, एकवार कबीरकडे पाहिले आणि धाडकन दार लावून ती निघून गेली.*

दाराच्या आवाजाने कबीर एकदम जागा झाला. आपण कुठे आहोत त्याला काहीच सुधरत नव्हते. भिंतीवर डोकं आपटून शुध्द हरपल्यावर कबीर आत्ता शुध्दीवर आला होता. त्याचं डोकं अजूनही ठणकत होतं.

“सर.. ब्रेकफास्ट रेडी आहे..” बाहेरचा दरवाजा अजूनही वाजत होता.. “हम्म.. येस.. येतो मी..”, कबीर जमीनीवरून उठून बसला. डोळयात तिखटाचा स्प्रे गेल्याने डोळे भयानक चुरचुरत होते.

भिंतीचा आधार घेत कबीर बेसिनपाशी गेला आणि थंड पाण्याचे ५-६ सपकारे त्याने चेहऱ्यावर मारले.

त्याने घड्याळात नजर टाकली, सकाळचे ८.३० वाजून गेले होते. रुम सोडायला फक्त २ तास उरले होते. गोव्यात आल्यापासून एक गोष्ट धड होतं नव्हती. आधी त्या सो-कॉल्ड इंटरनॅशनल हॉटेलमधला घोळ, मग इथे ते टॅक्सीचे दार डोक्यावर काय आपटले.. ती चित्र-विचित्र फॅशन केलेली तरुणी.. तिच्या भल्यासाठी म्हणून कबीर तिला रुम वर घेऊन येतो काय, ती कबीरच्या डोळयात तिखटाचा स्प्रे मारते काय, कबीर भिंतीवर आपटून बेशुध्द होतो काय आणि आता २ तासात आवरून पुन्हा रुम शोधण्याच्या तयारीला लागतो काय.

कुठून त्या मेहता आणि रोहनचं ऐकून इथं आलो असं त्याला क्षणभर वाटून गेलं.

भराभर आंघोळ उरकून कबीर बाहेर आला. परंतू तेथील एकूणच तेथील स्वच्छता आणि खाद्यपदार्थ बघून त्याने ब्रेकफास्ट न करताच रुम सोडली आणि आपलं सामान घेऊन तो टॅक्सीसाठी रस्त्यावर येऊन थांबला. पोटात भुकेचा डोंब उसळला होता. गोव्याला आल्यापासून त्याने काही खाल्लं पण नव्हतं. आधी पेटपूजा आणि मग हॉटेलशोध असं ठरवून त्याने मिळालेली रिक्षा पुन्हा मार्केटकडे घेतली.

सकाळी काही तरी मस्त, चमचमीत खाण्याची कबीरची इच्छा कुठलं फ़ाईव्ह-स्टार हॉटेल पुर्ण करण्याची शक्यता नसल्याने त्याने वाटेतलं एक बऱ्यापैकी छोटे, पण निटसे हॉटेल बघून कबीर आतमध्ये शिरला.

आतमध्ये तुरळकच गर्दी होती. रंगेबिरंगी आणि चित्रविचित्र फॅशनच्या पर्यटकांचीच वर्दळ बहुतांश होती. कबीरने अगदीच कोपऱ्यातलं एक टेबल पकडलं आणि त्याने फटाफट जे सुचेल त्याची ऑर्डर देऊन टाकली.

ब्रेकफास्ट गपागप हाणल्यावर कबीरचं भणभणणार डोकं थोडं शांत झालं. पोटात उसळलेली आग कमी झाली. कबीरने स्ट्रॉंग कॉफीचे दोन कप रिचवले आणि मग तिसरा मग घेऊन तो खुर्चीत रेलून बसला. दोन क्षण त्याने डोळे मिटून घेतले. त्याची तंद्री भंगली ती पडलेल्या भांड्यांच्या आवाजाने. त्याने डोळे उघडून बघीतलं हॉटेलच्या दरवाज्यातून एक तरुणी येताना वेटरला धडकली होती.

“सॉरी.. सॉरी.. आय एम एस्क्ट्रीमली सॉरी..”, ती परत परत वेटरला म्हणत होती.

पिवळ्या रंगाचा फुलाफुलांची नक्षी असलेला लॉंग स्कर्ट, वरती नेव्ही ब्ल्यु रंगाचा शॉर्ट शर्ट, खांद्यापर्यंत रुळणारे कुरळे केस.. डोळयावर नर्ड स्टाईलचा जाड फ़्रेमचा काळा चश्मा, खांद्याला एक छोटीशी सॅक आणि पेपर्सचा गठ्ठा असलेली एक फाईल.

कबीर तिच्याकडे बघतच राहीला.

*“कर दे अपने इश्क मै मदहोश इस तरह की,*

*होश भी आने से पहले इजाजत मांगे..”*

व्हॉट्स-अप वर फॉरवर्ड आलेली नुकतीच वाचलेली एक शायरी कबीरला आठवली.

वाऱ्याने उडणारे केस सरळ करायला तिने आपला हात मागे घेतला इतका वेळ स्कर्टला खेटून बसलेला तिचा शॉर्ट शर्ट किंचीतसा वर उचलला गेला आणि नेव्हल भागावर काढलेला टॅटू कबीरच्या नजरेस पडला.

*राधा...*

बासरीला बिलगून बसलेली ती अक्षरं कबीरला वेड लावून गेली..

“राधा.. कबीरची राधा..”, कबीर स्वतःशीच पुटपुटला.

तिचे थोडीशी घारी छटा असलेले डोळे... उफ़्फ़ ! कबीरला वाटलं, आपण तिच्या डोळयांत बघत बसलो तर दोन मिनीटांत आपण स्वतःला विसरून जाऊ. वाऱ्याच्या हलक्याश्या झुळुकीने उडणारे तिचे केस.. कबीरच्या हृदयाची धडकन जणु त्या केसांच्या उडणाऱ्या लयीवर होत होती.

कबीरला आपला श्वास अडकल्यासारखे झाले, पाण्याचा घेतलेला घोट त्याच्या घश्यातच अडकला. आजुबाजुचे विश्व जणु `स्टॅच्यु' केल्यासारखे जागच्या जागी थिजून गेले होते.

किती वेळ.. किती वेळ उलटून गेला होता कुणास ठाऊक. त्या पिवळ्या स्कर्टला लटकलेले गुलाबी रंगाचे लोकरीचे गोंडे, त्याच्यावर लावलेली छोटीशी किणकिण करणारी घुंगरं, हातातल्या चंदेरी रंगाच्या बांगड्या, कानातलं, गळयातलं पेंडंट, नाकातली ती छोटीशी नोज रिंग.. कित्ती कित्ती गोष्टींच कबीरने त्या काही क्षणात लक्ष वेधून घेतलं होतं.

तिने अचानक कबीरकडे पाहीलं. वेगाने जाणारी ट्रेन अचानक 'सडन जॉल्ट' घेउन थांबावी आणि त्या लयीत भान हरपलेले आपण क्षणार्धात भानावर यावं, तसं कबीरचं झालं.

कबीरने पट्कन आपली नजर दुसरीकडे वळवली.

परंतू डोळयांच्या कॉर्नरवरून कबीरने ताडलं ती तरुणी कबीरच्याच दिशेने येत होती.

“च्यायला, ही मला ओळखते वगैरे की काय? आय मीन.. अफ़्टर ऑल, आय एम अ रेकग्नाईझ्ड रायटर…”, कबीरच्या मनात विचार येऊन गेला.

कबीर सावरून बसला.

“एक्सक्युज मी..”, कबीर बसला होता त्या टेबलाच्या समोर उभी असलेली तरुणी म्हणाली.

कबीरने जणू लक्षच नव्हते अश्या अविर्भावात वर पाहीलं..

“येस?”, कबीर

“अम्म.. इथे कोणी बसलेलं नसेल, तर मी इथं बसु का?”, तरुणी
“हो.. व्हाय नॉट.. प्लिज..”

ती तरुणी समोरची खुर्ची सरकवून बसली. हातातल्या फाईल आणि कागदपत्र कडेला ठेवली आणि कबीरला म्हणाली.. “मी राधा…”

“आय नो..”, कबीर पट्कन म्हणून गेला..

“अं..” आपले घारे डोळे मोठ्ठे करत ती म्हणाली..”हाऊ डू यु नो?”
कबीरला पट्कन आपली चुक लक्षात आली.. तो टॅटू आपण मगाशी पाहीला होता हे कबीर बोलु शकत नव्हता..

“आय मीन.. तुच म्हणालीस नं आत्ता,…”, कबीर आपली चुक सावरत म्हणाला..

“ओह हं… हिहिहिहिहि..”, विचित्र हसत राधा म्हणाली..

मी कबीर…”, कबीर म्हणाला..

ती सुध्दा आता आय नो म्हणेल.. मग मी तुमच्या लेखनाची फॅन आहे वगैरे म्हणले असं त्याला वाटत होतं…

“मला वाटतं, तू मला ओळखलेलं दिसत नाही”, राधा..

“नाही.. म्हणजे, आपण आधी कधी भेटलो आहे का? आय एम सॉरी, पण मी खरंच नाही ओळखलं..”, कबीर आपले नेहमी ई-मेल करणारे फॅन्स, पब्लिकेशनच्या वेळी भेटलेली लोकं ह्यांबद्दल विचार करत होता. पण त्यात राधा नावाचं असं कोणीच नव्हतं. शिवाय तिला आधी कधी पाहीलं असेल तर विसरणं अशक्यच होतं.

“ओके.. नेव्हर माईंड.. मला तुमची माफी मागायची होती…”, राधा

“माझी माफी? पण का?”, कबीर पुरता गोंधळून गेला होता..

“काल रात्री.. ते मेडीकल स्टोअर.. तुमची रुम.. तुमच्या डोळयात तिखट.., ती.. ती तरुणी मीच होते..”

“काय?”, जवळ जवळ किंचाळत कबीर म्हणाला…

“कुल डाऊन.. कुल डाऊन.. आय सेड आय एम सॉरी..”, एम्बारस होत ती तरुणी म्हणाली..

“हाऊ डेअर यु..? एक तर तुला मी रात्री रस्त्यावर एकटी सोडायला नको म्हणून रुमवर घेऊन आलो आणि तु.. तु…”, संतापाने कबीरच्या तोंडून शब्द बाहेर पडत नव्हते..

“आय एम.. रिअली.. रिअली सॉरी कबीर.. खरंच गैरसमज झाला.. ॲक्च्युअली जेंव्हा तुम्ही मला तुमच्या रुमवर न्हेलेत तेंव्हा मी बेशुध्दावस्थेत होते, जेंव्हा जाग आली तेंव्हा तू असा.. अर्धा माझ्यावर झुकलेला… मला वाटलं.. की..”, राधा
“काय वाटलं.. मी काय तुझा रेप करणारे..?”, कबीर.

“हो.. म्ह्णजे..”, राधा

“हो?? गेट लॉस्ट.. गेट लॉस्ट फ़्रॉम हिअर..” कबीर खुर्चीतून उठत म्हणाला..

“कबीर प्लिज.. मी खरंच मनापासून सॉरी म्हणतेय..”, कबीरच्या हातावर हात ठेवत राधा म्हणाली

तिच्या एका स्पर्शाने कबीरचे सर्व सेन्सेस एकदम शांत झाले. जणु गार वाऱ्याचा एक झोका कबीरच्या अंगावरून वाहत गेला…

“..पण तू विचार कर ना.. अशी मी अर्धवट शुध्दीत होते.. त्यात ती अंधारी खोली, समोर अनोळखी असा अर्धवट माझ्यावर वाकलेला तरुण.., मी.. मी खरंच खुप गोंधळून गेले….”, राधा

“हम्म.. इट्स ओके..”, कबीर शांतपणे खाली बसत म्हणाला

“पण तुला कळलं कसं हा सगळा प्रकार?”, कबीर..

“त्याच काय झालं..”, राधा अडखळत म्हणाली

“हा बोला.. अजून काय घोळ घातला होतास?”, कबीर

“आज सकाळी मी पोलिसांना घेऊन लॉजवर आले होते.. कालची कंम्प्लेंट केली मी सकाळी पोलिस स्टेशन मध्ये…”, राधा

“हाईट्ट आहे ही.. सिरीयसली.. यु आर जस्ट हॉरीबल..”, कबीर कपाळावर हात मारून घेत म्हणाला

“हो मग.. असंच मोकळं सोडायचं होतं का मी.. सो मी पोलिसांना घेऊन गेले तेथे.. तर तो खालचा मेडीकलवाला भेटला, त्याने झाला प्रकार सांगीतला आणि मग मी कंम्प्लेट लगेच मागे घेतली.. मग हॉटेलमध्ये कळलं की तू सकाळीच चेक-आऊट केलंस… मग विचार केला, कदाचित तू सकाळचा ब्रेकफास्टसाठी असशील कुठेतरी. त्यातल्या त्यात हे हॉटेल ह्या एरीयामध्ये टॅक्सीवाले रेकमेंड करतात.. सो थॉट टू चेक हिअर..”, उसनं हासु आणत राधा म्हणाली

“आणि समजा तो मेडीकलवाला भेटलाच नसता तर..??”, आवंढा गिळत कबीर म्हणाला

“तर आत्ता पोलिस तुझ्या मागावर असते..”, राधा

“धन्य.. लक्ष लक्ष धन्यवाद त्या मेडीकलवाल्याचे.. पोलिसांनी मला पकडल्यावर माझ्यावर थोडं न विश्वास ठेवला असता त्यांनी.. आत्ता कदाचित आपल्या कृपेने मी तुरुंगात असतो..”

“रिअली सॉरी वन्स अगेन.. काय आहे ना, जगातील चांगुलपणावरचा विश्वास उडाल्यासारखा झालाय माझा..”, राधा काहीश्या निराशेच्या स्वरात म्हणालि

“ए पण.. रिअली, मी ओळखलंच नाही तुला.. काल आय मीन.. शॉर्ट कलर हेअर, शॉर्ट्‌र्स.. तो अवतार ! आणि आज एकदम डिसेंट लुक..??”

“ओह.. अरे विग होता तो.. आणि कॉन्टॅक्ट्स घातल्या होत्या.. बाकीचं म्हणशील तर.. असंच..!!”

“पण का असं? उगाचं?”, कबीर

“कधी भेटलो सावकाशीत तर सांगीन निवांत.. बिट पर्सनल..”

पर्सनल वरून कबीरला आठवण झाली तिच्या मंगळसुत्राची. कबीरने पट्कन तिच्या गळयाकडे बघीतलं, पण कालचे ते मंगळसुत्र गळयात नव्हते..

“आय जस्ट होप, बाकीच्या त्या अवतारासारखंच तिचं ते मंगळसुत्र पण तेवढ्यापुरतंच असेल..”, कबीर मनातल्या मनात म्हणाला..

“एनिवेज.. गॉट टु गो…”, खुर्चीवरून उठत राधा म्हणाली, ती माघारी वळणार इतक्यात तिचं लक्ष कबीरच्या सुटकेसकडे जाते.

“यु लिव्हींग गोवा?”, राधा

“नाह.. ॲक्च्युअली कालच तर मी गोव्याला आलो.. निदान ३ आठवडे तरी मी इथे असेन, सो सध्या जागा शोधतोय..”, कबीर

“ओह.. ॲक्च्युअली सगळं आत्ता अरे जॅम पॅक्ड असेल.. कशी आणि कुठे पाहीजे जागा..? म्हणजे एनी प्रेफ़रंन्सेस?”, राधा..

“नॉट ॲक्च्युअली, पण जनरली, मला थोडी शांत जागा पाहीजे.. आय एम हिअर टू राईट अ बुक…”, कबीर

“वॉव.. तू पण लिहीतोस…?”, राधा परत खुर्चीत बसत म्हणाली.

“तू पण म्हणजे..? अजून कोण लिहीतं?”, कबीर

“मी..!!” आपले खांद्यावर आलेले केस, हाताने मागे ढकलत, डोळे मोठ्ठे करून राधा म्हणाली.

“रिअल्ली.. काय लिहीतेस?”

“अं.. नाही म्हणजे.. लिहायचा प्रयत्न करतेय.. बरं झालं तू भेटलास.. ए मला सांग ना.. म्हणजे.. मला पण कादंबरी लिहायचीय.. तर कशी लिहु? म्हणजे सुरुवात कुठून करायची? कादंबरी लिहायला काय काय लागतं??”

कबीर स्वतःशीच हसला..

“सांगेन तुला, सध्या तरी मला जागा शोधणं फार महत्वाचं आहे… मी आहे ३ आठवडे किमान गोव्यात, सो सावकाशीत भेटू आणि बोलु.. ओके?”

“चालेल.. वाय द वे, तुझा जागेचा प्रॉब्लेम मी सोडवु शकते..”, राधा.. “म्हणजे तुला चालणार असेल तर.. होम-स्टे आहे एक.. मी तिकडेच रहाते सध्या..”

“हो का? कुठेशी आहे..”, कबीर

“ओल्ड गोवा. तशी मी खुप सेल्फिश ए, सो कुणाला मी बोलले नव्हते.. बट इफ़ यु प्रिफ़र होम-स्टे.. सध्या फ़क्त मी आणि सोफी ऑन्टी.. ज्या ओनर आहेत.. दोघीच रहातो तिथे, पण खुप स्पेशीअस असं.. टीपकल पोर्तुगीज स्टाईलचं घरं आहे, शांतता आहे, मागे नदी, हिरवी गार झाडी.. मस्त आहे.. बघ एकदा.. आवडलं तर वेल एन गुड…”

“साऊंड्स टेम्प्टींग, बघायला काहीच हरकत नाही..आणि बेगर्स डोन्ट हॅव एनि चॉईस.. नाही का?”, वेटरला बिल आणण्याची खुण करत कबीर म्हणाला
“हे काय? बिल? एव्हढा मोठ्ठा तुझा प्रश्न सोडवते आहे मी! आणि एक साधी कॉफी पण नाही ऑफर करणार?”, आपले गाल फुगवत राधा म्हणाली..

“ओह सॉरी.. कर की ऑर्डर.. “, वेटरला थांबवत कबीर म्हणाला
“ईट्स ओके.. माझी कॉफी तुझ्यावर उधार ..”, वेटरला यायची खूण करत राधा म्हणाली.

“तसंही, सोफी ऑन्टी वाट बघत असेल, सकाळी इतक्या गडबडीत बाहेर पडले, त्यात ते पोलिस वगैरे. ती काळजी करत असेल.. चल तुला घर दाखवते…” बिलाच्या खालची गोड बडीशेप खात राधा म्हणाली

जागा मिळण्यापेक्षा कबीरला ती जागा आत्ता राधाच्या आजुबाजुला रहायला मिळण्याचा आनंद अधीक होता.

“एव्हढी सुंदर मुलगी आजुबाजुला रहात असेल तर कुणाला रोमॅन्टीक स्टोरी नाही सुचणार?”, कबीरच्या मनात एक विचार येऊन गेला

त्याने हॉटेलचे बिल भरले, खुशीत वेटरला टीप ठेवली आणि तो सामान उचलून राधाबरोबर हॉटेलच्या बाहेर पडला.

“ओ अनुराग सर...अहो कुठं चाललात गडबडीत?, एक तरुण गाडीत बसणाऱ्या दुसऱ्या एका तरुणाला हाक मारून थांबवत होता.

त्याचा आवाज ऐकून, अनुरागने मागे वळून पाहीलं.

“अरे मनिष.. सॉरी लक्षच नव्हतं माझं..”, अनुराग
“चालायचंच, मोठी लोकं तुम्ही, करोडोंचे बिझीनेस सांभाळायचे म्हणजे...”, मनिष
“छे रे, म्हणून मित्र मित्रच असतात ना, खरंच लक्ष नव्हतं. बोल काय म्हणतोस?”, अनुराग
“मी मस्त मज्जेत.. तू बोल.. आणि वहीनी कुठं दिसत नाहीत त्या? एक दोनदा मध्ये येऊन गेलो घरी, तर घराला कुलुप. माहेरी गेल्यात की काय?”, मनिष

अनुरागचा चेहरा काहीक्षण उतरला आणि मग चिडून म्हणाला, “तसं झालं असतं तर बरंच झालं असतं”

“म्हणजे?”, मनिष

“अनु घर सोडून गेलीय..”, अनुराग संतापून म्हणाला...

“काय? कधी? कुठे?”, मनिष

“आता तुझ्यापासून काय लपवायचं? झाले ३ आठवडे.. सगळ्या मैत्रीणींकडे, नातेवाईकांकडे शोधलं. तिच्या माहेरी पण काही पत्ता नाही अनु कुठे गेली आहे ते...”, अनुराग

“अरेच्चा.. अरे मग पोलिस कंम्प्लेंट वगैरे केलीस का? चुकून माकून काही बरं वाईट..”, मनिष

“बरं वाईट वगैरे काही नाही. धडधडीत चिठ्ठी लिहून घर सोडून जाते आहे सांगून गेली आहे..”, अनुराग

“पण का? काही भांडण वगैरे झाली का तुमची..”, मनिष

“आता तुच सांग मनिष, नवरा बायको मध्ये कधी भांडण होत नाहीत का? थोडे-फ़ार चालायचेच. पण निट बसून बोललं की होतंय सगळं…”, अनुराग

“मग आता?”, मनिष

“आता काय? बघू वाट अजून काय करणार !, फोन पण लागत नाहीए तिचा…”, अनुराग

“ओह्ह.. सॉरी टू हिअर यार..”, मनिष

“डोन्ट बी.. बिकॉज आय एम नॉट.. एनिवेज.. चल पळतो मी कंपनीत.. उशीर झालाय..”, घड्याळात बघत अनुराग म्हणाला..

“येस सर.. काही कळलं अनुचं तर नक्की सांग..”, मनिष

“बाय..”

“बाय”

अनुराग ज्या वेळी कारमध्ये बसत होता, त्यावेळी राधा आणि कबीर टॅक्सीमधून खाली उतरत होते. कबीरने समोर बघीतले, साधारण १९१० वगैरे काळातले एक टुमदार बंगलावजा बसके घर समोर उभे होते.

“सी..ssss आय टोल्ड यु.. तुला बघताक्षणीच घर आवडेल म्हणून..”, राधा म्हणाली.

कबीरने टॅक्सीच्या डीक्कीतून आपली बॅग बाहेर काढली आणि बंगल्याचे गेट उघडून तो राधाच्या मागोमाग आतमध्ये शिरला.

“आई-शप्पथssss.. सौल्लीड शॉक बसला असेल ना तुला?”, रोहन फोनवर खो-खो हसत म्हणाला

“अरे मग काय तर.. दुसरं कोणी असतं तर थोबाडच लाल केलं असतं.. पण यार खरंच, इतकी मस्त आहे ना राधा….”, कबीर

“बsssर.. चांगली प्रगती आहे, दोन दिवस नाही झाले गोव्याला जाऊन तर..करा एन्जॉय करा.. आणि हो स्टोरी घे लिहायला …”, रोहन

“हो रे.. सुचायला तर हवं काही तरी…”, कबीर

“अरे अख्खी कादंबरी आहे तुझ्याजवळ.. मला नक्की खात्री आहे, तुझी गोष्ट तुला राधामध्येच मिळेल…”, रोहन

“लेट्स सी.. बरं चल, ठेवतो.. करेन फोन नंतर…”, कबीर

“येस्स सर.. बरं यार, एक फोटो पाठव नं त्या राधाचा.. तू इतकं छान वर्णन केलं आहेस.. फ़ार बघायची इच्छा आहे बघ…”, रोहन

“चं-मारी.. अरे एक दिवसाची ओळख माझी, बघतो, कधी चान्स मिळाला तर काढतो एखादा सेल्फी तिच्याबरोबर… बाय देन..”, कबीर

“बाय..”

“हाऊ आर यु माय सन?”, कबीर ने फोन ठेवलेला बघून साधारण एक सत्तरीकडे झुकलेली स्त्री, सोफी ऑन्टी, खोलीत आली. शरीर थकलं असलं तरी चेहऱ्यावर प्रचंड प्रसन्नता होती. वार्धक्याने पांढरे झालेले केस वाऱ्याच्या झुळकीने हलकेच उडत होते. केसांत सजवलेली पिवळी फुलं त्या चंदेरी केसांमध्ये उठून दिसत होती. पांढऱ्या-गुलाबी फुलांची नक्षी असलेला मिडी, सोफी ऑन्टींना अधीकच खुलून दिसत होता.

नकळत कबीरने खाली वाकून सोफी ऑन्टींना नमस्कार केला.

एजींग-विथ ग्रेस म्हणतात ते हेच असेच काहीसे कबीरला वाटून गेले.

“आय एम गुड सोफी ऑन्टी”, कबीर म्हणाला.

“राधाने मला सगळा काल-रात्रीचा गैरसमज सांगीतला.. आय वॉज एक्स्टीमली वरीड फ़ॉर हर जेंव्हा रात्र-भर ती आली नाही… बट थॅंक्स टू यु.. गॉड ब्लेस यु…” भिंतीवरील जिझसच्या फोटोकडे बघून एकवार कपाळाला आणि मग छातीवर डावी-उजवीकडे हात लावून नमस्कार करत सोफी ऑन्टी म्हणाल्या..

“हो ऑन्टी, ते ब्लेसींग वेळेवरच मिळाले म्हणायचे, नाही तर मी आत्ता तुरुंगाची हवा खात असतो..”, हसत हसत कबीर म्हणाला.

“राधा म्हणाली, तू पुस्तकं लिहीतोस म्हणून ! आणि गोव्यात नविन गोष्ट लिहायला आला आहेस…”

“हो ऑन्टी.. नशिबाने ही जागा मिळाली, नाही तर आजच्या दिवसात परत निघावंच लागलं असतं..”

“बरं झालं की नाही, राधा तुला मिळाली ते??”

“ऑन्टी.. मिळाली नाही.. भेटली…”, सोफी ऑन्टींच्या खांद्यावर आपला तळहात ठेवून त्यावर हनुवटी टेकवत राधा म्हणाली..

“हो हो.. तेच.. माझं मराठी काही इतकंस चांगलं नाही.. आमचो आपला कोंकनी ठिक असा…”, सोफी ऑन्टी हसत हसत म्हणाल्या खऱ्या, पण त्यांच्या त्या “राधा तुला मिळाली”, ह्या एका वाक्याने कबीरच्या सर्वांगावर रोमांच उभे केले…

“इथं तुला पाहीजे तश्शी शांतता मिळेल पुस्तक लिहायला.. इथूनच मागे थोड्या अंतरावर छान विस्तीर्ण नदी आहे, छोटी बोट पण आहे तुला येत असेल चालवायला तर.. राधा दाखवेल तुला… आणि काही हवं असेल तर सांग. खायला बाकी काही लगेच तयार नसले तरी वाईनचे केक मात्र कधीही मिळतील…”

“वॉव्व.. वाईनचे केक.. प्रचंड भुक लागलीय.. मी फ्रेश होऊन येतो.. ८-१० केक चे पिसेस आणि मस्त गरम कॉफी मिळाली तर…”, कबीर

“मी टाकलीय कॉफी, तू ये फ्रेश होऊन..”, राधा म्हणाली काही सेकंद राधाची आणि त्याची नजरानजर झाली आणि मग राधा आणि सोफी ऑन्टी खोलीच्या बाहेर निघून गेल्या.

कबीर अजूनही संमोहीत झाल्यासारखा राधा गेलेल्या दिशेने बघत उभा होता.

“हॅल्लो इन्स्पेक्टर भोसले, अनुराग बोलतोय..”, फोनवर नेहमीच्याच आपल्या हुकुमत गाजवणाऱ्या आवाजात अनुराग बोलत होता

“गुड अफ़्टरनुन सर…”

“अहो कसलं गुड-अफ़्टरनून करताय, अनुचा काही शोध लागला का? ३ आठवडे झाले माझी बायको मिसींग आहे, आणि तुम्हाला एक सुध्दा लिड मिळत नाही म्हणजे काय? अहो मिडीआला याची कुणकुण लागली तर किती हंगामा होईल ह्याची कल्पना आहे का तुम्हाला?”

“येस सर.. आमचा तपास चालु आहे सर.. तुम्ही दिलेला मोबाईल नंबर आम्ही ट्रॅकींगला टाकला आहे, पण फोन बंद असल्याने लोकेशन डिटेक्ट होत नाहीए सर…”

“मी कमीशनरशी बोलु का? तुम्हाला अजून काही सपोर्ट हवा असेल तर..”

“त्याची काही आवश्यकता नाहीए सर, फक्त कसं आहे, प्रकरण थोड सावधानतेनं हाताळावं लागतंय, उघड-उघड पण तपास नाही करता येत ना सर.. म्हणून थोडा उशीर होतोय एव्हढचं..”

“ठिक आहे, पण काही जरी लिड मिळालं तरी लग्गेच मला कळवा, माझा डायरेक्ट नंबर दिलेला आहे तुम्हाला…”

“येस सर…. हॅव अ…”

परंतू फोन आधीच कट झाला होता..

इन्स्पेक्टर भोसलेंनी एकवार फोनकडे रागाने पाहीले आणि थाड्कन तो टेबलावर आपटला.

“काय रे भोसले, काय झालं?”, सब-इन्स्पेक्टर कदम ने विचारलं…. “अरे काय सांगू.. तिच अनुराग सायबांची केस.. ह्यांच्या बायका कुठं तरी पळून जाणार आणि हे आमच्यावर बरसणार… शोधा माझ्या बायकोला म्हणून…”

“अरे पण, पळून गेली असेल कश्यावरून?”, कदमांनी प्रश्न उपस्थीत केला “कश्यावरून काय? अरे त्यांच्या गल्लीतलं शेमडं पोरगं पण सांगेल… गेली एक वर्ष सतत त्यांच्यामध्ये भांडणं चालू असतात म्हणे. बाहेर-पर्यंत आवाज येतो म्हणे. त्यांच्या नोकरांना

कोपऱ्यात घेतला होता तेंव्हा बोलला तो. रोज रडायच्या म्हणे त्या अनु मॅडम..."
"च्यायला.. त्या अनुरागने मारलं तर नसेल त्याच्या बायकोला? आणि उगाच पळून गेलीचा आव आणत असेल?", कदम

भोसले काही बोलणार इतक्यात टेबलावरचा फोन खणखणला...

"हॅल्लो.. इन्स्पेक्टर भोसले...."
"..."
"हम्म.. हम्म.. ओके.. ओह.. कधी?? अच्छा परत का...? नो प्रॉब्लेम.. किप अ वॉच ॲन्ड कीप मी अपडेटेड... थॅंक्स.."

भोसलेंच्या चेहऱ्यावर हास्य पसरले.. "कदम.. जिवंत आहे त्यांची बायको.. आत्ताच काही सेकंद का होईना त्यांचा फोन ट्रेस झाला होता...चला.. ह्यावेळी सरकारी खर्चाने आपली गोवा-सहल घडणार म्हणायची.. द्या टाळी..."

"ऑ! म्हणजे त्या गोव्यात आहेत..?"

"व्हय..जी...."

"मग सांगून टाक नं त्या अनुरागला.."

"अज्जीबात नाही.. साल्याने लै डोकं फिरवलंय माझं.. मला आधी शंभरटक्के खात्री होऊ देत.. त्याच त्या आहेत म्हणून.. फॉल्स-अलार्म असला तर गेलोच आपण कामातून.. बघु देत तरी गोव्यामध्ये काय चाल्लय ते.. तुला सांगतो.. ती कुठल्या-यार बरोबर पळून गेली असेल ना, तर ह्यावेळी मीच मिडीयाला-टिप देणारे.. होऊ-देत वाभाडा साल्याच्या इज्जतीचा...."

कदम काही बोलणार त्या आधीच भोसलेंनी फोन उचलला आणि नंबर फिरवायला सुरुवात केली.

ज्यावेळी भोसले अनुरागशी फोनवर बोलत होते त्यावेळी इकडे कबीर खिडकीत बसून गरमा-गरम कॉफीचा आस्वाद घेत होता. राधाला भेटल्यापासून त्याला एक अशी विचित्र बैचैनी सतत जाणवत होती. नक्की काय केल्याने आपल्याला बरं वाटेल हेच त्याला समजत नव्हते. फक्त आणि फक्त राधा हा एकच विचार त्याच्या डोक्यात होता.

“अगं असु-देत, मिळेल रिक्षा मला कोपऱ्यावर..”, सोफी ऑन्टी राधाला म्हणत होत्या.. “पण कश्याला मी देते ना आणून.. तुम्ही गेटपाशी येऊन थांबा, मी आलेच रिक्षा घेऊन”, असं म्हणून राधा बाहेर गेली.

सोफी ऑन्टी हातातली पिशवी सांभाळत हळु हळु गेट कडे गेल्या.

कबीरला कसंही करून राधा-बद्दल अधीक जाणून घ्यायचं होतं. ही कोण? कुठली? त्या दिवशी ते मंगळ-सुत्र वगैरे काय प्रकार होता? त्याला ते मंगळसुत्र काही स्वस्थ बसु देईना.

त्याने खिडकीतून बाहेर बघीतलं. राधाचा कुठेच पत्ता नव्हता. सोफी ऑन्टी सुध्दा गेटच्या बाहेर उभ्या होत्या.

कबीर पट्कन उठला आणि राधाच्या खोलीत गेला. ५ मिनीटांत जे काही दिसेल ते त्याला बघायचं होतं. फारशी उचका-पाचक न करता तो काही तरी शोधत होता. कोपऱ्यात त्याला राधाची ती झोली-बॅग दिसली.

कबीरने सावकाश ती बॅग उघडली आणि आतमध्ये हात घातला.. थोडीशी उचकापाचक केल्यावर, त्याच्या हाताला ती वस्तु लागली.. मोबाईल.

कबीरने तो मोबाईल बाहेर काढला आणि होमचे बटन दाबले.. पण फोन स्विच्ड ऑफ़ असल्याने स्क्रिनवर काहीच आले नाही.

कबीरने फोनचे स्टार्ट-बटन दाबुन धरले. आय-फोन आय-ओ-एस ऑपरेटींग सिस्टीम बुट-अप स्क्रिन समोर चमकु लागली. कबीरला फोनमधून नक्की काय मिळेल काहीच माहीती नव्हते. कदाचित लास्ट-डायल्ड कॉल्स, कदाचित फोटो, कदाचित स्क्रिनवर टॅग केलेल्या नोट्स.. काहीही…

ओ.एस. बुट होऊन.. होम-स्क्रिन आली पण स्क्रिन-नेमकी पासवर्ड प्रोटेक्टेड होती.

कबीर स्वतःशीच चरफडला.. इतक्यात राधा खोलीत शिरली. कबीरला खोलीत बघुन, काही क्षण तिच्या चेहऱ्यावर आश्चर्याचे भाव उमटले आणि त्याची जागा काही क्षणातच तिरस्काराने, रागाने घेतली जेंव्हा तिने तिचा फोन कबीरच्या हातात बघीतला.

धावतच ती कबीरपाशी गेली आणि तिने फोन हिसकावून घेतला.

फोन चालू झालेला पहाताच, तिच्या संतापाचा अकस्मात पारा चढला. कसलाही विचार न करता थाड्कन तिने तो फोन भिंतीवर फेकला जणु फोन बंद व्हायला लागणारा वेळ सुध्दा तिला नको होता.

त्या महागड्या आयफोनचे तुकडे खोलीभर पसरले.

कबीर डोळे मोठ्ठे करून राधाकडे बघत होता. तिचे हे रुप त्याला अनपेक्षीत होते.

“कुणी सांगीतले तुला माझ्या फोनला, माझ्या वस्तुंना हात लावायला? समजतोस कोण तू स्वतःला?”

“आय एम सॉरी.. मी फक्त…”

“काय मी फक्त काय? हु द हेल आर यु? तुला माहीते तुझ्या एका चुकीने काय झालंय? काय होऊ शकतेय?”

“मला समजलं नाही राधा.. मी …”

"नाहीच समजणार.. कुणालाच नाही समजणार.. तुम्ही सगळे एकसारखेच.. मुली म्हणजे तुमची प्रॉपर्टी आहे का? तुम्ही काहीही करा, कसंही वागा..."

"घाई घाई मध्ये ती सगळं सामान गोळा करत होती..."

"अगं पण झालंय काय? सांगशील का?"

"तू फोन चालु केला होतास?"

"हो.."

"किती वेळ झाला होता फोन चालु होऊन.."

"जस्ट चालु होतच होता राधा..."

"जस्ट म्हणजे किती वेळ.."

"हार्डली ३०-४० सेकंद्स... पण झालं काय?"

"आय हॅव टू लिव्ह...", राधा..

"म्हणजे..."

"म्हणजे.. आय हॅव टू लिव्ह.. इंग्रजी कळत नसेल तर मराठीत सांगते.. मला निघायला हवं..."

"पण का? कुठे?"

"कुठे माहीत नाही, पण इथून दूर.. खूप दूर..."

"प्लिज राधा.. डोन्ट गो... लुक.. आय् एम सॉरी.."

"इट डझन्ट मॅटर कबीर.. चुक माझीच होती.. फोन कॅरीच करायला नको होता मी.."

"हे बघ राधा.. काय झालंय, काय चुकलंय, तुला का जावं लागतंय, मला माहीत नाही.. पण प्लिज.. प्लिज डोन्ट गो..."

राधाचं कबीरच्या बोलण्याकडे लक्षंच नव्हतं. ती तिचं सगळं सामान भराभरा बॅगेत भरण्यात मग्न होती.

“राधा, मी काय म्हणतोय तुला कळतंय का?”, तिच्या दंडाला धरून मागे ओढत कबीर म्हणाला.

“कबीर.. प्लिज.. हे बघ.. तुला रहायला घर मिळालंय.. तू तुझं पुस्तक लिही छान, माझ्या शुभेच्छा तुला.. बट आय हॅव टु गो नाऊ.. सोफी ऑन्टीला आल्यावर माझा निरोप सांग…”

“अगं निदान त्या येई पर्यंत तरी थांब, अशी अचानक तडकाफडकी न भेटताच जाणारेस का?”

राधाने आपली बॅग उचलली आणि ती खोलीच्या बाहेर पडली. कबीर तिच्या मागोमाग बाहेर आला.

राधाने सॅन्ड्ल्स अडकवले आणि ती घराच्या बाहेर पडली सुध्दा…

“राधा थांब प्लिज.. कसं सांगू तुला..”, कबीर अगतिकतेने म्हणत होता. असं अचानक राधाला निघून जाताना पाहून तो प्रचंड बैचेन झाला होता. राधा निघून गेली तर आपल्याला वेड  वगैरे लागेल असेच जणु त्याला वाटू लागले होते.

“राधाsssss…”

राधाने एव्हाना गेट उघडले होते…

“राधा स्टॉप राधा….. आय लव्ह यु……”, कबीर डोळे बंद करून हृदयापासून जोरात ओरडला……

राधा गेट उघडतच होती तोच समोर एक रिक्षा येऊन थांबली. रिक्षावाला पटकन उतरला आणि त्याने रिक्षातून सोफी ऑन्टींना हात धरून खाली उतरवले.

सोफी ऑन्टींच्या हाताला आणि कपाळाला थोडं खरचटलं होतं. ते बघताच हातातली बॅग टाकून राधा धावत रिक्षेपाशी गेली. कबीरही काय झालं बघायला मागोमाग धावला.

“सोफी ऑन्टी ! काय झालं?” राधाने त्यांचा हात धरत विचारलं.. “काही नाही ताई.. त्या रिक्षेतून चालल्या होत्या, म्हापसा चौकात मध्येच एक मोटारसायकलवाला आला, त्याला वाचवण्याच्या नादात रिक्षा उलटली..”

“अहो काय.. निट चालवता येत नाही का रिक्षा तुम्हाला..? माजलेत तुम्ही लोकं…!!”, राधा तावातावाने बोलली

“ताई, अहो माझ्या रिक्षेत नव्हत्या त्या.. दुसरी रिक्षा होती. तो गेला पोलिस स्टेशनात.. मी विचारलं ह्यांना दवाखान्यात सोडु का, तर नको म्हणाल्या, घरीच सोड म्हणून मी घेऊन आलो ह्यांना घरी तर..”

“बरं बरं.. थॅंक्स. किती झाले पैसे?”

“काही नाही.. सांभाळा ह्यांना..” तोंडातल्या तोंडात पुटपुटत तो रिक्षावाला निघून गेला.

सोफी ऑन्टी तश्या ठिक होत्या, पण घाबरल्याने त्यांचे हात-पाय अजूनही थरथरत होते. गुडघ्याला सुध्दा थोडं खरचटलं होतं.

राधा त्यांना घेऊन घरात गेली. कबीरनेही संधी साधून राधाची बॅग उचलली आणि मागोमाग तो घरात शिरला.

कबीरने कॉफी करून आणली तेंव्हा सोफी ऑन्टी औषधं घेऊन अंथरुणात शिरत होत्या.

“कश्या आहात?” कबीरने कॉफीचा कप त्यांच्या हातात देत विचारलं
“ठिक आहे.. थोडं धडधडतंय अजून..”, सोफी ऑन्टी म्हणाल्या..

“डॉक्टरांकडे जायचंय का?”, कबीर
“नको नको.. आय एम ऑलराईट माय सन.. जिझस इज देअर टु प्रोटेक्ट मी..”

“ऑलराईट, पण काही वाटलं तर सांगा.. मी आहे बाहेरच..”, असं म्हणून कबीर बाहेर निघून गेला

१०-१५ मिनिटांनी राधा खोलीचं दार बंद करून बाहेर आली.

“हाऊ इज शी?”, कबीर

“ठिक आहे आता, झोप झाली की बरं वाटेल...”, बोलत असताना राधाचं लक्ष व्हरांड्यात ठेवलेल्या तिच्या बॅगेकडे गेलं. तिनं एकवार कबीरकडे बघीतलं. कबीरने पटकन नजर चुकवली. पण नजरेच्या कोपऱ्यातून त्याला जाणवलं की राधा त्याच्याकडेच बघत होती.

दोन क्षण थांबुन राधाने तिची बॅग उचलली आणि ती तिच्या खोलीत निघून गेली.

“भोसले, दोन मिनीटं आत मध्ये या..”, इंटरकॉमवर डीजी साहेबांनी भोसलेंना बोलावून घेतलं.

भोसले आतमध्ये गेले आणि कडक सॅल्युट ठोकून खुर्चीत बसले.

“भोसले.. सध्या काय केस आहेत तुमच्याकडे?”, डीजी साहेबांनी विचारलं

“तश्या महत्वाच्या काही नाहीत.. हा, पण ते अनुराग आहेत ना..त्यांच्या मिसींग बायकोची केस मी हॅन्डल करतोय..”, भोसले

“अनुराग? यु मीन.. ते अनुराग दीक्षीत?”, डीजी

“हो.. हो सर तेच.. काही आठवडे झाले त्या नाहीश्या झाल्यात घरातून..”, भोसले

“बरं.. काही लिड?”

“हो.. तेच तुमच्याशी बोलायाला येणार होतो.. एक गोव्यातून लिड मिळालंय, त्यासाठी तुमचं अप्रुव्हल हवं होतं. मी आणि कदम जाऊन…”

“नको!, त्यापेक्षा असं करा, ही केस स्टडी करा जरा, वरून ऑर्डर आल्यात.. त्या बारमध्ये एका तरुणीची कोणी छेडछाड काढली बघा जरा ते..”

“पण सर.. कन्फर्म्ड लिड आहे, फक्त २-४ दिवस, क्लोज करूनच येतो केस.. शिवाय अनुराग सारखे कमीशनर साहेबांशी बोलु का म्हणतात…”

“भोसले.. मी बोलतो कमीशनर साहेबांची.. ही केस प्रायोरीटीवर घ्या तुम्ही.. आधीच एक तर आपलं सरकार नविन आहे.. ह्या असल्या छेडछाडीच्या केसेस लगेच मार्गी लागायला हव्यात..”

“पण सर..”

“यु कॅन गो नाऊ भोसले.. आणि हो.. प्लिज ते गोव्याचं इतक्यात अनुरागना बोलु नका. आधीच आपल्याकडे स्टाफ कमी आहे, उगाच कुणालातरी पिटाळावं लागेल. विचारलं तर सांगा शोध चालू आहे. कळलं?”

भोसलेंच्या गोवा मोहीमेवर अचानक पाणी पडलं होतं. “येस सर…”, भोसलेंनी परत एक कडक सलाम ठोकला आणि ते निराश होऊन बाहेर पडले.

संध्याकाळचे ७.३० वाजून गेले होते. आकाशात आधी केशरी, मग गुलाबी-निळा आणि नंतर काळसर रंगाची उधळण करत सुर्यास्त होऊन गेला होता. कबीरच्या डोक्यात अनेक प्रश्न पिंगा घालत होते.

कोण आहे ही राधा?

त्या दिवशीची ती राधा आणि ही. असं वेषांतर का?

दुपारी फोनवरून इतकं चिडायचं कारणंच काय? इतकं की सरळं इथून निघुनच जायची वेळ यावी?

मला ही इतकी का आवडते? इतकी? की तिला जाताना बघून कुणाची, कसलीही पर्वा न करता मी सरळ तिला ‘आय-लव्ह-यु’ म्हणावं!

त्याच्या मनाचा प्रचंड कोंडमारा होतं होता. दुपारनंतर तो आणि राधा अनेकदा समोरासमोर आले, पण त्याला विचारायचं काही धाडस झालं नाही.

बंगल्याच्या हिरवळीवर मांडलेल्या टेबल-खुर्चीवर तो विचारात बुडून गेला होता, इतका की आजुबाजुला पसरलेला मिट्ट काळोखही त्याला जाणवला नाही. त्याची तंद्री भंगली ती लॉनमधल्या खांबांवर लागलेल्या लाईट्सने.

राधाला त्याच्या दिशेने येताना पाहून तो खुर्चीत सावरून बसला.

राधा जवळ आली आणि तिने हातातली ‘चिवाज रिगल’ ची बॉटल आणि दोन ग्लास टेबलावर ठेवले.

“घेतोस ना? आय ॲझ्युम घेत असशील..”, राधा म्हणाली

“हो..”

“ऑन द रॉक्स? का सोडा हवाय?”

“सोडा चालेल…”

“ओके, आणते फ्रिजमधून आणि चिप्स चे काही पॅकेट्स आहेत ते पण आणते..”

“राधा… पण हे.. कश्यासाठी?”

“तू दुपारपासून जे असंख्य प्रश्न चेहऱ्यावर घेऊन फिरतो आहेस ना? त्याची उत्तर देण्यासाठी.. इरिटेट होतेय मला तुझा तो प्रश्नांनी भरलेला चेहरा बघुन… त्यानंतर मला आणि कदाचित तुला सुध्दा ह्याची गरज लागेल..”, किंचीत हसत राधा म्हणाली आणि ती परत किचेनकडे गेली.

कबीर तिच्या पाठमोऱ्या आकृतीकडे बघत होता. मरून रंगाचा स्लिव्हलेस टॉप आणि मोरपंखी रंगाच्या लॉंग स्कर्ट मध्ये राधा खरंच खुप सुंदर दिसत होती. का कुणास ठाऊक पण ती नुसती समोर आली तरी कबीरला आपल्या हृदयाच्या वाढलेल्या ठोक्यांची जाणीव होई.

“डॅम्न आय लव्ह हर…”, कबीर स्वतःशीच पुटपुटला.

राधा येईपर्यंत त्याने कॅम्पफायरसाठी बनवलेल्या जागेत काही लाकडं रचली आणि त्यावर रॉकेल टाकून विस्तव पेटवला.

हवेमध्ये मस्त गारवा पसरला होता. काही अंतरावरच असलेल्या नदीवरून आलेला गार वारा मधूनच अंगावर शहारे आणत होते.

कबीरने दोन पेग बनवले आणि तो खुर्चीत टेकून बसला.

“मी राधा.. अं.. रादर मी अनुराधा.. अनुराधा दीक्षीत, मॅरीड टू अनुराग दीक्षीत, दी वेल नोन मिडीया बिझीनेस टायकुन…”

कबीरने प्रचंड प्रयत्नांनी आपला चेहरा स्थिर ठेवला, पण 'मॅरीड टू' ह्या दोन शब्दांनी त्याला आतून पुरतं हलवून सोडलं होतं.

“ओह कमऑन, हाऊ कुड धिस बी..”, त्याचं मन जोर जोरात आक्रंदत होतं.

“राधा.. खरं तर किती छान नाव ठेवलं होतं माझ्या आई-वडीलांनी माझं, पण लग्नातल्या नाव बदलायच्या ह्या विचित्र पध्दतीत पुरुषी अहंकार आड आला आणि अनुरागचा ‘अनु’ माझ्या नावापुढं चिकटवला गेला. पण हरकत नाही. मी जुळवून घेतलं.

हनिमुनला खरं तर मला मस्त युरोप फिरायचा होता. खरं तर ठिकाण महत्वाचं नसतं म्हणा.. महाबळेश्वरला गेलो असतो तरी काहीच हरकत नव्हती. पण फॉरेन-ट्रिपच करायची होती तर युरोपला काहीच हरकत नव्हती. पण आम्ही गेलो कुठे? शांघायला? का? कारण अनुरागना त्या भेटीतच काही बिझीनेस कॉन्फरंन्स पण करायच्या होत्या. म्हणजे चाललोच आहोत मिटींग्स अ‍ॅटेंन्ड करायला तर हनिमुन पण उरकून घेऊ…” निरर्थकपणे हवेत हात हलवत राधा म्हणाली…

“अर्थात शेवटी बायकोने नवऱ्याच्या खांद्याला खांदा लावुन, किंवा त्याच्या पाठीशी उभं राहून सदैवं ममं म्हणायचं असतं नाही का? मी तेथे पण जुळवून घेतलं.. हनिमुनचे ते शुश्क मोरपंखी दिवस संपवून मी अनुरागच्या त्या महालात रहायला आले. दिमतीला सगळं होतं. नोकर-चाकर होते, गाड्या होत्या, पैसा बक्कळ होता.. काही नव्हतंच तर प्रेम. आजुबाजुला वावरणाऱ्या खोट्या भावना चेहऱ्यावर घेऊन फिरणाऱ्या लोकांमध्ये मी हरवून गेले. मला हवं असलेलं माझं प्रेम मला फक्त चित्रपटांतच दिसत राहीलं.

“पहील्या पहील्यांदा मी स्वतःला समजवायचा, बदलवायचा प्रयत्न केला. अनुराग नसले म्हणून काय झालं. मला जे पाहीजे ते माझ्याकडे आहे.. सो गो आऊट, एन्जॉय लाइफ़. नविन मित्र-मैत्रीणी बनव, नविन सोशल-लाईफ़ आहे हॅव फन.. पण मला काही केल्या ते जमेना.”

“ओह लुक मिसेस दीक्षीत…”

“ती बघ.. अनुरागची बायको.. गॉड शी इज सो डल..”

“मिसेस अनुराग..”

“माझं स्वतःच काही अस्तीत्वच राहीलं नव्हतं. ह्या सगळयाला कंटाळून मी माझ्या कॉलेजच्या मित्र-मैत्रीणींबरोबर एकदा पार्टीला गेले. अर्थात त्यांना परवडण्यासारख्या साध्या हॉटेलमध्ये. मला सुध्दा माझे पैसे उगाच वापरायचे नव्हते, कदाचित तो उगाचच ‘शो-ऑफ’ वाटला असता. सो गेले. खुप मस्ती केली आम्ही. वाट्टेल तसे हसलो-खिदळलो, टपोरी शिव्या दिल्या. डिजे च्या तालावर राऊडी डान्स केला. मस्त मुड जमला होता, तो खर्रकन उतरला घरी आल्यावर.

अनुराग मला वाट्टेल तसं बोलले. जो तमाशा करायचाय तो घरात कर बाहेर नाही म्हणून दम भरला. त्या दिवसानंतर प्रत्येकवेळी ‘बॉडीगार्ड’ च्या नावाखाली एक माणुस सतत माझ्याबरोबर फिरु लागला. तो कश्यासाठी होता हे न कळण्याइतपत मी दुध-खुळी तर नक्कीच नव्हते.”

राधाने आपला रिकामा ग्लास खाली ठेवला आणि कबीरने तो पुन्हा भरून तिच्याकडे दिला.

“ए तुला यो.लो. माहीते?”, अचानक राधाने विचारले

“यो.लो.? यु मिन. वाय.ओ.एल.ओ. यु-ओन्ली-लिव्ह वन्स ना?”, कबीर

“येस.. यु-ओन्ली-लिव्ह वन्स !, हे बघ.. कॉलेजमध्ये असताना मी मानेवर इन्क केलं होतं..” राधाने मान वळवली आणि मानेवरचे केस बाजुला करून तिने तो टॅटू कबीरला दाखवला.

“तो टॅटू मला त्या घरात बोचु लागला होता. आयुष्यातला प्रत्येक दिवस मला वाया गेलेल्या क्षणांची आठवण करून देत होता कबीर.”, अश्रुंचे दोन थेंब राधाच्या डोळयांतून घरंगळत बाहेर आले.

“आय सर्टनली डिझर्व्ड मोर इन लाईफ़.. तुला माहिते, कॉलेजेमध्ये मी हार्ट-थॉर्ब होते. दिसायला छान आहे, अभ्यासातही चांगली होते. वागायला पण मी कधी माजुर्डेपणा केला नाही. सगळयांशीच मी मोकळेपणाने वागायचे. एका स्माईलवर कित्येक जणांना पटवता आलं असतं मला. अगदी कोणीच नाही तर गेला बाजार एखाद्या आय.टी. प्रोफ़ेशनलशी लग्न करून अमेरीकेत स्थाईक झाले असते. नॉर्मल जगण्याचा हक्क होता मला.. मग माझ्याच नशीबी हे सोनेरी-पिंजऱ्यातलं जगणं का यावं कबीर…?”

इतक्या वेळ रोखुन धरलेले अश्रु एव्हाना बांध फोडून वाहु लागले होते.

“तू किती ओळखतोस मला? दोन दिवस..! तरी त्या दिवशी तू मला ‘आय-लव्ह-यु’ म्हणालासच ना.. तुझ्यासारखेच कित्ती जण होते माझ्यावर प्रेम करणारे पण मी सगळयांना सोडून अनुरागशी लग्न केलं, कारण ते स्थळ माझ्या आई-वडीलांना योग्य वाटलं म्हणून…”

मनगटाने डोळे पुसत राधा म्हणत होती.

“शेवटी एके दिवशी पेशंन्स संपला आणि मी घर सोडून बाहेर पडले. इथे गोव्यात मला हवं असलेलं मुक्त जिवन मला मिळालं. इथे मला ओळखणारे कोणी नव्हते. नाईट-लाईफ़ला मी गेट-अप चेंज करून जायचे.. ते रंगीत केस.. तो विचित्र ड्रेस.. यु नो ईट बेटर…”, मधूनच हसत राधा म्हणाली…

“ओह येस.. हु एल्स विल..” भुवया उडवत कबीर म्हणाला.. “बट आय गेस.. इट्स ओव्हर.. मला इथून निघायला हवं, तुझ्या मुर्खपणा मुळे.. आय एम शुअर.. माझा फोन ट्रॅक होत असणार.. एव्हाना अनुरागना नक्की कळले असेल की मी इथे गोव्यात आहे ते.. सो धिस इज इट कबीर.. सकाळी जेंव्हा तू उठशील तेंव्हा कदाचित मी इथून गेलेली असेन…”, रिकामा ग्लास टेबलावर ठेवत राधा म्हणालि.

कबीरची आणि तिची नजरानजर झाली. एक प्रकारची हताशता, एक प्रकारची उद्वीग्नता, जिवनात ओढवलेले रितेपण तिच्या नजरेत समावले होते. कबीरची नजरानजर झाली तरी तिने आपली नजर हटवली नाही.

काय सांगु पहात होती ती नजर? तिच्या मनात सुध्दा कबीरबद्दल काही भावना होत्या, की तो कबीरच्या मनाचा एक खेळ होता?

कबीरची आणि राधाची ती शेवटची भेट होती?

राधाची गोष्ट ऐकल्यावर कबीर अधीकच तिच्यात गुंतला होता. तिने अनुभवलेला तो प्रेमाचा रितेपणा कबीरच्याही वाट्याला आला होताच की. मोनिका आणि तो एकत्र असूनही कधी एकत्र आले एकत्र नव्हते. प्रेमाची भुक त्याला सुध्दा होती आणि ते प्रेम त्याला का कुणास ठाऊक, पण राधाच्या रुपाने मिळेल ह्याची खात्री होती.

राधा उठून आपल्या रुमकडे निघाली आणि कबीरच्या मनात प्रचंड चलबिचल सुरु झाली. काय करावं? काय करावं म्हणजे राधाला थांबवता येईल. कसंही करून कबीरला राधाला नजरेआड होऊ द्यायचं नव्हतं.

राधा जेथे कुठे जाणार आहे, तेथे तेथे आपण सुध्दा तिच्या बरोबर जावं? पण राधा का म्हणून आपल्याला बरोबर घेऊन जाईल?

राधाला सांगावं की फोन निट चालू झालाचं नव्हता?

पण तिने बघीतला होता फोन चालु झालेला, आणि आपल्या सांगण्यावर ती का विश्वास ठेवेल, तिला तिचं स्वातंत्र्य महत्वाचं आहे..

काय करावं..? कबीरची मतीच गुंग झाली होती.

“राधा…”

“हम्म?”

“राधा.. आय एम सॉरी..”

“कश्याबद्दल? आय मीन कश्या-कश्याबद्दल?”, काहीसं हसून राधा म्हणाली..

“ते मी सकाळी तुला.. ते गेटपाशी म्हणालो… आय-लव्ह-यु.. ते नको होतं म्हणायला!”

“ओह.. सो यु डोन्ट लव्ह मी?”, डोळे मोठ्ठे करत राधा म्हणाली..

“नो.. !.. आय मीन येस.. ! आय मीन.. खुपच चाईल्डीश झालं ना ते.. आपली ओळख ती कितीशी? आपण काही कॉलेजमधले नाही.. असं इन्फ़ॅच्युएशन दाखवायला..”

“तुला खरंच जायलाच हवं का?”, थोड्यावेळ थांबुन कबीर म्हणाला

….

“निदान उद्या जायच्या आधी एकदा मला भेटशील?”

“मी सकाळी लवकर निघेन कबीर, सोफी ऑन्टी उठायच्या आधी..”

“प्लिज राधा.. लुक.. मी काही तरी नक्की मार्ग काढेन आणि तुला जावं लागणार नाही..”

“ईट्स ऑफ़ नो युज कबीर..”

“हे बघ.. जर मार्ग निघाला तर? विल यु स्टे?”

राधाच्या मनातली चलबिचल तिच्या नजरेत दिसत होती.

“तुला वाटतं काही मार्ग निघेल?”

“आय थिंक सो..”

“ऑलराईट..”, राधाने घड्याळात बघीतले १२.३० वाजून गेले होते.. “तुझ्याकडे ५ तास आहेत कबीर... नंतर कदाचित मी गेलेली असेन..” असं म्हणून राधा खोलीकडे निघून गेली.

कबीरला स्वतःचा प्रचंड राग येत होता.

“काय गरज होती तिचा फोन चालू करून बघायची?”

“काय गरज होती, अततायीपणा करायची?”

“मुर्ख कुठला.. बस आता बोंबलत...”

कबीर स्वतःलाच शिव्यांची लाखोली वाहात होता. घड्याळाचे काटे बुलेट-ट्रेनच्या वेगाने धावत होते.

विचार करून करून कबीरच डोकं ठणकायला लागलं होतं. व्हिस्कीचा अंमल वेगाने डोकं हलकं करत होता खरा, पण त्यापुढे कबीरला काही सुचतच नव्हतं.

एकीकडून येणारा नदीवरचा गार वारा आणि दुसरीकडे पेटलेल्या निखार्‍यांची उब कबीरला सुखावत होती. कबीर खुर्चीतच रेलून बसला. कॅफे मध्ये राधाचे झालेले पहीले दर्शन कबीरला राहून राहून आठवत होते. अतीव सुखाने कबीरने डोळे मिटून घेतले. कॅफेचा तो प्रसंग जणु एक चलचित्रपट झाला होता आणि कबीर प्रेक्षक. पाहीजे तसा, पाहीजे त्या अॅंगलने कबीर तेच दृश्य पुन्हा पुन्हा पहात होता. स्लो-मोशन मध्ये दरवाज्यापासून कबीरपर्यंत येणारी राधा... वाऱ्याच्या झुळकीने चेहऱ्यावर येणाऱ्या तिच्या केसांच्या बटा..तिच्या त्या चंदेरी बांगड्यांची नाजुक किणकीण, तिचे टपोरे डोळे....

विचार करता करता कबीरला झोप लागली.

पहाटे कधीतरी, पेटवलेला विस्तव विझला, निखाऱ्यांची उष्णता त्या थंडीत विरून गेली आणि हवेतला गारठा अंगाला झोंबु लागला तसा कबीर खाड्कन जागा झाला.

पहीले काही क्षण आपण कुठे आहे ह्याचंच भान त्याला येईना. जेंव्हा लक्षात आलं तेंव्हा पट्कन त्याने घड्याळात नजर टाकली.

पहाटेचे ३.३० वाजत आले होते

“शिट्ट..”, कबीर चरफडत उठला

इतका महत्वाचा वेळ त्याने वाया घालवला होता.

एखाद्या पिंजऱ्यात कोंडलेल्या वाघासारखा उठून तो इकडून तिकडे येरझाऱ्या घालु लागला.

“कसं ही करून राधाला थांबवलंच पाहीजे.. पण कसं?”

अचानक त्याला रोहनची आठवण झाली. त्याने फोन उचलला आणि रोहनचा नंबर फिरवला.

एक रिंग..

दोन रिंग..

दहा रिंग....

पण पलिकडून काहीच उत्तर नाही.

फोन बंद झाला.

कबीरने परत नंबर फिरवला..

वाजून वाजून फोन परत बंद झाला.

“अरे यार.. काय करतोय हा रोहन…कुंभकरण.. इथे माझं आयुष्य टांगणीला लागलंय आणि हा झोपतोय काय..?”

कबीरने पुन्हा नंबर फिरवला…

६-७ वेळा रिंग वाजल्यावर पलीकडून रोहनचा अर्धवट “हॅल्लो..” ऐकू आलं

“रोहन? रोहन उठ.. कबीर बोलतोय.. उठ लेका..?”

कबीरचा आवाज ऐकताच रोहन जागा झाला. टेबलावरच्या घड्याळात वेळ बघत रोहन म्हणाला, “कबीर, सगळं ठिक आहे ना? अरे एवढ्या रात्री फोन?”

“अरे काही ठिक नाहीये रे बाबा.. बर ऐक.. मला हेल्प हवीय तुझी.. आत्ता..”, कबीर इंपेशंटली म्हणाला

“काय झालं आता? काय घोळ घातलास?”

“अरे राधा चाललीय कुठे तरी.. प्लिज तिला थांबवायचंय.. मार्ग सांग काहीतरी..”, एका दमात कबीरने सांगून टाकलं?

“म्हणजे? कुठे चाललीय राधा.. आणि इतक्या रात्री? का? आणि मी कसं तिला थांबवायचं ते सांगू?”, वैतागून रोहन म्हणाला.

“चं, अरे यार.. ती गेली तर खरंच मी वेडा वगैरे होईन रोहन.. तुझी.. तुझी नोकरी जाईल.. एका वेड्या लेखकाला काय गरज मॅनेजरची… अं?”

“कबीर.. जरा मला समजेल अश्या भाषेत बोलशील का प्लिज?” रोहन
“सांगतो.. ऐक..” असं म्हणून कबीरने आत्तापर्यंत घडलेल्या सर्व घटना त्याला ऐकवल्या..

“अरे पण तिला समजाव ना. नसेल पण फोन ट्रॅकींगवर टाकला..किंवा फोन पुर्ण नव्हता चालु झाला वगैरे..”, कबीरच सांगून झाल्यावर रोहन म्हणाला..
“अरे झालंय सगळं सांगून तिला.. पण तिला रिस्क घ्यायची नाहीये.. तिला पक्की खात्री आहे की फोन ट्रॅकींगवर नक्की असणारचं…”, कबीर कपाळावरून हात फिरवत म्हणाला.

“बरं.. दोन मिनीटं दे.. मी रेस्टरुमला जाऊन येतो..”,रोहन

“तुझ्या…”

“गप्प बस.. एक तर असं रात्री अपरात्री उठवतोस.. डोकं तर चालायला हवं ना.. अरे जरा तोंड बिंड पण धुतो..आलोच मी..” कबीरला पुढं काही बोलायची संधी न देता रोहन फोन चालु ठेवून गेला…

दोन मिनीटांनी परत रोहन फोनवर आला..

“सुचलं काही”, कबीरने विचारलं

“कबीर साहेब, अहो उगाच नाही इतकी वर्ष मी तुमचा मॅनेजर.. रोहन म्हणतात मला..”

“म्हणजे? सुचलं काही? सांग.. पट्कन सांग..”, उताविळ होत कबीर म्हणाला

“सुचलं मला नाही, तुलाच सुचलं होतं..”, रोहन

“अरे काय कोड्यात बोलतो आहेस, निट सांग की..”, कबीर

“अरे म्हणजे.. तुझं ते दुसरं रॉबरीवरचं पुस्तक..”

“हं.. त्याचं काय? ते कुठून आलं आत्ता?”

“अरे त्यातच तर सोल्युशन आहे.. आठव.. त्यातला एक सिन तू म्हणाला होतास ‘दृश्यम’ चित्रपटातपण वापरला आहे म्हणून..?”

“अरे नाही आठवत ए बाबा.. सोल्युशन काय ते सांग पट्कन…”, कबीर..

“हे बघ.. राधाचं सिम-कार्ड आहे ना? का ते पण तुटलं?”, रोहन..

“आहे.. सिम आहे, फोन तुटला होता..”, कबीर

“गुड.. मग एक काम कर.. उद्या एक स्वस्तातला फोन घे.. त्यात तिच सिम-कार्ड टाक, फोनची बॅटरी फार चार्ज न करता, फोन चालु कर.. आणि दे टाकून तो फोन एखाद्या मालवाहू ट्रक मध्ये…”, रोहन..

“ओह्ह.. येस्स आठवलं… तो फोन त्या ट्रकबरोबर जाईल कुठेतरी दुसरीकडे.. आणि दिवसभरात कधीतरी बॅटरी संपली की बंद पडून जाईल.. सो ट्रॅकिंगवर दिसेल की राधा गोव्यातून बाहेर पडलीय आणि दुसरीकडेच कुठेतरी आहे…”, आनंदाने एक उंच उडी मारत कबीर म्हणाला..

“जमलं बुवा.. हुश्श..”, हसत हसत रोहन म्हणाला..

“रोहन्या यार.. यु आर जिनीयस.. थॅंक्यु सो.. मच..”

“अहो तुमचीच आयडीयाची कल्पना आहे ही.. मी फक्त आठवण करून दिली…”

“हो यार.. खरंच डोकंच चालत नव्हत माझं..चल ठेवतो फोन आणि आत्ता राधाला जाऊन सांगतो हा प्लॅन..”, कबीर

“कबीर, एक विचारु?”, रोहन म्हणाला

“अरे विचार ना यार.. ये जिंदगी भी मांग ले तो हाजीर है तेरे लिए...”, कबीर

“आर यु शुअर अबाऊट राधा? आय मिन, खरंच तुला ती आवडते का? का फक्त टेंम्परररी...”

“आय एम डॅम्न शुअर रोहन... मी तिच्या बाबतीत चुकुच शकत नाही...”

“पण ती एक विवाहीत आहे, उद्या तिने ठरवलं नवऱ्याकडे परत जायचं तरं?”

“मी तशी वेळच येऊ देणार नाही कबीर... मी तिच्यावर इतकं प्रेम करेन की ति त्या अनुरागला विसरूनच जाईल बघ..”

“इफ़ दॅट्स द केस.. देन गो अहेड.. लिसन टू युअर हार्ट.. आणि हो, परत येशील इकडे तेंव्हा दोघींना घेऊनच परत ये...”, रोहन

“दोघींना?”

“हो.. दोघींना !! राधा.. आणि मेहतांची स्टोरी.. विसरलास का?”

“ओह येस्स.. नक्की नक्की...”

“मेहता विचारत होते, काही जमतंय का म्हणून.. शक्य असेल तर निदान कन्स्पेट मेल कर त्यांना...”

“गप रे.. आत्ता फक्त आणि फक्त राधा.. बघु त्या मेहतांच काय करायचं ते नंतर.. चल तू झोप आता.. बाय..”, असं म्हणून कबीरने फोन ठेवून दिला..

फोन ठेवला आणि कबीर धावतच राधाच्या रुमकडे गेला.

दरवाज्यावर थाप मारायच्या काही क्षण आधी कबीर तेथे घुटमळला. त्याच्या हृदयाची धडधड अचानक वाढली होती.

त्याने आपल्या चेहऱ्यावरून हात फिरवला आणि विस्कटलेले केस निट केले.

“काय म्हणेल राधा? तिला नक्कीच माझ्या ह्या कल्पनेचे कौतुक वाटेल. कदाचित ती लगेच कन्व्हिन्स होईल, नाही झाली तरी मी नक्की करून शकेन.. धिस इज द आयडीया दॅट विल डेफ़ीनेटली वर्क…”

कबीर स्वतःशीच विचार करत होता.

त्याने हलकेच दारावर थाप मारली..

काही क्षण शांततेत गेली.

कबीरने पुन्हा एकदा थोड्याश्या जोरात थाप मारली.

दार हलकेच उघडले गेले..

कबीरने दार उघडले.. आतमध्ये पुर्ण अंधार होता आणि एक विचित्र शांतता..

कबीरने चाचपडत खोलीतला दिवा लावला आणि अंधारात बुडालेली खोली उजळून निघाली.

खोली पुर्ण रिकामी होती.

कबीरचा क्षणभर आपल्या डोळयांवर विश्वास बसेना.. त्याने सभोवार नजर टाकली, पण खोलीत कोणीच नव्हते.

राधाचे कपडे, बॅग्स.. चप्पल्स.. काही काहीच नव्हते…

आपण चुकीच्या खोलीत तर आलो नाही ना म्हणून कबीर माघारी वळणार इतक्यात शेजारच्या टेबलावर ठेवलेल्या कागदाकडे कबीरचे लक्ष गेले..

थरथरत्या हाताने कबीरने तो कागद उलगडला..

*कबीर,*

*सॉरी, तुला न भेटताच जाते आहे.. पण जायलाच हवं. ह्या जिवनाकडून मला खुप अपेक्षा आहेत आणि त्या मला पुर्ण करायच्याच आहेत. मला परत माझ्या आयुष्यात नाही जायचंय कबीर. आय होप यु विल अंडरस्टॅन्ड..*

*कदाचित तू काही मार्ग काढला असतासही, परंतु... हे बघ, तू 'आय-लव्ह-यु' म्हणून आपल्यात कदाचित निर्माण होऊ शकणारी निखळ मैत्री थोपवलीस. ह्यापुढे कितीही प्रयत्न केला असता, तरी तुझ्या आणि माझ्या मनातही तुला माझ्या बद्दल वाटणाऱ्या भावना आल्याच असत्या.. आय नो यु लव्ह मी..! तुझ्या डोळ्यात ते मला स्पष्ट दिसतंय कबीर.. कदाचित तू म्हणला नसतास तरीही..*

*पण मला तेच नको आहे कबीर.. मला रिलेशन्सच नको आहेत, मला अॅटॅचमेंट्स नको आहेत.. मला परत त्यात नाही पडायचंय.. कदाचित मी चुकीची असेन.. आज नाही तर उद्या मला त्याची जाणिव होईलही, पण तोपर्यंत तरी मला माझ्याच टर्मसवर जगायचंय.*

*विश मी लक कबीर.. विश दॅट मी माझी स्वप्न पुर्ण करु शकेन.. मी माझं आयुष्य मला जसं हवंय तसं जगु शकेन.. आणि हो.. तुला सुध्दा तुझ्या पुस्तकासाठी खुप साऱ्या शुभेच्छा. मी तुझ्या पुस्तकाची वाट बघतेय. मी जेथे कुठे असेन.. तुझं पुस्तक पब्लिश झालं की नक्की वाचेन..*

*आणि हो.. शेजारचं पाकीट सोफी ऑन्टीला दे... उगाच उचकून बघु नकोस.. मी त्यात माझा पत्ता किंवा कॉन्टॅक्ट नंबर वगैरे देत नाहीए, रुमचं भाडं आणि अश्याच काही गप्पा.. सो बी अ जंन्टलमन..*

***गुड बाय देन....***

***राधा....***

कबीरच्या जणु पायाखालची जमीनच सरकल्यासारखं वाटलं. क्षणभर त्याला वाटलं की कदाचित राधा त्याची मजा करतेय.. पण रिकामी खोली त्या पत्राच्या सत्यतेची जाणिव करून देत होती. कबीरची लव्ह-स्टोरी सुरु व्हायच्या आधीच संपली होती.

आयुष्यात येऊ घातलेल्या रितेपणाचं ओझं त्याचे पाय सावरु शकले नाहीत.. कबीर ते पत्र छातीशी कवटाळून मट्कन खाली बसला..

कबीर तिथे किती वेळ बसला होता? त्यालाच माहीत नाही. कदाचित दोन मिनीटं असेल, कदाचित दोन तासही असेल. प्रश्न तो नव्हताच, प्रश्न होता राधा निघून गेली पुढे काय?

काही क्षण ओसरल्यावर कबीर भानावर आला. त्याच्यात लपलेला गुन्हेगारी-कथा-लेखक जागा झाला. राधाने काही तरी 'क्ल्यु' सोडला असेलच की. काही तरी, ज्यावरून राधा कुठे गेली ह्याचा पत्ता लागेल. कित्येक सराईत गुन्हेगार सुध्दा गुन्हा करताना नकळत काहीतरी खूण सोडून जातातच...

कबीर नव्या उमेदीने उठला आणि त्याने राधाची खोली शोधायला सुरुवात केली. कपाटं, टेबलाचे ड्राव्हर्स, बेडखाली, डस्टबीन जेथे शोधता येईल तेथे.. पण कागदाचा एक साधा कपटा सुध्दा सापडला नाही.

कबीर स्वतःशीच चरफडत होता... 'थिंक कबीर.. थिंक...'

त्याने घड्याळात पाहीलं.. ३.३० वाजून गेले होते.

अचानक त्याच्या डोक्यात ट्युब पेटली. इतक्या रात्री, राधा इथून चालत तर कुठे गेली नसेल...रिक्षा ह्या आड बाजुला मिळणार नाही.. म्हणजे.. म्हणजे.. तिने नक्कीच कॅब बोलावली असणार.. आणि कॅब बोलवायला तिच्याकडे फोन नव्हता.. म्हणजे...

कबीर धावतच हॉलमधल्या लॅंडलाईन फोनपाशी गेला. फोनचा रिसीव्हर उचलताना कबीरच्या हृदयाची धडधड वाढली होती, शेवटचा हा रिसीव्हर उचलला गेला होता तेंव्हा नक्कीच राधाच्या हातांचा स्पर्श त्याला झाला असणार...

कबीरने रिडायलचे बटण दाबले.. काही क्षण रिंग वाजली आणि पलीकडून आवाज आला.. ‘हॅल्लो.. डायल कॅब…’

कबीरला मैदान मारल्याचा जोश आला..

“हॅल्लो.. मी साऊथ-गोव्यातून बोलतोय.. साधारण तासाभरापुर्वी माझ्या मिसेसने एक कॅब ऑर्डर केली होती.. अम्म.. ॲक्च्युअली तिची लॅपटॉपची बॅग गाडीत राहीलीय.. प्लिज जरा गाडीचा नंबर बघून चेक करता का?”

“वन मिनीट.. होल्ड..”, काही क्षण शांततेत गेले..

“कुठे ड्रॉप होता सर?”, पलीकडून परत आवाज आला.. “एअरपोर्ट…”, कबीरने तुक्का मारला..

“सॉरी सर..”, गेल्या दोन-चार तासात एअरपोर्ट ड्रॉप एक पण कॉल नव्हता..

“प्लिज चेक करून बघा ना एकदा…” कबीर

“चेक केलय सर.. एअरपोर्ट ड्रॉप कुठलाच नव्हता..”

“हे बघा.. लॅपटॉपमध्ये महत्वाचा डेटा आहे..”

“सॉरी सर.. ओल्ड गोव्यातून दीड तासापुर्वी एक पिक-अप होता, पण तो एअरपोर्टला नाही, बस-स्टॅन्डला होता…”

“ओह्ह.. हे कॅब-डायलचाच नंबर आहे ना?”, कबीर

“नो सर.. इट्स डायल-कॅब, आमची ५ वर्षापासूनची सर्व्हिस आहे.. कॅब-डायल चार महीन्यांपुर्वी सुरु झालीय.. आमची क्रेडेबिलीटी घ्यायला सेम नाव ठेवलय सर…”, पुढची पाच मिनीटं तो कॅब-डायलमुळे कसे त्यांचे कस्टमर कमी झाले आहेत आणि अशी नावं ठेवण कसं इल्लीगल आहे ह्यावर भाष्य करत राहीला..

कबीरने त्याच्याशी संभाषण आवरत घेतलं आणि फोन ठेवून दिला.

“सो राधा बसस्टॅन्डला गेली होती तर..”

कबीरने उबरचे ॲप उघडले आणि जवळची कॅब किती अंतरावर आहे बघीतलं. त्याच्या नशीबाने ५ मिनीट ड्राईव्ह-डिस्टंन्सवर कॅब होती. कबीरने पटकन बस-स्टॅंन्ड ड्रॉपसाठी कॅब बुक केली. धावतच तो खोलीत गेला, जिन्स आणि स्पोर्ट्स-जॅकेट चढवले आणि पळतच तो गेटपाशी गेला.

दोन मिनीटांतच कॅब हजर झाली.

कबीर बस-स्टॅंन्डवर पोहोचला तेंव्हा सर्वत्र बऱ्यापैकी सामसुम होती. बस-स्टॅंन्ड बऱ्यापैकी पेंगुळलेलाच होता.

अधूनमधून येणाऱ्या बसभोवती गरम चहा-कॉफी, सामोसा-वडापाव विक्रेत्यांची गर्दी जमे ती तेवढ्यापुरती. बस गेल्यावर परत सर्वत्र शांतता. ख्रिसमस जवळ आल्याच्या खाणाखुणा कॅंन्टीनमधून दिसत होत्या. कांचांवर चिकटवलेले सॅन्टा, रंगेबिरंगी दिव्यांनी पिवळट ट्युबलाईटच्या प्रकाशात सजवलेला साज, क्रिसमस-आणि इअर-एन्डच्या पार्टीजचे माहीती देणारे उभे रहात असलेले साईन-बोर्ड्स दिसु लागले होते.

कबीरची भिरभिरती नजर मात्र राधाचाच शोध घेत होती.

प्रत्येक प्लॅटफॉर्म, वेटींग रुम, लगेज रुम, कॅन्टीन सर्व शोधून झाले पण राधाचा कुठेच पत्ता नव्हता. निराश मनाने कबीरने चौकशी-खिडकी गाठली.

“काका, गेल्या दोन तासात इथून कुठल्या-कुठल्या बसेस गेल्या सांगु शकाल का?”, कबीरने विचारले

“तुम्हाला कुठे जायचेय?”, आळसावलेले समोरचे काका उत्तरले

“नाही, मला कुठे नाही जायचेय.. पण थोडी माहीती हवी होती..”, कबीर

“आता अश्या अनेक बसेस इथून गेल्या.. इथून निघालेल्या.. किंवा दुसरीकडून आलेल्या पण प्रवासी थांबा म्हणून थांबलेल्या.. तुम्हाला कुठल्या हव्यात?”

“सगळ्या सांगा...”, कबीर अधीरतेने म्हणाला आणि खिश्यातून एक शंभराची नोट काढुन त्याने खिडकीतून सरकवली.

पुढची ५ मिनीटं त्या काकांनी अनेक विविध गावांची यादी वाचली. राधा ह्यापैकी कुठल्याही बसमधून गेली असु शकत होती. हा प्रकार म्हणजे गवताच्या गंजीत सुई शोधण्यासारखे होते. शिवाय ह्या बसेसचा पाढा फक्त स्टेट-ट्रांन्स्पोर्टचा होता. स्टेशनच्या बाहेरही अनेक प्रायव्हेट बसेस उभ्या होत्या.

कबीर हताश मनाने कपाळावर हात ठेवून उभा राहीला.. राधा एव्हाना त्याच्यापासून कित्येक किलोमीटर दूर अनभिज्ञ दिशेने निघून गेली होती.

**१५ दिवसांनंतर...**

मेहतांच्या ऑफीसमध्ये रोहन कोल्ड कॉफीचे घोट घेत बोलत होता..

“नो सर... १५ दिवस होऊन गेले, कबीरचा काहीच पत्ता नाही. त्याचा फोन स्विच्ड ऑफ येतोय, आणि त्याच्या हॉटेलच्या.. आय मिन.. त्या होम-स्टेचा सुध्दा माझ्याकडे काहीच नंबर नाहीये...”

“हाऊ कॅन ही डू धिस रोहन? शेवटी हा बिझीनेस आहे.. इतक्या दिवसांत निदान आम्हाला कथेची एक कंन्सेप्ट तर मिळायला हवी होती. मला सुध्दा उत्तर द्यावी लागतातच ना. डेडलाईन्स सगळयांनाच असतात रोहन..”, मेहता काहीसे चिडून बोलत होते.

“आय अंडरस्टॅन्ड सर.. मी खरं तर त्याला सांगीतलं सुध्दा होतं की कंन्सेप्ट मेल कर म्हणून. कबीर मुद्दाम असं करणार नाही. नक्कीच काही तरी प्रॉब्लेम झाला असेल..”, रोहन

“मग आता काय करायचं आपण?”, मेहता

“सर मला वाटत हा आठवडा आपण वाट बघुयात.. कबीर नक्की कॉन्टॅक्ट करेल..”, रोहन

“आय होप सो रोहन.. नाही तर मला हा प्रोजेक्ट नाईलाजाने कॉल ऑफ करावा लागेल.. पुस्तकांची पाईपलाईन आमच्याकडे आहे.. बाकीच्यांनी मी इतके दिवस होल्डवर ठेवु शकत नाही..”

“शुअर सर.. मी समजु शकतो..”, रोहन बोलतच होता इतक्यात त्याच्या मोबाइलची रिंग वाजली..

“कबीरचा फोन..”, रोहन अत्यानंदाने म्हणाला.. त्याच्या मनावरचे मोठ्ठे दडपण उतरले होते. एकतर कबीरची काळजी होतीच.. पण मेहता जसं म्हणत होते, तसं खरंच प्रोजेक्ट हातचा गेला असता तर पंचाईत झाली असती..

“मे आय?”, रोहन खुर्चीतून उठत मेहतांना म्हणाला

मेहतांच्या संमतीची वाट न बघताच रोहन केबीनमधून बाहेर पडला.. “अरे काय हे कबीर, काय पत्ता आहे तुझा? १५ दिवस होऊन गेले तुझा फोन सुध्दा बंद आहे, तुला मेहतांना कंन्सेप्ट मेल कर म्हणलो होतो त्याचंही काही उत्तर नाही.. कुठे आहेस कुठेस तु?”, रोहन

“मी ऑफीसमध्येच आहे रोहन..?”, कबीर थंड स्वरात म्हणाला…

“ऑफीसमध्ये.. यु मिन तुझ्या ऑफीसमध्ये?”, रोहन

“हो.. माझ्याच ऑफीसमध्ये..”, कबीर

“कधी आलास कधी तु?”

“दहा दिवस झाले…”

“व्हॉट… दहा दिवस झाले तुला इथे येऊन आणि कुणाला पत्ताही नाही त्याचा.. अरे झालय काय तुला.. इथे मी मेहतांच्या ऑफीसमध्ये अजून कंन्सेप्ट रेडी नाही म्हणून त्यांची बोलणी खातोय आणि तु…”

“डोन्ट वरी रोहन.. मेहतांना घेऊन माझ्या ऑफीसवर ये कंन्सेप्ट काय, पुर्ण कथाच देतो मी…”

“आर यु सिरियस?”, आनंदाने रोहन म्हणाला..

“येस रोहन.. कथा तयार आहे, दहा दिवस मी रात्रं-दिवस ह्यावरच काम करत होतो. मला कुणाचाच डिस्टरबंन्स नको होता, सो फोन बंद ठेवला होता…”

“ओके ओके.. मी.. मी पोहोचतो तासाभरात.. मेहतांना पण घेऊन येतो.. ओके?… ग्रेट यार.. ग्रेट न्युज कबीर…”, केसांमधून हात फिरवत रोहन म्हणाला.

कबीरने छापलेल्या त्या पानांवरून अलगद हाथ फिरवला. `राधा’चं नाव त्याने ‘मीरा’ बदललं होतं, तर मिडीया टायकून ‘अनुराग’ चा कुणी ‘शर्मा’ बनवला होता. पण हे सगळे बदल कथानकापुरते होते. कबीरच्या लेखी त्या प्रत्येक पानांमधून फक्त आणि फक्त राधाचं होती. तिच्याबद्दल लिहीताना कबीर इतका एकरुप झाला होता की लिहीताना कित्येक वेळा त्याला आजुबाजुला राधा असल्याचा भास होई.

आपल्याला इतक्या कमी वेळात राधा का आवडली असावी हा प्रश्न कबीरला राहून राहून पडत होता. राधा अशी एकमेव सुंदर मुलगी नव्हती जी कबीरने बघीतली होती. कबीरची पहीली दोन पुस्तक हिट झाली तेंव्हा कित्येक मुलींचे त्याला फोन यायचे, कित्येक जणी सोशल-मिडीयावर चॅट करताना त्याच्याशी फ्लर्ट करायच्या. पण कबीरला कधीच कुणाबद्दल इतकं आकर्षण वाटलं नाही जितकं त्याला राधाबद्दल वाटत होतं.

“समोरची व्यक्ती आपल्याला केंव्हा आवडते?”, कबीरच्या दोन मनांचा एकमेकांशी संवाद सुरु होता

“जेंव्हा कदाचित त्या व्यक्तीमध्ये आणि आपल्यामध्ये काहीतरी कनेक्शन आहे असं जाणवतं तेंव्हा..”

“म्हणजे कसं?”

“म्हणजे असं बघ, जेंव्हा समोरच्या व्यक्तीशी आपली नजरानजर होते तेंव्हा चेहऱ्यावर काहीही भाव असले तरी, डोळे कधी खोटं बोलत नाहीत.. जेंव्हा त्या व्यक्तीच्या डोळयातले

भाव आपल्या मनाला भावतात, जेंव्हा त्या डोळयात तुसडेपणा नाही तर आपल्याबद्दल प्रेम दिसते तेंव्हा कदाचित..”

“ओह यु मीन.. तुला असं म्हणायचंय की राधा पण तुझ्या प्रेमात पडलीय?”

“माहीत नाही.. कदाचित तो भास असेल.. पण हो मला वाटतं तसं..”

“म्हणजे नक्की कधी असं वाटलं..?”

“त्याच दिवशी रात्री.. तिचे डोळे खुप काही बोलत होते.. खुप काही सांगु पहात होते.. पण काय ते माझं मलाच कळत नव्हतं. किंवा कळत होते, पण वळत नव्हते.

“मग ती तुला सोडून का गेली?”

“हे बघ.. तुझी निगेटीव्हीटी मला पटत नाही…”

“पण तू सुध्दा खुप ऑप्टीमिस्टीक होतो आहेसच की..”

“असेल.. पण माझं म्हणणं खरं की खोटं हे राधा भेटल्याशिवाय कळणार नाही..”

कबीरचा हा दोन मनांचा संवाद अखंड चालु होता. कधी ह्या मनाचा विजय तर कधी त्या.. पण त्या दोघांच्या भांडणात कबीरची मात्र प्रचंड फरफट होत होती.

ते दहा दिवस कबीरने स्वतःला पुरते कोंडून घेतले होते. राधाबद्दल लिहीताना, तिच्याबद्दलच्या भावना मांडताना त्याला कुणाचीही मध्ये मध्ये लुडबुड नको होती.

लिहून झाल्यानंतर जणु कबीर पुर्ण रिता झाला होता. पहिल्यांदा जेंव्हा त्याने ते पुस्तक वाचले तेंव्हा त्याला स्वतःचेच आश्चर्य वाटले होते. खून-मारामाऱ्या, दरोडे, किडनॅपिंग लिहीणारा अचानक असे प्रेमरसाने ओतप्रोत भरलेले लिखाण करु शकतो ह्यावर त्याचा विश्वासच बसत नव्हता. पुस्तक मार्केटमध्ये यशस्वी ठरो किंवा न ठरो, फक्त एकदा राधाने हे पुस्तक वाचावे एवढीच कबीरची मनोमन इच्छा होती. प्रत्यक्षात आपल्या मनातल्या भावना

तिला बोलून दाखवु शकलो नाही, कदाचित लिखीत शब्दांच्या रुपाने ह्या भावना तिच्यापर्यंत पोहोचाव्यात असे त्याला वाटत होते.

एकदम पुस्तकच तयार आहे हे ऐकल्यावर मेहतांची कळी खुलली होती.

“हॅल्लो यंग मॅन..”, कबीरच्या ऑफीसमध्ये शिरताच मेहता म्हणाले

“हॅलो सर.. सॉरी, मी तुम्हाला कॉन्टॅक्ट नाही करु शकलो”, कबीर..

“इट्स ओके सन, नो प्रॉब्लेम अॅट ऑल..”, मेहता

कबीरने त्यांना प्रुफ़-रिडींगसाठीच्या खोलीत बसवले आणि त्यांच्या हातात ती छापील पाने ठेवली.

“मी कॉफी पाठवून देतो..”, कबीर मेहतांना म्हणाला…

“एक नाही पुरणार… जो पर्यंत वाचून होत नाही तो पर्यंत पाठवत रहा..”, मेहता हसत हसत म्हणाले.

मेहता खोलीत गेल्यावर रोहन कबीरकडे आला..

“अरे काय हे? जरा सांगशील का कुठे होतास ते? आणि राधाचं काय झालं? घेऊनच आलास की काय तिला? अं?”, चेष्टेने रोहन म्हणाला खरा, पण कबीरच्या चेहऱ्यावरची उदासी पाहून त्याच्या एकुण प्रकार थोडाफार लक्षात येत होता.

“काय झालंय? एव्हरीथींग ऑलराईट?”, रोहन

“नो रोहन.. नथींग इज राईट… नथींग इज राईट..”, कबीर

“यु वॉंट टू टॉक?”, रोहन

“नो..डोन्ट वॉंट टु.. त्यापेक्षा एक काम कर.. मेहतांबरोबर तू पण एकदा वाच.. जे घडलं, जसं घडलं ते सगळंच्या सगळं लिहीलय मी त्यात..”, कबीर म्हणाला... “ओके देन..”, असं म्हणून रोहनही मेहता बसले होते त्या खोलीत गेला.

साधारण ३ तासांनंतर दोघंही जण खोलीतून बाहेर आले...

“एस्कलंट.. एक्स्लंट.. सुपर्ब.. वेल डन मॅन..”, मेहता खुशीने बाहेर आले...

“मी म्हणलो नव्हतो.. हे शिवधनुष्य कबीर पेलणार म्हणून..”, रोहनची पाठ थोपटत मेहता म्हणाले...

“थॅंक्यु.. थॅंक्यु सर...”, कबीर

“पण मला शेवट कळला नाही.. आय मीन अशी अर्धवट वाटली मला गोष्ट.. ती ‘मीरा’ अशी अचानक त्याच्या आयुष्यातून निघून जाते... गोष्टीला काहीतरी शेवट हवा ना. निदान ती का गेली, कुठे गेली.. नायकाचं पुढे काय झालं वगैरे...”, मेहता

“येस सर.. गोष्ट अपुर्ण आहे.. मुद्दामच ठेवलीय...”, कबीर

“म्हणजे..”

“म्हणजे आपण ह्याचा दुसरा भाग काढणार आहोत ६-८ महीन्यांत...”

“ओहो.. स्प्लेंडीड आयडीया.. गुड बिझीनेस माईंड..”

"तो कुठल्याश्या सिनेमातला डायलॉग नाही का सर...फिल्मोंकी तरहं हमारी जिंदगी मै भी एन्ड मै सब ठिक हो जाता है.. हॅपीज एन्डींग्ज.. और अगर सब-कुछ ठिक ना हो.. तो वो द एन्ड नही है दोस्तों.. पिक्चर अभी बाकी है..."

कबीर बोलत होता आणि नविन बिझीनेसची संधी पाहून मेहता खुश होत होते.. पण ह्या क्षणी कबीरला कोणी समजु शकत असेल तर तो होता रोहन...

"ऑलराईट.. कबीर... रोहन.. मी ह्या प्रिंट्स आमच्या प्रुफ़-रिडरना देतो.. थोडे फार बदल करून फायनल-ड्राफ्ट पाठवून देतो २-४ दिवसांत आणि मग.. मग छपाई चालु करु.. पानांची आणि नोटांची... काय??" असं म्हणून मेहता निघून गेले...

मेहता निघून गेल्यावर तेथे एक विचित्र शांतता पसरली होती. काही क्षण शांततेत गेल्यावर रोहन म्हणाला..

"तू राधाचा फोटो काही मला दाखवला नाहीस.. पण तुझं पुस्तक वाचल्यावर आय कॅन इमॅजीन हाऊ ब्युटीफुल शी इज..."

"हम्म.."

"सो.. आता काय करायचं ठरवलं आहेस.."

"काहीच नाही.. काहीच ठरत नाहीये..."

"यु नो तिचं लग्न झालंय... तुला हे ही माहीत नाहीये की तिला तू आवडतोस की नाही.. पुन्हा भेटल्यावर.. जर कधी भेटलीच तर ती तुझ्याबरोबर येईल की नाही..."

"हम्म.."

"तरी पण तुला तिला विसरायचं नाहीये...??"

"ते इतकं सोप्प नाहीये रोहन..."

“मी कुठे म्हणतोय सोप्प आहे.. पण मला वाटतं तू प्रयत्न करावास. विसरु नकोस तू लेखक आहेस.. असा देवदास होऊन राहीलास तर ही एक-दोन पुस्तकांनंतर परत आपलं…”

कबीरने चिडून रोहनकडे पाहिलं..

“हे बघ.. मी रिअलिस्टीक बोलतोय.. कदाचित तुला आत्ता पटणार नाही.. पण तू शांतपणे विचार कर ह्याचा… बाय द वे.. मोनाचा ४-५ वेळा फोन येऊन गेला.. तुला खुप ट्राय करत होती.. पण तुझा फोन बंदच होता…”, रोहन..

“मोनिकाचा फोन? आणि माझ्यासाठी?”, आश्चर्यचकित होत कबीर म्हणाला..

“हम्म.. इतके दिवस तुझा फोन बंद तिला चिंता वाटत होती.. म्हणून सारखं मला फोन करून विचारत होती तुझ्याबद्दल..”

“स्ट्रेंज..”

“हे बघ कबीर.. कदाचित मोनिकाच तो मार्ग असेल तुला ह्यातून बाहेर पडण्याचा.. झालं गेलं सगळंच विसरून जा.. तुझ्या आणि मोनामधली भांडणं आणि राधा… स्टार्ट अ न्यु लाईफ़.. तिला फोन कर एकदा.. पुढे जे नियतीच्या मनात असेल ते होईल..”, कबीरच्या खांद्यावर थोपटत रोहन म्हणाला आणि तो बाहेर निघून गेला..

कबीर बराच वेळ हातातल्या फोनकडे बघत राहीला आणि शेवटी त्याने मोनिकाचा नंबर डायल केला….

“कसा आहेस?”, मोनिकाने वेटरला ऑर्डर देऊन कबीरला विचारलं.

“मी मस्त.. तु?”, कबीर

“मी पण एकदम मस्त…”

“तू अजून वेट कमी केलंस का? झिरो फिगर वगैरे करायचीय का काय? हडकुळी वाटायला लागलीयेस…”

“हो म्हणजे अरे पण ठरवून वगैरे नव्हते केले.. मी साऊथ-अफ्रिकेला होते दीड महीना..”

“वॉव्व.. कधी?”

“लास्ट मंथ.. रिॲलीटी-शो चे स्टील्स करायचे होते.. सो असाईन्मेन्ट्स साठी गेले होते. तुला माहीते एक तर मी नॉन-व्हेज तितकेसे खात नाही.. त्यामुळे खाण्याचे जरा हालच झाले तेथे…”

“सहीच की.. बोलली नाहीस काही..”

“हम्म.. विचार आला होता मनात तुला करावा फोन.. पण मग गडबडीत राहून गेले… ए पण.. तू पण म्हणे मेहतांच बुक करतोएस..?”

“कुणी सांगीतलं? रोहन का?”

“हो.. पण ग्रेट रे.. मेहता म्हणजे एकदम भारी पब्लिकेशन.. जाम पैसे कमावले असशील नै…”

“हो.. वेल नोन आहे.. आणि माझं गोवा पण त्यांनीच स्पॉन्सर केले..”

“कुsssssल.. सो धिस डिनर इज फ़ॉर सेलेब्रेशन ऑफ़ युअर सस्केस..”

पुढचा दीड तास दोघांनी भरपुर गप्पा मारल्या.. लाईक ओल्ड टाईम्स. जणु काही मध्ये घडलेच नव्हते. सुरुवातीला असलेला थोडा नर्व्हसनेस नंतर निघून गेला. जुने मित्र भेटल्यासारखे दोघं एकमेकांच्या सानिध्यात रमुन गेले.

“सो.. इट्स ओके इफ़ आय व्हॉट्स-ॲप यु?”, मोनिकाने बाहेर पडल्यावर विचारले

“मी बंद केले व्हॉट्स-ॲप वापरणे..”, कबीर म्हणाला…

“का? कधीपासून?”, आश्चर्याने मोनिकाने विचारले..

“बस्स.. असंच..”, कबीर

“का? सारखी मी ऑनलाईन दिसल्यावर माझी आठवण यायची का?”, डोळे मिचकावत मोनिकाने विचारले..

“कशी आलीयेस..”, विषय टाळत कबीर म्हणाला..

“होन्डा-सिटी घेतली नविन…”, हातातली किल्ली नाचवत मोनिका म्हणाली..

“गुड-गुड.. सो.. तू खरंच तुझी विश-लिस्ट पाळतीयेस की काय? आधी साऊथ-अफ्रिका.. मग होन्डा सिटी.. आय लाईक्ड इट..”, कबीर

“हम्म.. आणि म्हणूनच मी आज तुला भेटायला आलेय..”, मोनिका थोडी सिरीयस होत म्हणाली..

“म्हणजे?”, कबीर

“कबीर.. आय रिअल्ली मिस्ड यु..”, कबीरचा हात हातात घेत मोनिका म्हणाली… “हे बघ आपल्या दोघांकडूनही काही चुका झाल्या…”

“दोघांकडून?”, तिचं बोलणं मध्येच तोडत कबीर म्हणाला..

“ओके.. माझ्याकडून.. आय एम सॉरी.. खरंच सॉरी.. मी चुकीची वागले.. हे बघ, तो काळ वेगळा होता.. मी खरंच माझ्या करिअरच्या नशेत वाहवत गेले.. पण नंतर मला खुप गिल्टी फिल झालं.. आत्ता अफ्रिकेत, सगळ्यांपासून दूर असताना खुप एकटं वाटलं कबीर.. आजुबाजुला वावरणारी सगळी माणसं जणु खोटे-नाटकी मुखवटे चढवलेले पुतळे होते…”

“एनिवेज.. आता ते बोलून काय उपयोग आहे का?”

“आहे.. हे बघ, माझ्याकडून चुक झाली.. मला एक संधी तरी दे कबीर..”

कबीर थोडा अस्वस्थ झाला..

“हे बघ.. मी लगेच सांग असं नाही म्हणत.. पण निदान विचार तरी करावास असं मला वाटतं. लेट्स थिंक ऑफ़ अ पॅच-अप हम्म?”, भुवया उंचावून मोनिकाने विचारलं..

लाईक-ओल्ड टाईम्स, कबीरला मोनिकाचा हा निरागसपणा खुप आवडायचा, विशेषतः तिचे डोळे, न बोलताही खूप काही बोलून जायचे. कबीर जसा अंमळ उंच होता, तितकीच मोनिका छोट्या चणीची होती. कबीरकडे अशी मान वर करून बोलताना कबीरला ती अधीकच क्युट वाटायची.

क्षणभर कबीरला सगळं विसरून मोनिकाला मिठीत घ्यायचा मोह झाला. पण त्याने मोठ्या मुश्कीलीने मनावर ताबा मिळवला.

“आय वोन्ट प्रॉमीस.. पण मी विचार करेन.. निघुयात?”

मोनिकाने काही क्षण कबीरकडे एकटक पाहीले आणि मग म्हणाली.. “ओके.. पण निदान आपण आत्ता एकमेकांचे चांगले मित्र आहोत.. ना?”

“येस्स.. नक्कीच..”, हसून कबीर म्हणाला

“ए.. बाय द वे.. तुझं पुस्तकाचं प्रकाशन कधी आहे?”, मोनिका

“अम्म.. तारीख अजून नक्की ठरली नाही, पण महीन्याभरात असेल..”

“कुल.. इन्व्हाईट कर मला नक्की हं…”

“येस नक्कीच…”

“चलो देन.. बाय फॉर नाऊ..”

“बाय…”

दोघांनी एकमेकांना मैत्रत्वाचे अलिंगन दिले आणि दोघं आप-आपल्या मार्गाने निघून गेले..

जेंव्हा कबीर घरी पोहोचला तेंव्हा त्याच्या मोबाईलचा एस.एम.एस. चा दिवा लुकलुकत होता. कबीरने मेसेज ओपन केले, मोनिकाचा मेसेज होता –

*My heart was really racing when i meet you after so long.. felt the spark in between our relationship again. Dying to meet you again sooooon.. anyways, gn dear, sweet dreams- Mona*

पुढचा एक आठवडा कबीरसाठी कंटाळवाणाच गेला. बहुतेक वेळ त्याने घरात बसूनच घालवला. त्यात डोक्याला त्रास म्हणजे मेहतांच्या ऑफीसमधून प्रुफ़-रिडर डिपार्टमेंटची ई-मेल

आली होती. त्यांना ‘मीरा’ आणि कथेच्या नायकामध्ये अजून काही नविन प्रसंग हवे होते. त्यांच्या मते पेज-लेआऊटसाठी अजून काही कंटेंन्ट्स हवे होते.

कबीर आणि राधामध्ये जे काही घडलं ते सगळं त्याने कथेत उतरवलं होतं. त्यामुळे अजून काही लिहायचं असेल तर काही काल्पनिक कथानक लिहीणं आवश्यक होतं आणि त्यासाठी त्याला पुन्हा राधाचा विचार करणं भाग होतं. अर्थात तो राधाला विसरला होता किंवा विसरायचा यशस्वी प्रयत्न करत होता अश्यातला भाग नव्हता. परंतू नविन प्रसंग लिहीताना त्याला निश्चीतच राधाला पुर्णपणे अंतर्मनात उतरवणे आवश्यक होते. त्या दोघांमध्ये इंटीमेट अर्थात रोमॅन्टीक असे काही घडले नव्हते, पण कथेचा आशय लक्षात घेता कथेच्या नायक-नायिकांमधील प्रेम-प्रसंग गरजेचे होते.

सोफी-ऑन्टीच्या घराच्या मागे जी नदी होती ती कबीरला खुप भावली होती. अनेकदा कबीर स्वतःला राधाबरोबर त्या नदीकिनारी एखाद्या संध्याकाळी इमॅजीन करायचा. कथेसाठी लागणारा प्रसंग रंगवण्यासाठी कबीरने तीच जागा निवडली. समोरचा लॅपटॉप त्याने चालु केला आणि लिहायला सुरुवात केली.

*नदी-काठाकडे जाणारा रस्ता खुपच चिंचोळा होता, त्यात दोन्ही बाजुने दाट झाडी असल्याने पायवाट अधीकच लहान झाली होती. कबीर राधाच्या मागे चालत होता.*

*“तुला माहीते कबीर, ही नदी ना सोफी-ऑन्टीच्या कॉटेजचा यु.एस.पी. आहे.. नुसते ह्या भागातले फोटो काढुन फेसबुकवर एक पेज बनवले ना तरी दिवसाला हजारोंने फोन येतील.. मी जेंव्हा केंव्हा इथून जाईन ना तेंव्हा एक पेज नक्की बनवून ठेवणारे, आयुष्यभर टुरीस्ट येथे येत रहातील..”, राधा बोलत होती. पण कबीरचे कुठे तिच्या बोलण्याकडे लक्ष होते, कबीरचे मन गुंतले होते तिच्या काळयाभोर केसांमध्ये. चालता चालता राधा आपल्या केसांशी खेळत होती. कधी वाऱ्याच्या झुळकीबरोबर मोकळे सोड, कधी केसांच्या टोकांशी स्प्लिट-हेड्स तर नाहीत ना बघ.. कधी उगाचच त्याची बोटांभोवती गुंडाळी कर तर कधी उगाचच मान हलवून केसांना ह्या बाजुने त्या बाजुला करत बस. कबीर पार वेडा झाला होता.*

*तो चिंचोळा रस्ता संपला आणि नदीचे विशाल पात्र कबीरच्या नजरेस पडले तसा तो भानावर आला.*

*“बघ्घ.. कस्सं आहे? आवडलं ना?”, एखाद्या लहान मुलाने मोठ्या कष्टाने काढलेले चित्र समोर धरून फक्त आणि फक्त चांगल्याच प्रतिक्रियेच्या अपेक्षेत पहावे तसे भाव राधाच्या चेहऱ्यावर होते.*

*गुलाबी रंगाच्या टी-शर्टवर राधाने पांढऱ्या रंगाचा सी-थ्रु शर्ट आणि खाली आकाशी रंगाची स्लॅक्स घातली होती. घरातून निघताना लावलेला जॅस्मीनचा पर्फ्युम वाऱ्याच्या झुळकीबरोबर अधीक तिव्रतेने कबीरच्या अंगाअंगात भिनत होता. डोळ्यावरचा गॉगल केसांमध्ये लावत राधा म्हणाली... “हॅल्लो... सांग ना आवडली का जागा?”, तसा कबीर भानावर आला..*

*“ओह येस... खुप्पच मस्त आहे.. कॉफीचा अनलिमीटेड सप्लाय आणि लॅपटॉपला बॅटरी बॅक-अप मिळाला ना तर आठवड्याभरात मी इथे बसून गोष्ट लिहून काढेन...”, कबीर समोरच्या विहंगम दृष्याकडे बघत म्हणाला..*

*“यु नो व्हॉट कबीर, समटाईम्स वुई निड टु गेट लॉस्ट टु फाइंड आवरसेल्फ्स... इथे आल्यावर ना मला सगळं विसरायला होतं...”*

*थोडं पुढे चालल्यावर दगडी चिरांच्या बांधकामाची एक छोटीशी भिंत होती. राधा त्यावर बसली.*

*“तुला भाकऱ्या पाडता येतात?”, कबीरने मातीतला एक चपटा दगड उचलत विचारलं..*

*“भाकऱ्या? यु मिन स्वयंपाकातल्या ना?”*

*“नाही नाही.. हे बघ असं..” असं म्हणून कबीरने तो चपटा दगड नदीपात्रात भिरकावला. पाण्याच्या पृष्ठभागावर ७-८ वेळा आपटत तो दगड लांबवर गेला..*

*“भाकऱ्या काय मग !.. चकत्या म्हणतात त्याला... भाकऱ्या काय???!!!!”, असं म्हणून राधा हसायला लागली*

*“असेल.. मी भाकऱ्याच म्हणतो..” तोंड फुगवून कबीर म्हणाला...*

*“बरं बरं.. भा...क....” असं म्हणून राधा पुन्हा हसायला लागली..*

*कबीर तिच्या हसण्याने बेभान झाला होता. त्याला आजुबाजुचे काहीच सुधरत नव्हते. पक्ष्यांची किलबील, वाऱ्याने झाडांची होणारी सळसळ, दूरवरून ऐकू येणारी सागराची गाज.. काही-काहीच ऐकू येत नव्हते.*

*कबीर ताडताड पावलं टाकत राधाच्या जवळ गेला, त्याने तिला जवळ ओढले आणि आपले ओठ तिच्या ओठांवर टेकवले....*

*बस्स.. हाच तो क्षण.. हाच तो क्षण ज्याला ईटरनिटी म्हणत असावेत.. हाच तो क्षण जेव्हा पूर्ण जग स्तब्ध होऊन जाते, कदाचित ह्याच क्षणामध्ये पृथ्वीने सुध्दा आपली आवर्तने थांबवली असावीत.....*

लिहीता लिहीता कबीर अचानक थांबला.. नुसत्या लेखनाने त्याच्या सर्वांगावर रोमांच उठले होते.. नुसत्या विचाराने त्याच्या हृदयाची धडधड अनेक पटींने वाढली होती.

कबीर खुर्चीतून उठला आणि फ्रिजमधून ज्युसचा एक कॅन घेउन आला. ज्युसचे काही घोट गटागट घश्याखाली उतरवले आणि तो डोळे मिटून शांतपणे खुर्चीत बसून राहीला..

असं नाही की कबीरने आयुष्यात कधी कुणाला ‘किस्स’ केले नव्हते. मोनिकाबरोबर तो अनेकदा ‘किस्स’च्याही पुढे गेला होता. पण हा अनुभव कबीरसाठी पुर्णपणे नविन होता. असेही नाही की राधाबद्दल त्याला शारीरीक आकर्षण होते.. किंबहुना ह्या आधी त्याने राधाबद्दल कधी

'तसला' विचारही केला नव्हता. केवळ पब्लीशरकडून मागणी होती म्हणून त्याने हा काल्पनिक प्रसंग उतरवायला सुरुवात केली होती....

मन शांत झाल्यावर, त्याने पुन्हा लॅपटॉप जवळ ओढला आणि लिहायला सुरुवात केली..

*राधाने कबीरला थांबवायचा कसलाही प्रयत्न केला नाही. मोकळे सोडलेले तिचे केस, कबीरने अचानक जवळ ओढल्याने विस्कटून कबीरच्या चेहऱ्यावर जाऊन बिलगले होते.*

*"सॉरी.. रिअली सॉरी...", आपण अनवधानाने काय केलंय हे लक्षात येताच कबीर बाजुला सरकला*

*राधा काही क्षण डोळे मिटून स्तब्ध बसून राहीली आणि मग जणु काहीच घडलं नव्हतं अश्या मस्करीच्या स्वरात कबीरला म्हणाली, "अपमान झाला की तुमच्यात असं करतात का?"*

*"रिअली सॉरी राधा.. मलाच माहीत नाही मी असं का केलं.. रिअली वॉज नॉट इंटेंन्शनल....", कबीर*

*"ईट्स ओके.. मला अचानक चार्लीची आठवण झाली बघ..", राधा*
*"चार्ली..?? कोण?"*

*"मी गोव्यात आले ना? तेंव्हा हिप्पी बनायचंच हेच डोक्यात घेऊन...किंबहुना अजूनही तो प्लॅन ऑनच आहे.. तर.. एकदा फिरताना, बिचवर मला असाच एक हिप्पींचा ग्रुप भेटला.. रंगेबिरंगी कपडे.. अस्ताव्यस्त वाढलेले केस, खुरटी दाढी, हाता गिटार किंवा ड्रम्स.. मुलीही अगदीच ह्या.... पण मला मस्त वाटली लोकं.. एकदम फ्री.. म्हणून मी भेटायला गेले अशी मुर्खासारखी हिप्पी बनण्यासाठी काय कॉलीफिकेशन लागत विचारायला.. तर त्या चार्लीने असंच एकदम जवळ ओढलं आणि मला किस्स केलं...", राधा..*

*“मग?”*

*“मग काही नाही.. मी एकदम त्याला दूर ढकलंल.. तेंव्हा म्हणाला.. यु आर नॉट रेडी फॉर धिस..”*

*“म्हणजे? हिप्पी व्हायला काय किस्स करता यायला पाहीजे वगैरे काही क्रायटेरिआ आहे का?”*

*“नाही.. म्हणजे त्याचं म्हणणं होतं की, आपण असं एकदम फ्रि वगैरे असलं पाहीजे.. ना जगाची, ना मनाची तमा.. कोण काय म्हणेल.. कुणाला काय वाटेल ह्याची फिकीर करत बसलो तर तो हिप्पी कसला...”*

लिहीता लिहीता कबीर अचानक थबकला.. शेवटचं लिहीलेलं पान त्याने पुन्हा डोळ्याखालून घातलं...

अचानक हा हिप्पी.. आणि चार्ली नाव कुठून आलं त्याच्या लक्षात येईना.. मग एकदम त्याला आठवलं..राधा त्याला हिप्पी आणि चार्लीबद्दल खरंच बोलली होती. हे संभाषण काल्पनिक नव्हते. त्याने पट्कन फोन उचलला आणि रोहनचा नंबर फिरवला..

“रोहन.. मला परत गोव्याला जायला हवं..”, कबीर

“का? काय झालं?”, रोहन

“आय थिंग आय नो.. राधा कुठे असेल...”, कबीर

“म्हणजे?”

मग कबीरने रोहनला शेवटचे ते पान वाचून दाखवले आणि तो म्हणाला.. “राधा मला म्हणाली होती.. आय एम शुअर ती नक्कीच त्या हिप्पी ग्रुपकडे गेली असणार...”

“अरे पण त्याला पण आता महीना होत आला.. कश्यावरून राधा अजूनही तेथेच असेल.. तुला माहिते हे हिप्पी लोकं.. कधी एका ठिकाणी ते थांबत नाहीत…”, रोहन

“आय नो.. बट इट्स वर्थ ट्रायींग..”, कबीर

“आणि ते राइट-अपचे..? मला वाटतं कबीर.. तू मेहतांच काम पुर्ण करूनच जा.. मला माहीते तुझ्या राधाबद्दलच्या भावना.. पण बी प्रोफ़ेशनल.. तू जो पर्यंत कंटेंन्ट्स देत नाहीस तो पर्यंत मेहतांच काम अडून राहील.. मागे तू असाच गायब झालास आणि इथे मला त्यांच ऐकावं लागलं..”, रोहन

“मी गायब नव्हतो रोहन.. उलट मी वेळेच्या आधी त्यांना कथा पुर्ण करून दिली आहे.. नसतीच दिली तर?”, कबीर

“आय नो.. आय नो.. पण तू मला विचारशील तर मी म्हणेन काम पुर्ण करूनच जा.. एकदा तू गेलास कि तिकडे किती वेळ लागेल माहीत नाही… लेट्स प्ले इट सेफ कबीर.. प्लिज…”, रोहन..

रोहन बोलत होता त्यात तथ्य होतं. कबीरकडे दुसरा मार्ग नव्हता…

“पण मग काय करायचं? दुसऱ्या कुणाला तरी पाठवता येईल का?”, कबीर व्याकुळ होऊन म्हणाला..

“मी बघतो काही मार्ग सापडतो का ते.. पण तोपर्यंत तू प्लिज कथेवर फोकस कर…ओके?”, रोहन..

“ओके !”, कबीरने फोन ठेवून दिला, लॅपटॉप पुढे ओढला आणि तो पुन्हा कथा लिहीण्यात मग्न झाला..

ज्या दिवशी राधा कबीरला सोडून निघून गेली होती त्या रात्रीपुर्वीच्या गप्पांच्या सेक्शनचे पान कबीरने लॅपटॉपवर उघडले. ह्यातील प्रसंगात अजून काही भर घालण्याच्या हेतुने कबीरने लिहायला सुरुवात केली..

*“हे बघ राधा.. ठिक आहे.. यु आर नॉट हॅपी विथ युअर हजबंड.. पण नॉट हॅपी विथ लाईफ़..?? मला नाही पटत... तुझं आयुष्य मे बी अनेकींसाठी एक ड्रिम लाईफ़ असेल.. गडगंज नवरा.. हाताशी भरपुर पैसा.. फिरायला २४ तास गाडी, पार्टी लाईफ़, सेलेब्रेटी स्टेट्स.. आय मीन व्हॉट्स रॉंग?”*

*“असेल.. इतरांसाठी असेल.. माझ्यासाठी नाही..”, राधा*

*“पण का? “*

*“कारण मला माझं स्वातंत्र्य महत्वाचं आहे कबीर... मला लग्नानंतर माझं पुर्ण आयुष्य असं डोळयासमोर दिसत होतं. मुलं-बाळं त्यांच खाणं-पिणं.. मग त्यांच शिक्षण.. मग परत दुसरं मुल.. मग परत ते सगळं चक्र.. ठिक आहे.. कदाचित मला हाताशी दहा बायका असतील मदत करायला.. पण म्हणून माझी जबाबदारी तर कमी होत नाही ना...मला हे रुटीनलाईफ़ नको आहे समहाऊ.. निदान आत्ता तरी नाही..”*

*“जस्ट बिकॉझ इट्स रुटीन, डझंन्ट मिन इट्स बोअरींग.. इट इज कॉल्ड लाइफ़.. दॅट एव्हरीबडी लिव्ह्ज.. फक्त त्यात आपल्या प्रमाणे रंग भरायचे असतात.. त्यात थोडा स्पाईस आणून हेच रुटीन लाईफ़ रंगतदार कसं करता येईल हे बघायचं असतं... तुला मुलं बाळं नको होती.. तर तसं सांगायचंस लग्नाआधी.. त्याचं आयुष्य कश्याला खराबं करतेस...?”*
*“तसं नाही.. मी म्हणत नाही की मला आयुष्यभरच असं भटकत रहायचंय.. पण निदान जे काही वर्ष माझ्या हातात होती तोवर तरी? आणि ह्यामध्ये मी माझ्या सो कॉल्ड सोल-मेटची थोडीशी साथ अपेक्षली तर कुठं बिघडलं. जसं मी इच्छा नसताना त्याच्या फाईव्ह-स्टार बोअरींग पार्ट्यांना हजेरी लावत होते.. तसं एखाद्या महीन्यात तो आला असता माझ्या बरोबर डोंगर-दर्‍यांतून फिरायला तर काय बिघडलं असतं ?”*

*“एनिवेज.. लेट्स टॉक समथींग एल्स...”*

*“हेच.. हेच मला आवडत नाही.. तुम्ही सगळे पुरुष एकसारखे.. जरा चार शब्द बोलून तुमचं बोलणं खोडून काढायचा प्रयत्न केला की तुम्ही संवादच थांबवता....”*

*“आता अख्खी पुरुष जात ह्यात आणायची काय गरज? आणि तुमची स्त्री जात अगदी सप्तरंगी किनई...”, वैतागून कबीर म्हणाला...*

कबीरने अजून दोन पानांची भर घातली आणि मग तो थांबला. फाईल-सेव्ह करून इंटरनेटवर अपलोड करून ठेवणे गरजेचे होते. परंतू साईट्स काही उघडेनात. नेहमीचाच इंटरनेट-बंदचा मेसेज पाहून कबीर चरफडला. त्याने घड्याळात नजर टाकली. फक्त सातच वाजून गेले होते. अजून एक तास-दीड तास तो सहज लिहून फाईल्स मेहतांना पाठवून देऊ शकत होता. कदाचित तसे झाले असते तर तो कामातून मोकळा झाला असता आणि राधाच्या शोधार्थ त्याला निघताही आले असते.

खिडकीतून त्याने रस्त्या-पलिकडच्या ‘कॅफे-कॉफी-डे’ मध्ये नजर टाकली. शुक्रवारचा दिवस आणि नुकतेच दोन नविन झळकलेले सिनेमे त्यामुळे सगळी तरुणाई बहुदा सिनेमागृहांकडे वळाली होती. सि.सी.डी तसे ओसच होते.

कबीरने लॅपटॉपचा चार्जर काढला, अंगात एक स्पोर्ट्स जॅकेट अडकवले आणि फ्लिप-फ्लॉप्स घालून तो बाहेर पडला. सि.सी.डी.मध्ये बसून वाय-फाय वापरण्याचा त्याच्या इरादा होता.

सि.सी.डी.चे दार उघडताच मंद कॉफीचा सुगंध त्याच्या नाकात शिरला. एखादी मस्त कॉफी ऑर्डर करावी ह्या विचाराने त्याने खिश्याकडे हात न्हेला आणि त्याच्या लक्षात आले आपण पाकीट न घेताच बाहेर पडलोय.

वैतागून कॉफीचा विचार त्याने बाजुला सारला आणि कोपऱ्यातल्या सोफ्यावर जाऊन त्याने कामाला सुरुवात केली. पहिल्यांदा सेव्ह केलेली फाइल त्याने क्लाऊड-बॅक-अप वर अपलोड केली आणि मग तो उरलेल्या कथेकडे वळला.

साधारण अर्धा-पाऊण तास होऊन गेला असेल तोच वेटरने ट्रे मधून कॉफी आणून कबीरसमोर ठेवली.

“एक मिनीटं...”, कबीर मान वर करून म्हणाला... “मी काहीच ऑर्डर केली नाहीये....”

पण कबीरचे बोलणे पुर्ण व्हायच्या आधीच तो वेटर तो तेथून निघून गेला.

कबीर त्याला थांबवण्यासाठी उठणार इतक्यात त्याचे लक्ष ट्रेच्या कडेला चिकटवलेल्या पिवळया स्टिकी-नोटकडे गेले.

“वन हॉट कप ऑफ हॅजलनट कॅपेच्युनो विथ ३०-सेकंड्स ऑफ़ हिटींग, स्टर्ड नॉट शेक, टु स्पुन स्मकर्स चॉकोलेट संन्डे सिरप विथ एक्स्ट्रा क्रिमी हॅजलनट सिरप... ऐन्जॉय युअर कॉफी...”

कबीरने चमकून आजुबाजुला बघीतले. कबीरची ही फ़ेव्हरेट कॉफी माहीती असणारी अख्या जगात एकच व्यक्ती होती जी कॅफेच्या दुसऱ्या टोकापाशी कबीरकडे हसत बघत होती.. मोनिका..

कबीरने तिच्याकडे बघताच ती हसत कबीरपाशी आली..

“मोना ! तु? इथे कशी?”

“अरे तुझ्याकडेच गेले होते.. पण तुझ्या दाराला कुलुप.. म्हणून परत चालले होते, म्हणलं जाताना बघावं इथे आहेस का.. तर दिसलास..”

“ओह.. थॅंक्स फॉर द कॉफी फर्स्ट..” असं म्हणून कॉफीचा मग उचलून त्याने ओठाला लावला.. पहीला घोट घेऊन त्याने अतिव सुखाने डोळे मिटले आणि तो पुटपुटला.. “पर्र्फेक्ट...”

“बाय द वे.. काय काम काढलंस?”, कबीर

“म्हणजे? काम असल्याशिवाय येऊ नये का मी?”, मोना हसत हसत म्हणाली.. तसा कबीर शांत झाला..

“चिल.. काम होतं म्हणूनच आले होते.. एक गुड न्युज द्यायला.. म्हणजे.. तशी न्युज आहे.. गुड का बॅड तू ठरव…” हसत मोनिका म्हणाली..

“बोल.. काय न्युज आहे..”, कॉफी पित कबीर म्हणाला..

“एSS..एकटाच पिणार आहेस का..? मला कर की ऑफर…”, असं म्हणून मोनिकाने खाली ठेवलेला कॉफीचा कप उचलला आणि दोन-तिन घोट कॉफी घेतली…

“अम्म… मस्तच ए रे… हा तर.. न्युज अशी आहे की.. आपण दोघं पुन्हा एकत्र काम करतोय..”, मोनिका

“कसलं?” न कळून कबीर म्हणाला..

“अरे तुझ्या नविन बुकचं फोटो कव्हर मीच करतेय.. मेहतांच्या ऑफीसमधून फोन आला होता…”

“हो?? कसं काय?”

“अरे पहिल्या तिनही पुस्तकांचं मीच केलं होतं नं.. मग नॅचरली त्यांनी मलाच पहीला फोन केला करशील का म्हणून.. मी कश्याला नाही म्हणु. आणि तुझा तो पोर्टफोलीओ फोटो पण बदलायचाय म्हणत होते, मागच्या पेज वरचा.. सो बोल.. उद्या फ्रि असशील तर करुयात शुट?”, मोनिका नुसती उत्साहाने वहावत होती…

कबीर मोनिकाकडे मंत्रमुग्ध होऊन बघत होता. जणु ती पहीलीचीच मोनिका त्याच्या समोर होती. नकळत त्याच्या मनात राधा आणि मोनिकाचं कंम्पॅरिझन सुरु झालं.. मोनिका म्हणजे नुसता उत्साहाचा झरा.. अखंड वाहत रहाणारा.. तर कधी प्रचंड खवळलेला समुद्र.. ताड ताड खडकांवर आपटणारा.. मोठ्याच्या मोठ्या लाटा घेऊन सागर-किनाऱ्यावर

विसावणारा. बेभान-बेफिकिर.. एखाद्याने त्याबरोबर नुसत वाहवत जावं.. त्याच्या बेफ़ाम रौद्र सौदर्यात..

आणि राधा.. राधा म्हणजे एकदम विरुध्द.. शांत.. निश्चल.. नदी. एखाद्याने कितीही विचार केला.. कितीही आजमावून पहायचा प्रयत्न केला तरी त्याच्या खोलीचा अंदाज न येणारी.. एकदम प्रगल्भ.

राधा कबीरला कितीही आवडली असली तरी.. मोनिका आणि त्याच्यामध्ये कितीही वितुष्ट येऊन गेलं असलं तरीही.. मोनिकाबद्दल त्याच्या मनात कोपऱ्यात कुठेतरी प्रेमाची एक भावना अजूनही जागृत होती. तिच्याशी बोलताना ती भावना अजूनच उचंबळून येई आणि मग कबीरच्या मनात खळबळ माजे.

“अरे वेड्या मना.. नक्की कुणाचा आहेस तु? नक्की कोण आवडते तुला?” कबीर मनातल्या मनात आक्रंदत होता. त्याला दोघींपैकी कुणालाही सोडवत नव्हते. मोनिकाचा चार्मच असा होता की नकळत तो तिच्याकडे ओढला जाई..

“अरे ए… हॅल्लो….”, आपले हात त्याच्या डोळयापुढे नाचवत मोनिका म्हणाली.. “ओ लेखक महाशय.. जरा मिडीयाला बाईट्स देता का…?”

“अं.. नको उद्या नको.. पुढच्या आठवड्यात करु कधी तरी…”, कबीर म्हणाला..

“जशी तुमची इच्छा… पण निदान मला पुस्तकाची कंन्सेप्ट तरी सांग.. मी कव्हर-पेजसाठी थिमचा विचार सुरु करते.. तुझ्या कथेतल्या नायिकेला शोभणारी मॉडेल पण शोधावी लागेल ना…”

“नको शोधूस…”, तिला थांबवत कबीर म्हणाला..

“अं?”

“नको शोधूस.. मलाच सापडत नाहीए तर तुला काय सापडणार…”, कबीर

“म्हणजे…”

“म्हणजे.. नको शोधूस.. सिंपल.. तिच्यासारखी तीच आहे.. सो मला दुसरी कुठली मॉडेल चालणारच नाही कव्हर-पेजला..”

“मग? काय पांढरं फटक्क ठेवणार आहेस का?”

“नाही.. माझा विचार आहे एखाद्या आर्टीस्ट कडून पेन्सील आर्ट काढुन घ्यावं.. बघु.. विचार चालु आहे.. थोडा वेळ दे.. मी सांगतो तुला..”

“बरं निदान स्टोरी तरी ब्रिफ कर थोडी.. इतकं तर करु शकतोस ना?

“माय गॉड हिचे डोळे…”, कबीर स्वतःशीच पुटपुटला…”मी हिला नाही म्हणायला कधी शिकणार?”

“ओके सांगतो..”

“बरं.. फक्त एक मिनीट.. थांब..” असं म्हणून मोनिका काऊंटरवर गेली आणि येताना दोन चॉकलेट ब्राऊनी आणि १०-१५ मिनिटांनंतर कॉफी रिपीटची ऑर्डर देऊन आली.

“ओके सर.. स्टेज इज युअर्स…”, कबीरला खेटून बसत मोनिका म्हणाली.

कबीरने डोळे मिटून दीर्घ श्वास घेतला आणि त्याने मोनिकाला कथा सांगायला सुरुवात केली.

कथा सांगून संपल्यावर दोन क्षण शांततेत गेले…

“काय झालं? नाही आवडली गोष्ट?”, काहीश्या संशयाने कबीरने मोनिकाला विचारलं

मोनिका आपले टपोरे डोळे कबीरच्या चेहऱ्यावरून फिरवत होती. जणु काही ती काहीतरी शोधण्याचा प्रयत्न करत होती..

“काय? बोल ना? नाही आवडली का?”, कबीरला तिची भिरभिरणारी नजर सतावत होती. जणु काही ती कबीरचे मन वाचण्याचा प्रयत्न करत होती आणि कबीर आपले मनातले गुपित मोठ्या कष्टाने दाबुन ठेवत होता..

“कबीर !!.. एक विचारु?”, काऊंटरवर बिलाची खुण करत मोनिका म्हणाली..

“हो.. विचार...”

“आर यु इन लव्ह?”

मोनिकाच्या त्या प्रश्नाने कबीर पुरता गोंधळून गेला..

“ही जी कोण मीरा आहे.. ती तुला गोव्यात भेटली होती ना.. हे जे पुस्तक तू लिहीले आहेस.. इट्स अ ट्रु स्टोरी राईट?”, मोनिका

“खरं सांगु का खोटं सांगु?”, कबीर

“काहीही सांग.. तू जे सांगशील ते मी खरं मानेन...” खुर्चीतली पर्स उचलत मोनिका म्हणाली

कबीर काही बोलणार इतक्यात त्याचा फोन किणकीणला...

“हॅलो.. रोहन बोलतोय.. कबीर कुठे आहेस...?”, धापा टाकत रोहन पलिकडून फोनवर बोलत होता..

“मी सि.सी.डी. मध्ये आहे घरासमोरच्या.. का? काय झालं?”

“पट्कन न्युज लाव.. सिआयएन न्युज...”, रोहन..

“अरे पण का? कश्यासाठी..”, रोहन

“तू न्युज चॅनल लाव.. तुझं उत्तर तुला मिळेल…”, असं म्हणून रोहनने फोन बंद केला…

कबीर पट्कन चालत काऊंटरपाशी गेला आणि त्याने टी.व्हीवर चालु असलेला प्रोग्रॅम बदलून सिआयएन न्युज लावायला सांगीतले…

१५…१४…१३..१२..११ काऊंटर संपवत जाहीराती जाऊन ‘आज की बडी खबर.. ब्रेकिंग न्युज’ वगैरे लागले..

खाली फ्लायर्सही येत होते..

“अनुराग दीक्षीत ह्याची पत्नी राधा दीक्षीत गोकर्ण पोलिस स्टेशनमध्ये कैद…”

बातमी वाचून कबीरचे डोळे विस्फारले गेले.. दोन दोनदा त्याने ती बातमी पुन्हा पुन्हा वाचली.

काही सेकंद पुढची बातमी टीव्हीवर झळकु लागली…

“नशेच्या हालतमध्ये पकडलेल्या राधा दिक्षीतवर अॅटेम्प्टेड मर्डरचा आरोप ठेवण्यात आलेला आहे..”

“व्हॉट…???”, कबीर जवळ जवळ किंचाळतच म्हणाला..

एव्हाना कबीरची रिअॅक्शन बघून सि.सी.डीमधले बाकिचे लोकं सुध्दा टिव्ही भोवती जमले होते.

कबीर आपले कपाळ धरत पुढची बातमी बघत होता.

एव्हाना कंन्ट्रोल न्युज-रुम मधून कॅमेरामॅन कडे गेला होता. प्रचंड गर्दी उसळलेल्या गोकर्ण-पोलिस स्थानकातील तुरुंगाच्या अंधाऱ्या कोपऱ्यातील एका स्टुलावर राधा पेंगलेल्या अवस्थेत भिंतीला टेकून बसलेली होती

कबीरने प्रथम तिला ओळखलेच नाही.. पाठीपर्यंत रुळणारे काळेभोर केस जाऊन शोल्डर-कट सोनेरी केसांनी जागा घेतली होती.. हातावर, खांद्यावर, मानेवर कसलेसे रंगीत टॅटू होते.. नाकात मोठ्ठी नोज रिंग होती.. आणि गालावर… वाळलेल्या रक्ताचे पोपडे तरंगत होते….

लाखो-करोडो रुपायांची लॉटरी लागलेल्या आवेशात बातमीदार ब्रेकींग न्युज ओरडत होता…

“गोकर्ण पोलिस-स्टेशनमै राधा दिक्षीत नशे-के-हालत मे धुत…विथ अॅटेंप्टेड मर्डर अंडर हर नेम…..”

कबीर विस्फारलेल्या डोळयांनी टीव्हीवर दिसणाऱ्या राधाकडे बघत होता…

४

राधाचा निश्चय पक्का होता. कबीर काही मार्ग काढो नाही तर न काढो, तिला इथून निघणं क्रमप्राप्त होतं. तिला आपल्या आयुष्याकडून काय अपेक्षा आहेत हे स्पष्ट होते, आणि कुण्या कबीर नामक व्यक्तीसाठी, ज्याची ओळख फक्त काही दिवसांची होती, त्याच्यासाठी ती आपले स्वातंत्र्य पणाला लावण्यास कदापी तयार नव्हती.

कबीरला सोडून ती आपल्या खोलीत आली. सोफी-ऑन्टीचा जाताना निरोप घेता येणार नाही ह्याचं मात्र तिला राहून राहून वाईट वाटत होत. महीन्याभरातच त्यांचे आणि राधाचे खुप छान संबंध जुळले होते.

"एका अर्थाने, झालं ते बरंच झालं, कदाचित त्यांचा निरोप घेण जास्त अवघड झालं असतं. शेवटी इथे थोडं नं आपण कायमचं रहाणार होतो? ४ दिवसांनी जायचं, ते आज...", बॅग भरताना राधाने विचार केला. तिने खोलीतला दिवा बंद करून टाकला आणि अंधारात ती बसून राहीली.

कबीरबद्दल तिच्या मनात काय होते ते तिलाच सांगता येत नव्हते. दोन दिवसांच्या ओळखीतच कबीर आपल्याला इतका का जवळचा वाटतोय हा विचार तिला सतावत होता. दोन दिवसांच्या ओळखीवरच त्याने तरी आपल्याला "आय लव्ह यु.." म्हणायची काय गरज होती? जसं त्याची नजर काहीही न बोलूनही खुप काही बोलून जाते, कदाचित आपले डोळेही आपल्याला तसाच तर दगा देत नसतील ना? असाही एक विचार तिच्या मनात येऊन गेला.

खुप विचार करूनही उत्तर सापडेना तसा तिने कबीरचा विचार मनातून काढुन टाकला..

दीड तास उलटून गेल्यावर राधा हळुच खोलीचं दार उघडून बाहेर आली. दूरवर लॉनवर पेटवलेली शेकोटी विझलेली होती, परंतू गरम निखार्‍यांतून धुर अजूनही निघत होता.

कबीर खुर्चीतच डोकं मागे रेलून बसला होता. काही मिनीटं तेथेच थांबुन कबीरला झोप लागली असल्याची तिने खात्री केली आणि मग पॅसेजमधल्या फोनवरून तिने कॅबला फोन केला.

तिने एक दीर्घ श्वास घेतला आणि कसलाही आवाज न करता बॅग घेऊन राधा बंगल्याच्या बाहेर पडली. पुन्हा एक नविन सुरुवात, नविन लोकं, नविन जागा.. कदाचित ह्याच आयुष्याची आपण आस धरली होती.. कदाचित हेच ते आयुष्य ज्यासाठी आपण सुखनैव जीवन मागे सोडून बाहेर पडलो होतो.

राधा कॅबने स्टेशनवर पोहोचली. अर्थात स्टेशनवर तिचं काहीच काम नव्हते, पण तिला खात्री होती की कबीरला ती निघून गेली हे कळलं तर कसंही करून तो तिचा माग काढायचा प्रयत्न करेल आणि कदाचित स्टेशनपर्यंत पोहोचेल.. शेवटी काहीही झालं तरी गुन्हेगारी कथांचा लेखंक ना तो…

कबीरचा विचार मनात येताच राधाला आपसुकच हसु आलं. कबीरशी झालेली भेट.. त्याला चुकीचं समजून त्याच्याच डोळयात स्प्रे मारून तेथून काढलेला पळ.. दुसऱ्या दिवशी सकाळी हॉटेलमध्ये त्याच्याशी झालेली भेट, सगळं तिच्या मनात एका क्षणात फ्लॅश होऊन गेलं…

कॅब निघून गेली ह्याची खात्री पटताच राधाने स्टेशनवरची दुसरी रिक्षा पकडली आणि बिचकडे मोर्चा वळवला.

इतक्या रात्री बीचवर जायला सांगणारी, आणि ते पण एकटी मुलगी बघून रिक्षावाल्याने तिला आपादमस्तक न्ह्याहाळलं, पण तिला त्याची पर्वा नव्हती. व्यवहारी जगताशी कदाचित तिचा हा शेवटचा संबंध होता. सर्व पाश, सर्व गुलामगिरी, सर्व रितीभाती मागे सोडून ती आपलं आयुष्य हिप्पी जिवनशैलीला समर्पीत करत होती.

रिक्षावाल्याला पैसे चुकते करून ती बीचवर आली. अंधारात समुद्राच्या लाटांचा आवाज अधीकच घनगंभीर भासत होता. चांदण्याच्या प्रकाशात खडकांवर आदळणाऱ्या समुद्राच्या फेसाळ लाटा अधीकच चंदेरी दिसत होत्या. समुद्राची रेती रात्रीच्या थंडीत अजूनच

गार पडली होती. गार वाऱ्याचा एक झोत राधाला स्पर्शुन गेला तशी राधाने ओढणी अंगावर पांघरली आणि ती वाळुतून आपली बॅग ओढत ओढत चालत राहीली.

साधारण किलोमीटर भर चालल्यावर तिला हसण्या-खिदळण्याचे आवाज ऐकू येऊ लागले. लांबवर अजूनही शेकोटी पेटलेली होती. शेकोटीच्या प्रकाशात २-४ आकृत्या नृत्य करत होत्या.

हेच ते स्वातंत्र्य जे राधाला अपेक्षीत होते. रात्रीच्या दोन वाजता सुध्दा सो-कॉल्ड सभ्य वर्तनाला अनुसरून खोलीत गपचुप झोपून रहाण्यापेक्षा मनाला वाटेल तसे, वाटेल ते करण्यातला आनंद काही औरच असतो हे राधाला पुन्हा एकदा जाणवले.

राधाने आपल्या चालण्याचा वेग वाढवला आणि ती झपझप पावलं टाकत त्या शेकोटीपाशी जावून पोहोचली.

राधाला पहाताच त्या ग्रुपमधील एक मुलगी पट्कन उठून तिच्याजवळ आली, आणि राधाच्या हातातल्या बॅगेकडे बघत म्हणाली…

“फायनली?”

“येस.. फायनली…”, राधा मिस्कील हसत म्हणाली

“बरं झालं तू आलीस, नाही तर आम्हाला मिस केलं असतंस…”

“का?”

“आजची गोव्यातली शेवटची रात्र, दोन-चार तासात आपण निघतोय….”

“वॉव्व.. कुठे??”

“ओम बिच.. गोकर्ण… चल तुझी ओळख करून देते..” असं म्हणून ती मुलगी राधाला घेऊन ग्रुपमध्ये गेली.

राधाला आलेली पहाताच सगळयांनी त्यांचं नाच-गाणं थांबवलं..

“गाईज.. धिस इज राधा.. आजपासून आपल्याबरोबर असेल.. राधा.. धिस इज चार्ली..” थोड्या उंच खडकावर बसलेल्या एका खुरट्या दाढीवाल्या मुलाकडे बोट दाखवत ती मुलगी म्हणाली.. “धिस इज जॉन… रिटा.. रॉकी, शॉन, मेहेक…”

एक एक करत सगळयांची ओळख करून दिल्यावर ती म्हणाली.. “ॲन्ड ॲज यु नो.. आय एम शिना…”

मग ती परत सगळयांना म्हणाली, “राधा मला लास्ट विक परेराच्या पार्टीमध्ये भेटली होती.. मस्त आहे एकदम.. मला खुप आवडली.. आपल्या ग्रुपमध्ये पण मस्त मिक्स होईल.. वेलकम राधा…”

सगळयांनी टाळया, गिटार, बेंजो.. जे हाताला लागेल ते वाजवून राधाचं स्वागत केलं. राधाने कमरेत वाकून सगळयांच्या शुभेच्छांचा स्विकार केला आणि ती कोपऱ्यात शिना जेथे बसली होती तिच्या जवळ जाऊन बसली.

थोड्यावेळाने परत नृत्य सुरु झालं..

“सो हु इज डुईंग द डान्स टुनाईट?”, चार्ली मध्येच म्हणाला…

“राधा नविन आहे.. तिलाच करु दे की..”, दुसरा एकजण म्हणाला…

“नको.. ती नविन आहे.. तिला जरा सेटल तरी होऊ देत, रिटा.. यु अप फ़ॉर धिस?”, शिनाने विचारले…

“बाय ऑल मिन्स..”, रिटा खिदळत म्हणाली.. त्याबरोबर इतरांनीही शिट्या वाजवून तिला प्रोत्साहन दिले…

“हे.. आय एम ओके विथ डान्स..”, राधा हळुच शिनाला म्हणाली.. “नो यु वोन्ट बी.., तुला माहीत नाहीए हा प्रकार अजून.. जस्ट वेट ॲन्ड सी…”

रस्त्यावर थोड्या अंतरावर एक ट्रक थांबल्याचा आवाज आला, आणि थोड्यावेळाने एक अगडबंब माणुस झोकांड्या खात त्यांच्या ग्रुपमध्ये दाखल झाला…

“हिया दोस्त.. कैसा है?”, चार्लीने उठून त्याला अलिंगन दिले…

“कितने लोग?”, तो गिड्या माणुस म्हणाला…

“बस हमेशाके… दस-बारा..”, चार्ली ग्रुपकडे बोट दाखवत म्हणाले… “पाच हजार लगेगा… चेक-पोस्ट है बिचमै..”

“क्या यार.. अब इतना पैसा होता तो खुदकी गाडी न खरीदते..”, स्वतःच्या दाढीवरून हात फिरवत चार्ली म्हणाला… “बैठ.. दारु पी.. तुझ्यासाठी आज डान्स आहे..”

“रिअली??”, डान्सचं नाव काढताच त्या गिड्याचे डोळे चमकले..पोटावरून खाली सरकलेली आपली अर्धी चड्डी सावरत तो लडखडत शेकोटीच्या शेजारी येऊन बसला.. कुणीतरी त्याला गोवा-स्पेशल फेणी आणून दिली..

राधाला ह्या ‘डान्स’ प्रकाराचे फारच कुतुहल होते, जेंव्हापासून ती ह्या ग्रुप मध्ये जॉईन झाली होती, तेंव्हापासून प्रत्येकजणच ह्याबद्दल बोलत होता. काहीतरी भारी प्रकार असला पाहीजे ह्या विचाराने राधा वाट बघत होती. शेवटी थोड्या वेळाने रिटा रंगीत झिरमीळया लावलेला शॉर्ट ड्रेस घालून टेंन्ट मधून बाहेर आली आणि तिने शेकोटीभोवती फेर धरून नाचायला सुरुवात केली.

२-३ मिनीटं झाल्यावर तिने अंगातले जॅकेट काढुन त्या गिड्याच्या दिशेने भिरकावले.. तसा ग्रुपमधून टाळयांचा कडकडाट झाला…

“गो फॉर इट रिटा.. यु आर द मॅन…”

“उउह्ह.. कान्ट वेट… डु इट फ़ास्ट…”

शिनाने हसत हसत राधाकडे बघीतलं.. “कळलं?”

“नाही! काय झालं..”, राधा गोंधळून म्हणाली

“ईट्स अ स्ट्रिप्टीज स्ट्युपीड..”, शिना म्हणाली.. “रिटा विल सून बी डांन्सींग नेकेड..”

“व्हॉट???”, जोरदार शॉक बसल्यासारखी राधा म्हणाली.. “पण का?”

“कारण आपल्याला फुकट कोण प्रवास करु देणार.. आय टोल्ड यु ना.. आपण गोकर्णला चाललोय.. त्याच्या ट्रकमधून..”, शिना त्या ट्रकवाल्याकडे बोट दाखवत म्हणाली..

“मग?”

“मग.. त्यासाठी हे…”, शिना रिटाकडे बोट दाखवत म्हणाली.. रिटा एव्हाना अर्धनग्न झाली होती, पण तिला कश्याचीही तमा नव्हती.. ती आपल्याच तालावर नृत्य करण्यात मग्न होती..

“हे बघ राधा.. दॅट्स द वे इट इज.. ॲन्ड इट्स फन.. इथे कुणाला कश्याची लाज नाही.. वु आर नॉट रिच ॲन्ड फेमस.. तो ट्रकवाला खुश.. आपण खुश.. आपलं काम झाल्याशी मतलब..”

“शिना.. माझ्याकडे आहेत पैसे थोडे.. इफ़ यु वॉन्ट..”, राधा आपली पर्स काढत म्हणाली..

“किती आहेत?”

“शेवटचे ७-८ हजार उरले असतील..”

इतके पैसे ऐकल्यावर शिनाचे डोळे विस्फारल्यासारखे झाले.. पण मग ती म्हणाली.. “श्शsss.. राहु देत आत्ता तुझ्याकडेच, आत्तापुरती तर सोय झालीय.. पण हे बघ.. कुणाला बोलु नकोस तुझ्याकडे इतके पैसे आहेत ते.. ओके?” अत्यंत हळु आवाजात ती म्हणाली..

“हम्म.. ओके…”, राधा रिटाकडे बघत म्हणाली जिने एव्हाना अंगावरचा एकमेव कपडा काढुन टाकला होता..

सामानाची सगळी बांधाबांध करून, ट्रक मध्ये टाकून निघेपर्यंत पुर्वेकडे फटफटायला लागलं होतं. सगळेजण ट्रकच्या मागच्या बाजुला बसले जेथे आधीच कसल्या-कसल्या सामानाची खोकी भरली होती.

“बॉर्डर-पोस्टच्या आधी मी सांगेन तेंव्हा कोपऱ्यात ती ताडपत्री अंगार घेऊन ५-१० मिनीटं लपून रहा…”, ट्रक चालु करताना तो गिड्या माणुस चार्लीला म्हणाला..

“क्यो बे.. तू तर म्हणला सगळे पोलिस ओळखीचे आहेत तुझ्या?”, चार्ली

“अरे हो.. पण कधी कधी साहेब लोकं पण असतात..”, ट्रकवाल्याने ट्रक गेअरमध्ये टाकला तसा लोकांनी गिटार, बेंजो बाहेर काढले आणि गाणी सुरु केली, तर दुसऱ्या कोपऱ्यात रिटा आणि जॉन भल्या पहाटे स्मुचींग मध्ये मग्न झाले…

ट्रक हायवेवरून वेगाने धावत होता.. कोवळ्या उन्हाची किरणं अंगाला सुखावत होती. राधा आपले दोन्ही हात फैलावून वेगाने वहाणारा वारा अंगावर झेलत होती. क्षणाक्षणाला ती स्वतःला अधीकाधीक स्वैर.. हलकं, मुक्त अनुभवत होती.

“सो टेल मी मोअर अबाऊट यु..”, चार्ली राधाजवळ येऊन म्हणाला….

“आय एम नोबडी…”, ट्रकच्या तो मोठा आवाजाच्या वर ओरडून राधा म्हणाली..

“वा.. लवकर शिकलीस की…”, चार्ली हसत म्हणाला.. “दॅट्स द फ़न ऑफ़ बिईंग हिप्पी.. वुई आर नोबडी..”

तासभराच्या प्रवासानंतर ट्रकचा वेग थोडा हळु झाला. ड्रायव्हरच्या केबीनला लागून असलेल्या एका सरकते-दार-वजा-खिडकीतून तो ड्रायव्हर म्हणाला.. “चेक-पोस्ट ५ मिनीटं…” आणि त्याने ती खिडकी परत लावून टाकली.

सगळयांनी आपले सामान एका कोपऱ्यात गोळा केले आणि अगदी एकमेकांना चिकटून ट्रकच्या एका कोपऱ्यात अंगावरून ती ताडपत्री ओढुन बसून राहीले. ग्रुपमधल्या त्या तरुणांचा स्पर्श राधाच्या अंगावर शहारे आणत होता. कित्येक वर्षांनी परपुरुषांच्या इतक्या जवळ राधा होती. तिने नजरेच्या कोपऱ्यातून मागे पाहीले तेंव्हा चार्ली तिच्याकडेच बघत होता.

राधा स्वतःशीच हसत म्हणाली.. “नॉट अगेन…”

काही वेळातच ब्रेक लावत ट्रक थांबला..

“सलाम साब..”, ट्रकवाला…”आज आप कैसे क्या पोस्ट पे..”

“क्या है पिछे…”, पलिकडून जरबीचा आवाज आला..

“हमेशा का.. हम लोग तो बस वही…”

“ए जारे.. बघ काय आहे मागे…”, तो साहेब दुसऱ्यावर खेकसला, तसा एक जण पळत पळत आला आणि ट्रकचं मागचं दार उघडून ट्रकमध्ये शिरला..

कदाचित बाकीच्यांना ह्याची सवय असावी, मात्र राधासाठी हे नविन होतं. टेंन्शनमुळे राधाचं हृदय धडधडत होतं.. नकळतपणे तिचे हात-पाय थरथरत होते. चार्लीने त्याचा हात राधाच्या खांद्यावर ठेवला आणि तिला शांत रहायची खुण केली. राधाला पहील्यांदा जाणिव झाली की ती ह्या सर्वांपेक्षा कित्ती वेगळी भासत होती. तिचे कपडे, तिची बॅग.. कुठल्याही रितीने ती हिप्पी वगैरे वाटतच नव्हती. नाहक पोलिसांना संशय आला असता आणि तिची ओळख उघड झाली असती तर मोठ्ठी.. पंचाईत होती..

दोन-तिन मिनीटं उचकाउचकी करून ट्रकमध्ये चढलेला तो पोलिस निघून गेला..

कागदपत्र चेक करून झाल्यावर, ट्रकवाल्याने ट्रक चालु गेला आणि बॉर्डर क्रॉस करून ते नविन राज्यात शिरले…

“सब ठिक है..”, थोड्या वेळाने पुन्हा ती खिडकी उघडून ट्रकवाला म्हणाला तसे सगळयांनी ती ताडपत्री फेकून दिली आणि एकच जल्लोष केला. आणि ह्या सगळयांत पुढे होती ती राधा.. जणु नविन आयुष्य मिळाल्याचाच तिला आनंद होता.

आनंदाच्या भरात तिने सर्वांना कडकडून मिठ्या मारल्या. चार्लीला मिठी मारून ती बाजुला होऊ लागली, पण चार्लीने तिला घट्ट पकडले होते, राधा काही बोलायच्या आधीच त्याने आपले ओठ राधाच्या ओठांवर टेकवले..

राधा त्या प्रकाराने क्षणभर गांगरून गेली.. पण क्षणभरच, तिने लगेच स्वतःला सावरले, चार्लीला बाजुला ढकलण्यासाठी तिने आपले हात त्याच्या मिठीतून सोडवण्याचा प्रयत्न केला, पण चार्लीची तिच्याभोवती मजबुत पकड होती.

राधाने तो प्रयत्न सोडून दिला. तिने विचार केला “काय हरकत आहे? काय हरकत आहे जर एखाद्याने तिला किस्स केले?” अनुरागच्या त्या खोट्या, क्षणभराच्या खोट्या किस्सपेक्षा, चार्लीचा राकट किस तिला अधीक भावला. त्याच्या मर्दानी, नॉन-कल्चर्ड, वाईल्ड मिठीमध्ये तिने स्वतःला झोकून दिले. तिच्या त्या कृतीला योग्य-अयोग्याच्या तराजुत तोलणारे इथे कोणी नव्हते, उंचावणाऱ्या भुवया नव्हत्या की पाठीमागे होणारी कुजबुज नव्हती. होते फक्त आणि फक्त स्वातंत्र्य.

एका स्पिडब्रेकरवरून ट्रक खाड्कन गेला आणि राधा व चार्ली काही अंतर एकमेकांपासून दूर झाले. चार्लीने राधाला पुन्हा आपल्या मिठीत ओढले. राधाने आपले हात चार्लीच्या मानेभोवती गुंफले आणि ती हळू आवाजात म्हणाली, “आय लव्ह यु कबीर!!”

“कबीर? कोण कबीर?”, राधाला बाजूला सारत चार्ली म्हणाला तशी राधा भानावर आली. तिने हलकेच स्वतःला चार्लीपासून अलग केले.

असं, नकळत आपल्या तोंडून कबीरच नाव कसं निघालं ह्याच तिला आश्चर्य वाटलं.

“आपणं कबीरच्या प्रेमात तर नाही ना पडलोय?”, असा विचार तिच्या मनात येउन गेला, पण क्षणभरच. लगेच तिने स्वतःला सावरले. आता तो विचार करून काही उपयोगही नव्हता. कबीर बद्दल काही असेलच तर ते निव्वळ एक आकर्षण होते आणि आज नाहीतर उद्या ते निघून जाईलच असा विचार तिने केला.

७०-८० कि.मी. प्रवास केल्यानंतर हायवेपासून अलग होऊन ट्रक गोकर्णकडे वळला. गाव जवळ येऊ लागले तसे पर्यटकांचे जथे दिसु लागले. अर्थात परदेशी पर्यटकांचा सहभाग लक्षणीय होता. कुणी चालत, कुणी सायकलींवरून तर कित्येकजण बुलेटवरून मनसोक्त भटकंती करत होते. ओम, हरे-कृष्ण, किंवा तत्सम प्रिंट्सचे आणि रंगेबीरंगी कपडे, डोक्याला बंडाना, गळयात कसल्या कसल्या माळा, अंगा-खांद्यावर टॅटु... राधाबरोबरची मंडळी अगदी त्यांतलीच वाटत होती.

मार्केटकडे न वळता ट्रक समुद्रकिनाऱ्याला लागून असलेल्या खडबडीत रस्त्याने धावु लागला. बऱ्याच वेळानंतर समुद्रावरून येणारा खारा वारा नाकात शिरला तसा सगळयांच्या उत्साहाला उधाण आले. ड्रायव्हरच्या केबीनला लागून असलेल्या छोट्या खिडकीतून चार्ली ड्रायव्हरला रस्ता सांगत होता. एक उंच टेकडी चढुन ट्रक उंचावर आला, तसा दूरवर, अथांग पसरलेला निळाशार समुद्र दृष्टीस पडला. चार्लीने खुण केली, तसे आपले इतरत्र पसरलेले सामान मंडळी गोळा करु लागली.

छोटा घाट उतरून ट्रक एका आडवळणाला येऊन थांबला तसे सगळे आपलं सामान घेऊन खाली उतरले. ट्रक आल्या मार्गाने निघून गेला आणि सगळे आपलं सामान उचलून चार्लीच्या मागून चालु लागले. उन्हं वर आल्याने थंडी पळून गेली होती. समुद्राची उबदार वाळु पायाला सुखावत होती. थोड्यावेळ समुद्रकिनाऱ्यावरून चालल्यावर चार्ली पुन्हा पायवाट पकडून चालु लागला. काही अंतर चालल्यावर एक टेकडी आली आणि मग दुसरी आणि मग तिसरी.

राधाला ह्या सगळयाची खुप मज्जा वाटत होती. कॉलेजच्या दिवसांत केलेल्या ट्रेकींग्जची तिला आठवण झाली. दोन्ही हात पसरून तिने आनंदाने एक स्वतःभोवती एक गिरकी घेतली आणि ती परत इतरांबरोबर चालु लागली.

साधारण तासभर सर्वजण चालत होते. बरोबर नेहमीच्या सामानाबरोबरच घेतलेले खाण्यापिण्याचे सामान, टेन्ट्स सारखे अवजड साहीत्यही होते. पण कुणाच्याही चेहऱ्यावर

थकावट नव्हती. होता फक्त आनंद. अखेर एका उंच टेकडीच्या टोकावर पोहोचायच्या काही अंतर आधी चार्लीने सगळ्यांना थांबवले.

“तुम्हा सर्वांचे स्वर्गात स्वागत आहे..”, चार्ली सगळ्यांना म्हणाला.. “आपण इतके अंतर चाललो त्याचे फळ आता आपल्याला मिळणार आहे… तुम्ही आता जे काही बघणार आहात तशी जागा, ती प्रायव्हसी तुम्ही आधी बघीतलीच नसेल. आय बेट, इथे राहील्यावर तुम्हाला इथून कुठे जावेसेच वाटनार नाही…” असं म्हणून चार्लीने सगळ्यांना पुढे बोलावले.

उत्सुकतेने सगळे टेकडीच्या टोकावर पोहोचले आणि विस्फारलेल्या नजरेने खाली दिसणारे दृष्य पाहु लागले.

दोन उंच टेकड्या समुद्रात थोड्या आतपर्यंत गेल्या होत्या आणि त्यामुळे खाली एक इंग्रजी अक्षर ‘C’ प्रमाणे बीच तयार झाले होते. जणु त्या दोन टेकड्यांची टोकं म्हणजे ‘C’ अक्षराची दोन टोकं, आणि मधली रिकामी जागा म्हणजे ते प्रायव्हेट बीच. दुरून कुणालाही तेथे काही असेल असे वाटले नसते. कारण लांबुन कुणालाही ती एक अखंड टेकडीच वाटली असती. परंतू त्या दोन्ही टेकड्या एकमेकांना जोडलेल्या नसल्याने मध्ये एक जणु खाजगी बीचच तयार झाला होता.

ती सुंदर जागा बघून अनेकांनी आनंदाने किंकाळया फोडल्या आणि सामान उचलून टेकडीच्या उतारावरून सगळेजण धावत सुटले. राधा खाली पोहोचेपर्यंत बहुतांश मंडळींनी आपले सामान वाळूत फेकून दिले होते आणि कपडे काढून समुद्राच्या पाण्यात धाव घेतली होती. राधाने सुध्दा आपले सामान ठेवले आणि ती इतरांबरोबर सामील झाली.

तासभर सगळेजण पाण्यात मनसोक्त डुंबत होते. एकमेकांवर पाणी उडव, वेगाने येणाऱ्या लाटेवर उड्या मार असे प्रकार चालु होते. सकाळपासूनचा प्रवास आणि त्यानंतरचा काही किलोमीटरचा वॉक ह्यामुळे आलेला थकवा निघून गेला होता, पण आता पोटात भुकेने कावळे ओरडायला लागले होते. हळू हळू सगळेजण पाण्यातून बाहेर पडले आणि स्वतःला वाळून झोकून दिले. काही कर्तव्यदक्ष मंडळींनी टेण्ट्स उभारायला सुरुवात केली, तर काहींनी स्वयंपाकासाठी लागणारी आग पेटवायला लाकडं गोळा करायला धाव घेतली

जोपर्यंत लाकडं जमुन स्वयंपाक सुरु होत होता तोपर्यंत काहींनी बारीक बारीक खेकडे आणि काही मासे पकडून आणले होते, तर काहीनी ताट म्हणून वापरता येतील अशी मोठ्ठी झाडाची पान गोळा करून आणली होती.

राधाने सुध्दा स्वयंपाक करण्यात हातभार लावला. वेगवेगळे पदार्थ तयार करायला, किचनमध्ये काम करायला राधाला नेहमीच आवडायचे. परंतू अनुरागशी लग्न झाल्यावर ते अचानक आउट-ऑफ-स्टेटस असल्याने बंद झाले. घरात नोकर-चाकर कामाला असताना राधाने किचन मध्ये असणे अनुरागला आवडायचे नाही, आणि त्यामुळे इच्छा असूनही राधाला काही करता यायचे नाही.

पण इथे, इथे अनुराग नव्हता आणि हे त्याचे घरही नव्हते.

आपण जो निर्णय घेतला तो योग्यच घेतला ह्या निर्णयावर पुन्हा एकदा राधाने शिक्कामोर्तब केले आणि शिनाबरोबर फिश करी करण्यात ती मग्न झाली. तयार झालेले जेवण अगदीच बेचव होते. कश्यात मीठ जास्त, तर कश्यात मसाला, काही कच्च तर काही अजून काही. पण कुणाला त्याची फिकिरच नव्हती. सगळे त्यावर तुटून पडले. राधाला मात्र त्या खाण्याची सवय नसल्याने तिने जमेल तितपत खाण्याचा प्रयत्न केला आणि शेवटी ती एका खडकावर बसून केसांमध्ये अडकलेली वाळू काढण्यात मग्न होऊन गेली.

जेवणं उरकल्यावर शिना राधा शेजारी येउन बसली.

“केसांची पूर्ण वाट लागलीय”, केसांचा गुंता सोडवत राधा म्हणाली.

“मस्त केस आहे तुझे राधा”, राधाच्या केसांमधून हात फिरवत शिना म्हणाली, “पण तुला त्याची निगा राखणं कठीण होणारे”

“हो ना, आपण मार्केट मध्ये गेलो कि घेईन मी शाम्पू”, राधा

“ओ मैडम, आपण पिकनिकला नाही आलोय आणि किती दिवस तुला तुझे पैसे पुरणारेत?”, शिना

……..

“व्हाय डोन्ट यु कट इट?”, अचानक शिना ने विचारले

“आर यु मॅड?”

“हे बघ राधा, इथे रोजच्या आंघोळीचे वांदे, शाम्पू आणि कंडीशनर तर फार लांबची गोष्ट. तुला माहिते आणि मला हि माहिते केसांची निगा राखायला काय काय करायला लागते.”

“अग हो पण…. ”

एव्हाना बाकीचे सगळे पण त्यांच्याभोवती जमले होते.

“कट इट..”

“कट इट..”

“कमॉन राधा…. डू इट …… ”

“यु शुअर चांगले दिसेल?”, राधाने शिनाला विचारले

“ऑफकोर्स’

“आय हेव समथिंग फॉर यु”, रीटाने आपल्या पर्समध्ये हात घालून काहीतरी बाहेर काढले आणि तो हात राधासमोर धरला

“बीड्स!! वॉव !!, मला केंव्हापासून बीड्स घालायचे होते केसांमध्ये”, राधा आनंदाने उडी मारून म्हणाली

“इट्स युअर्स नाऊ”

राधाने एकदा सर्वांकडे बघितले आणि कुणीतरी पुढे केलेली कात्री घेतली आणि आपले लांबसडक केस कापायला सुरुवात केली.

काही दिवसांतच राधा त्या ग्रुपचा एक हिस्सा होऊन गेली. काही नियम नाहीत, काही बंधन नाहीत, ज्याला जसे वाटेल त्याने तसे वागावे. ह्या दिवसांमध्ये राधा स्वतःला नव्याने ओळखत होती.

सर्व काही राधासाठी जणू स्वप्नवत चालले होते, पण ती संध्याकाळ मात्र अपवाद ठरली. त्या ग्रुपमधे आल्याला तिला किती दिवस झाले तेही तिला आठवत नव्हते. बहुधा दोनेक आठवडे झाले असतील…

सूर्य मावळतीला झुकला होता. शेकोटी पेटवून सगळेजण गप्पा मारत बसले होते तेंव्हा सकाळपासून गायब असलेला चार्ली हसत हसत त्यांच्यात सामील झाला.

“चार्ली यार किधर था सुभसे?”

“कोई लडकी का चक्कर चला रहा क्या?”

“व्हाय आर यु स्मायलिंग सो मच?”

एक ना दोन, त्याच्यावर प्रश्नांचा भडीमार होत होता.

“सांगतो, सांगतो, बसा सगळे”, एका खडकावर बसत चार्ली म्हणाला

सगळेजण बसल्यावर चार्लीने आपल्या जैकेटच्या खिश्यात हात घालून, काही पुड्या बाहेर काढल्या आणि हवेत नाचवत तो ओरडला “गाइज इट्स विड्स…..”

त्याचबरोबर सगळयांनी एकच आरोळी ठोकली.

“काय आहे ते?”, राधा

“ड्रग्ज बेबी ड्रग्ज”, चार्ली हसत हसत म्हणाला

“ओह माय गॉड, इज इट लीगल?”, राधा

“चार्ली कुठलीच गोष्ट लिगली करत नाही, आणि कुणाच्या बापाला भीत नाही”, शर्टाची कॉलर ताठ करत चार्ली म्हणाला

“पण, पण ह्याने व्यसन वगैरे लागते ना?”, राधा डोळे मोठे करत प्रश्न विचारत होती

“डोन्ट-वरी, आम्ही खूप वेळा वापरलेय, काही होणार नाही, ट्राय कर… “, चार्ली

“शिना, इज इट ओके ?”, राधाने शिनाला विचारले

“ऑफकोर्स, बिनधास्त घे”

चार्लीने आणि ग्रुप मधल्या काहींनी सगळयांसाठी चिलीम बनवल्या, त्यात चार्लीने आणलेल्या पुड्यांमधील पूड भरली आणि प्रत्येकाला दिली. रीटाने राधाला काय आणि कसे करायचे ते समजावून सांगितले आणि थोड्याच वेळात सगळेजण त्या स्वर्ग-सुखात बुडून गेले.

काही वेळातच सगळयांवर त्याची झिंग चढु लागली होती. राधाला तर अगदी पिसासारखे हलके झाल्यासारखे वाटत होते. जगातली सगळी दुःख नाहीशी झाली आहेत आणि सर्वत्र फक्त आणि फक्त आनंदच भरला आहे असे तिला वाटत होते. कुठलेसे हिंदी गाणे ती स्वतःशीच गुणगुणत होती. गाणं म्हणता म्हणता मध्येच ती उठून स्वतःभोवती नाचु लागली.

“यु नो चार्ली.. आय एम गोईंग टू डु द नेक्स्ट डान्स..”, गुंगीतच ती बोलत होती.

“हे चार्ली.. यार अजून पाहीजे रे हे..”

“गपा रे.. काय फुकट मिळते का विड्स.. किती महाग आहे ठाऊक आहे ना?”

“हाऊ मच मनी यु वॉन्ट.. राधा हॅव लॉट्स ऑफ़ मनी…”, पेंगुळलेल्या अवस्थेत शिना म्हणाली..

“येस्स.. आय हॅव लॉट्स ऑफ़ मनी.. हाऊ मच यु वॉन्ट?”, असं म्हणून राधाने पर्समधून आपली पैश्याची गड्डी काढली आणि चार्लीकडे फ़ेकली.

त्या ड्रग्जच्या नशेत आपण काय करतोय ह्याचं तिला भानच नव्हतं. पण इतके सारे पैसे बघताच चार्ली भानावर आला.

“शिना… राधा कोण आहे? इतके पैसे कसे आले तिच्याकडे?” पण शिना अजूनही गुंगीतच होती… “आय डोन्ट नो…”

“शिना.. जागी हो…”, तिच्या दंडाला धरून गदागदा हलवत चार्ली म्हणाला.. “आऊच.. चार्ली.. यु आर हर्टींग मी..”, शिना

चार्लीने तिला बाजुला ढकलले आणि तो राधाकडे गेला.

“”राधा.. हे बघ.. आपल्याला एव्हढे पैसे पुरणार नाहीत.. थोडे अजून लागतील.. अं.. तुझे आई-बाबा.. कोण आहेत? देतील ते पैसे?”, गोड आवाजात चार्ली म्हणाला..

“आई-बाबा? हॅं.. उलट मी पळून आलीय.. त्यांना कळता कामा नये ओके? नाही तर ते मला परत माझ्या नवऱ्याकडे पाठवतील.. पण हं.. त्याच्याकडे आहेत खुप पैसे..”, राधा वाळुवर चित्र काढत म्हणाली..

"छानच की मग.. कोण? कोण आहे तुझा नवरा...", चार्ली.. "अनुराग दिक्षीत.."

"कोण अनुराग दिक्षीत?", चार्ली..

पण राधा पुन्हा गाणं म्हणण्यात गुंग होऊन गेली.

चार्लीने आपला फोन उचलला आणि एक नंबर फिरवला..

"हॅल्लो.. मित्रा.. एक काम कर ना.. अरे जरा नेट वर अनुराग दीक्षीत कोण आहे बघून सांगतोस का?"

...

"अबे तुला काय करायचेय.. मी होल्ड करतोय.. मला सांग लगेच..." ...

"ओके ओके.. नेक्स्ट टाईम एक विड्स तुला नक्की देऊन.. पण आत्ता सांग..."

काही क्षण शांततेत गेली..

"आर यु शुअर?"

..

"अं.. त्याच्या बायकोची काही माहीती मिळतेय का बघ..."

...

"... राधा म्हणालास का? ओके.. थॅंक्स ड्युड.."

चार्लीच्या डोक्यातील चक्र वेगाने धावु लागली होती. त्याने शिनाला ओढत कडेला घेतले आणि तिच्या दोन-चार मुस्काडात लगावल्या..

"वेक-अप शिना... वेक-अप...", पण शिना अजूनही ग्लानीत होती.

चार्लीने तिला फरफटत समुद्र-किनारी न्हेले आणि लाटांमध्ये ढकलून दिले. थंडगार पाण्याचा स्पर्श होताच.. शिना चरफडून जागी झाली..

"व्हॉट द हेल चार्ली.. काय करतोयेस.."

"शिना.. तुला माहीते ही राधा कोण आहे?"

"नाही.. आणि माहीती असण्याचं कारणच नाही.. का? काय झालं?"

"शिना, राधा एका करोडपतीची बायको आहे..."

"असेल.. मग?"

"ओह गॉड.. शिना.. थिंक.. ती आत्ता घरातून पळून आलीय.. ती कुठे आहे, कुणाबरोबर आहे.. कुणालाच ठाऊक नाही.. शी इज अ सिटींग डक.."

"काय बोलतो आहेस तू चार्ली.."

"आपण जर तिला किडनॅप केले तर?"

"आर यु मॅड?", शिना अचानक किंचाळत म्हणाली..

“श्श.... ओरडु नकोस..”, चार्लीने मागे वळून बघीतले.. पण लाटांच्या आवाजात शिनाचा आवाज दबला गेला होता..

“हे बघ शिना.. आपण कित्तीतरी पैसे लाटू शकतो.. थिंक.. इथे इतक्या लांब कुणाला माहीती पण नसेल ती इथे आहे ते.. इट्स इझी जॉब फ़ॉर अस... विचार कर.. इतके सारे पैसे.. आपण हा ग्रुप सोडून पळून जाऊ.. लांब कुठेतरी.. नव्याने सुरुवात करु.. व्हॉट्स से...?”

“पण किडनॅप करायचं म्हणजे नक्की काय करायचं?”, शिना

“दॅट्स द बेस्ट पार्ट. राधाला कळनार पण नाही की आपण तिला किडनॅप केलंय. तिला रोजच्यासारखंच राहु द्यायचं आपल्या बरोबर.. फक्त कुठे नजरेआड नाही होऊ द्यायचं. मी अनुरागला फोन करून सांगणार की त्याची बायको आपल्या ताब्यात आहे, इतके इतके पैसे दे.. आणि बायकोला घेऊन जा.. पैसे दिले.. की राधा त्याच्या ताब्यात.. जोपर्यंत त्याला कळेल की राधाला किडनॅप केल नव्हतंच.. आपण खुप कुठेतरी लांब गेलो असु.. सॉल्लीड प्लॅन आहे की नाही?”

“माय गॉड चार्ली.. यु आर ब्रिलियंट...”, चार्लीला मिठी मारत शिना म्हणाली.

दोघं एकमेकांच्या मिठीमध्ये भविष्याची स्वप्न बघण्यात बुडून गेले होते इतक्यात त्यांना लांबुन राधाच्या ओरडण्याचा आवाज आला.

लांब, शेकोटीभोवती काहीतरी ओरडाआरडा चालु होता.

दोघे पळत पळत तिकडे गेले.. जवळ गेले तेंव्हा त्यांना दिसलं.. की रॉकीने राधाला खाली पाडले होते आणि पॅन्टची बटण काढत तो तिच्याकडे जात होता..

“स्टॉप इट रॉकी..” चार्ली रॉकीला थांबवत म्हणाला

पण रॉकीने त्याला बाजुला ढकलले आणि तो राधावर ओणवा झाला..

राधा एव्हाना अर्धवट शुध्दीवर आली होती.

“रॉकी.. डोन्ट डू दॅट.. ऐक माझं…”, चार्ली

“डोन्ट ट्राय टु स्टॉप मी चार्ली..” असं म्हणून रॉकी ने पॅन्टच्या खिश्यातून एक लांबसडक सुरा काढुन चार्लीला दाखवला..”यु नो.. आय एम गुड अॅट इट.. डोन्ट यु..”

“रॉकी ऐक.. डोन्ट हर्ट हर.. शी मिन्स करोड रुपीज टु अस..”, राधाला काहीही होणं चार्लीला परवडण्यासारखं नव्हतं, आणि रॉकीला थांबवण, विशेषतः त्याच्या जवळ त्याचा लाडका सुरा असताना अशक्य होतं. रॉकीला विश्वासात घेणं महत्वाचं होतं आणि म्हणूनच चार्लीने त्याला सगळं एका दमात सांगून टाकलं..

अर्धवट शुध्दीत आलेली राधा हे सगळं ऐकत होती. अर्थात तिला निटसं काही कळालं नाही, पण समहाऊ जे काही चालु होते ते योग्य नव्हते आणि त्याचा अनुरागशी काहीतरी संबंध येणार होता हे तिला कळून चुकलं.

रॉकी आणि चार्ली बोलत असताना तिने हळुच इकडे तिकडे नजर टाकली. तिच्या हातापासून काही अंतरावरच एक दगड पडलेला तिला दिसला. सावकाश-सावकाश पुढे सरकत तिने तो दगड घेतला आणि घट्ट पकडून ती संधीची वाट बघु लागली.

“ऑलराईट चार्ली.. यु बेटर गेट दॅट मनी फास्ट.. मी फ़ार दिवस राधापासून लांब राहु शकणार नाही..”, असं म्हणून रॉकी राधाला निदान किस्स करावं म्हणून खाली वाकला आणि राधाने संधी साधली. हातात पकडलेला दगड तिने थाड्कन रॉकीच्या तोंडावर मारला.

रॉकीच्या नाकातून रक्ताची एक चिळकांडी उडाली आणि राधाचा चेहरा रक्ताने माखला गेला..

तळमळत रॉकी मागे सरकला. त्याच्या कानातूनही रक्त वाहात होते.

“यु बिच!”, असं म्हणून त्याने त्याचा सुरा उचलला आणि तो पुन्हा राधाकडे धावला. परंतू राधा आधीच उठून बसली होती आणि रॉकीला सुरा घेउन येताना बघताच तिने मागे धुम ठोकली.

काय होतेय हे लक्षात येताच चार्लीसुध्दा राधाला पकडायला धावला.

राधा जिवाच्या आकांताने धावत होती. अंधार पडायला लागल्यामुळे आधीच निट दिसत नव्हते, त्यात अनोळखी प्रदेश. परंतू कश्याचीही पर्वा न करता राधा धावत होती आणि तिच्यामागोमाग चार्ली आणि रॉकी…

येतानाचा मार्ग आठवून राधा धावत होती. एक टेकडी, मग दुसरी, मग पायवाट.. जे आठवेल तसे ती पळत होती. त्या ड्रग्जची नश्या अजूनही तिच्या अंगात भिनलेली होती. पण म्हणतात ना, मारणाऱ्यापेक्षा मरणारा अधीक वेगाने धावतो, तसंच राधाचं झालं होतं.

तास-दोन तास कधी लपून दम खात, तर कधी धावत राधा एकदाची गोकर्णच्या रस्त्याला येऊन लागली. पायात चपला नसल्याने असंख्य काटे-कुटे पायात घुसून, पाय रक्तबंबाळ झाला होता. झाडा-फांद्यांमध्ये अडकून अंगातले कपडे ठिकठिकाणी फाटले होते. तिच्या अंगातली सगळी ताकद संपली होती.

राधाने रस्त्याच्या मधोमध बसकण मारली. चार्ली आणि रॉकी सुध्दा काही वेळातच तेथे येऊन पोहोचले. असाहाय्य स्थितीतील राधाला बघून त्यांच्या जिवात जीव आला. आणि ते एकमेकांना टाळया देत राधाच्या जवळ येऊन पोहोचले. पण राधाला पकडणे त्यांच्या नशीबात नव्हते कारण त्याच वेळी तेथून एक पेट्रोलिंगची पोलिस-जीप जात होती.

तिघं-जण आयतेच पोलिसांच्या ताब्यात सापडले होते. ड्रग्जच्या नशेत झुलणारी राधा, त्यात कपडे फाटलेले, चेहऱ्यावर वाळलेल्या रक्ताचे डाग, रॉकीच्या हातातला सुरा पाहून त्यांना फारसा विचार करावा लागला नाही. हिप्पी लोकं आणि त्यांचे राडे त्या पोलिसांना नविन नव्हते. तिघांनाही त्यांनी जिपमध्ये बसवले आणि ते पोलिस-स्टेशनला घेऊन आले.

“चला, बोला पटा-पटा, काय झालं…”

“दॅट बिच, शी ट्राईड टु किल मी व्हाईल ड्रंक..”, रॉकी आधी राधाकडे आणि मग स्वतःच्या फुटलेल्या चेहऱ्याकडे बोट दाखवत म्हणाला..

“नो सर, आय वॉज जस्ट ट्राईंग टु सेव्ह मायसेल्फ़, ही वॉज ट्राईंग टु रेप मी..”, राधा त्याचं वाक्य अर्धवट तोडत म्हणाली..

“शट-अप.. एकेकाने बोला…”

“सर.. मी खरंच सांगतेय.. आय वॉज नॉट ट्राईंग टु किल हीम.. वॉज जस्ट ट्राईंग टु सेव्ह मायसेल्फ़.. आणि तो दुसरा.. चार्ली.. तो मला किडनॅप करणार होता..”

“करणार ‘होता’? म्हणजे, असं ठरतं वगैरे का? चला आता आपण किडनॅप किडनॅप खेळू..”

“एनिवेज.. इन्स्पेक्टर… सगळयांचे ब्लड सॅम्पल्स घ्या आणि टेस्टला पाठवा.. बघा ड्रींक्स आहेत का ड्रग्ज्स..”

“ईट्स ड्रग्ज्स सर.. मी पहील्यांदाच ट्राय केले.. आय एम नॉट अ जंकी सर..”, स्वतःच्या गळयाची शप्पथ वगैरे घेत रडकुंडीला आलेली राधा म्हणाली.

“इन्स्पेक्टर.. कस्टडीत घ्या तिघांनाही.. आणि ह्यांची बाकीची पलटण पण कुठेतरी असणार.. बघा कुठल्या बिळात लपलेत आणि घेऊन या सगळयांना…”

“सर प्लिज.. आय डोन्ट वॉन्ट टु गो इन कस्टडी..”, हात जोडत राधा म्हणाली… “मी एक फोन करु शकते का?”

“फोन? कुणाला कमीशनरना करायचाय की काय?”, हसत हसत सिनीयर इ. म्हणाले. “काय सांगता येत नाही सर.. ओळखत असेल कमिशनरला..”, डोळे मिचकावत दुसरा इन्स्पेक्टर म्हणाला

“नो सर.. मी माझ्या नवऱ्याला फोन करतेय.. पण तो ओळखतो कमीशनरना..”

“अरे व्वा.. तुमचा नवरा पण असतो की काय? हं? काय नाव काय नवऱ्याचं..?”

“मिडीया टायकून अनुराग दिक्षीत…”, असं म्हणून राधाने टेबलावरचा फोन पुढे ओढला आणि नंबर फिरवायला सुरुवात केली.

दोन्ही इन्स्पेक्टरची ‘अनुराग दिक्षीतचे’ नाव ऐकताच नजरानजर झाली. राधा फोनवर काय बोलते आहे ते काही क्षण कान देऊन ऐकू लागले आणि मग राधा खरं बोलते आहे असं लक्षात येताच ते एका कोपऱ्यात गेले.

“इन्स्पेक्टर.. टीव्ही.वर यायचंय का?”, सिनीयर इन्स्पेक्टर दुसऱ्याला म्हणाला..

“हो सर.. पण कसं..?”

“कसं म्हणजे..? मिडीयाला जर बातमी मिळाली की ‘अनुराग दिक्षितची’ बायको ड्रग्जसच्या अंमलाखाली ‘ॲटेंप्टेड टु मर्डर’ च्या केसमध्ये आपल्या ताब्यात आहे तर…”

“पण सर, मला वाटतं ती खरं सांगतेय.. तिने स्वतःला वाचवण्यासाठीच..”

“च..च.. अहो ते कोर्टाला ठरवुद्या.. आपण जरा हवा देऊ की.. ड्रग्ज्स आणि ‘ॲटेंप्टेड टु मर्डर’ दोन्ही चार्जेस द्या टाकून तिच्यावर, म्हणजे जरा जास्त बाईट्स देता येतील.. त्या अनुरागचे बिझीनेस-रायव्हल्स असतीलच की.. त्यांना पण मिळेल काहीतरी चघळायला, आणि आपल्याला प्रसिध्दी.. काय?”

“ओके सर.. मी लगेच चॅनल-९ ला फोन करतो…”

"पण एक मिनीट, बातमी आपण दिली हे उघड करु नका म्हणावं.. नाही तर नस्तं अंगाशी येऊल आपल्या..."

"ओके सर.."

"आणि जरा त्या फाईली आवरा टेबलावरच्या, कसं दिसेल ते टीव्हीवर.. हं?" असं म्हणून एकमेकांना टाळया देत हसत हसते दोघंजण एकमेकांच्या कामाला निघून गेले.

दुसऱ्या दिवशी, पोलिस-स्टेशनचा परिसर न्युज-रिपोर्टर्स, कॅमेरामॅन.. ओबि-व्हॅन्सने भरून गेला होता.. आणि नॅशनल टी.व्ही.वर ब्रेकींग-न्युज झळकत होती..

"गोकर्ण पोलिस-स्टेशनमै राधा दिक्षीत नशे-के-हालत मे धुत...विथ ॲटेंप्टेड मर्डर अंडर हर नेम....."

राधाचा फोन येऊन गेल्यावर अनुरागने चक्र वेगाने फिरवली. राधाच्या जामीनाची पुर्तता त्याने काही फोन-कॉल्सवरच करून टाकली आणि तो स्वतःचे हेलिकॉप्टर घेउनच गोकर्णला गेला. गोकर्णचे एक बिझीनेसमन त्याच्या ओळखीचे होते,त्यांच्या फार्म-हाउसवरच्या हेलीपॅडवर उतरून त्यांच्याच कारने तो पोलिस-स्टेशनला पोहोचला. पोलिस-स्टेशनवर जणु जगातले सगळे पत्रकार, सगळे टीव्ही चॅनल्स आपापल्या ओबी-व्हॅन्ससहीत जमले होते. अनुरागने आधीच फोनवरून तंबी देऊन ठेवली होती, त्यामुळे त्याची कार पोलिस-स्टेशनवर पोहोचताच पोलिसांनी त्याला गराडा घातला आणि त्याला सुरक्षीत आत घेऊन गेले.

अनुरागकडून बाईट्स मिळवण्यासाठी सगळयांची चढाओढ चालली होती, पण पोलिसांपुढे कुणाचाच निभाव लागत नव्हता..

“आता कळेल साल्याला मिडीया मागे लागली की काय होते ते...”

पोलिस-स्टेशनच्या पायऱ्या चढताना कुणाचेतरी वाक्य अनुरागला ऐकू आले, त्याने चिडून मागे वळून बघीतले, पण त्या प्रचंड गर्दीत तो आवाज कुणाचा होता शोधणं अवघड होते.

कमीशनरचा फोन येऊन गेल्यामुळे जामीनाची सगळी कागदपत्र टेबलावर तयारच होती. काही कागदपत्रांवर सह्या ठोकुन, राधाला घेउन अनुराग गाडीतून हेलिकॉप्टरपाशी आला आणि लगेचच परतीला निघाला.

घरी पोहोचेपर्यंतचा तो दीड-तास राधासाठी अत्यंत विचित्र होता. हेलिकॉप्टरमध्ये अनुराग तिच्याशी एका शब्दाने बोलला नाही. बंगल्यावर परतल्यावर अनुरागने त्याच्या पर्सनल सेक्रेटरीला फोन लावला.

“रौनक.. सॉरी लेट कॉल करतोय.. माझं बिझीनेस-क्लासचं ‘एअर-फ्रान्सचं’ बुकींग कर, रात्रीच्या फ्लाईटचं, एक बिझीनेस कॉन्फरंन्स आहे तिकडे, ती करेन अॅटेंन्ड..”

....

“हो.. मी जाणार नव्हतो.. पण तू बघीतलं असशीलच टी.व्ही.वर.. हम्म..इथे थांबलो तर उगाच मिडीयाच्या प्रश्नांना सामोरं जावं लागेल.. ७ दिवसांनी रिटर्नचं कर ओके? कन्फर्म झालं की फोन करं.. थॅंक्स..”

अनुराग फोनवर बोलत असताना राधाच्या मनात विचारांच कल्लोळ माजला होता. ‘सॉरी’ म्हणण्याचा प्रश्नच नव्हता. जे काही घडलं ते तिच्या आयुष्याचा भाग होता.. तिचे निर्णय होते.. पण निदान ’थॅंक्स’ म्हणण आवश्यक होतं. तिच्या एका फोन-कॉलवर अनुराग लगेच आला नसता तर ती आत्ता तुरुंगात असती.

अनुरागचा फोन संपला तशी ती अनुरागच्या समोर गेली.

“अनुराग....”

अनुरागने पहील्यांदा तिला निट बघीतलं. विचित्र शोल्डर-कट, मध्येच हायलाईट्स, तर मध्येच बिड्स.. फाटलेले कपडे, मळकटलेला चेहरा, नोजरिंग, थिक-आयलाईनरने काळवंडवलेल्या डोळयांच्या कडा, हातापायावर, चेहऱ्यावर ओरखडण्याच्या खुणा...

कधीकाळी त्याला आवडलेली राधा ही नक्कीच नव्हती.

इतका-वेळ दाबुन धरलेला राग त्याला असह्य झाला आणि त्याने कसलाही विचार न करता उलट्या तळहाताने राधाच्या कानफाडात लगावली आणि तो ताडताड पावलं टाकत तेथून निघून गेला.

राधाला त्याच्या ह्या कृतीचे काहीच दुःख, किंवा आश्चर्य वाटले नाही. काही क्षण ती तेथेच एकटी उभी राहीली आणि मग चेहऱ्यावर आलेले केस बाजुला सारून ती आपल्या बेडरुममध्ये आली. बराच दिवस खोली बंद असल्याने खोलीचे दार उघडताच एक कुबट वास तिच्या नाकात शिरला.

खोलीत आल्यावर तिने दार लावून घेतले आणि बेडच्या कोपऱ्याशी ती बसून राहीली.. किती वेळ झाला असेल कुणास-ठाऊक. जणु एखाद्या ब्लॅक-होल मध्ये असल्यासारखे तिला

वाटत होते. डोक्यात कसलेच विचार नाहीत, मनामध्ये कसल्याही भावना नाहीत, आजुबाजुच्या परिस्थीतीचे भान नाही. कदाचित कित्येक तास उलटून गेले असतील. पायाला मुंग्या आणि पाठीला रग लागल्यावर शेवटी ती उठून उभी राहीली आणि तिने खोलीतला दिवा लावला. समोरच्याच ६ फुटी मोठ्या आरश्यात तिने इतक्या दिवसांनंतर प्रथमच स्वतःला पाहीले. काही क्षण तिने स्वतःला ओळखलेच नाही. शेजारच्याच भिंतीवर तिचं एक तैलरंगातलं मोठ्ठ पोश्टर लटकलं होतं. त्यातली राधा आणि आरश्यातली राधा मध्ये जमीन-आस्मानाचा फरक होता.

का कुणास ठाऊक पण तिला पहिल्यांदाच स्वतःची शिसारी आली. उद्वीग्न अवस्थेत तिने केसांमध्ये अडकवलेले ते रंगीत मणी काढुन जमीनीवर फेकून दिले. नाकातली ती नोजरिंग काढुन भिरकावून दिली. डोळयांचे ते आयलायनर मनगटाने पुसून टाकण्याचा प्रयत्न केला पण त्यात ते अर्धवट पसरले आणि राधाचं रुप अधीकच भयावय दिसु लागलं.

तिने कपाट उघडलं, घरातले कपडे, टॉवेल घेतला आणि ती बाथरुममध्ये गेली.

अंगावर गरम पाण्याचा शॉवर घेतल्यावर तिला थोडं बरं वाटलं. अनेक उंची शॅम्पु, महागडे साबण वापरून तिने दहादा अंग घासून घासून धुतले. अर्धा-एक तास आंघोळ केल्यावर तिला थोडं हलकं वाटलं. बाहेर येऊन तिने आपला नेहमीच्या वापरातला पिंक-किटीचा पायजमा आणि रंगेबिरंगी हार्टसची चित्र असलेला पांढरा टी-शर्ट अंगात चढवला आणि ए/सी चालु करून ती आपल्या बेडमध्ये शिरली. नकळत कधीतरी तिच्या डोळयांतून वाहणाऱ्या उष्ण अश्रुंच्या धारांनी उशी भिजून गेली, आणि त्या अश्रुंच्या सोबतीनेच राधा झोपून गेली.

अनुराग गोकर्णच्या पोलिस-स्टेशनवर पोहोचल्याचं आणि नंतर राधाला घेऊन गाडीतून गेल्याचं लाईव्ह-फुटेज त्या ब्रेकिंग न्युजमध्ये चालु होते. शॉक-बसल्यासारखा कबीर अजूनही त्या टीव्हीपुढे बातम्या वाचण्यात मग्न होता. कबीरचा मॅनेजर.. रोहनही एव्हाना तेथे येऊन पोहोचला होता.

“तुला राधाचा फोटो बघायचा होता ना.. आता लाईव्हच बघ तिला…”, अनुराग राधाच्या दंडाला धरून ओढत जात होता तेंव्हा हताश होत कबीर रोहनला म्हणाला.. “मी त्या दिवशीच तिला थांबवायला पाहीजे होते.. माझीच चुक आहे सगळी, त्या दिवशी मी तिला थांबवले असते, तर कदाचित ही वेळ आज तिच्यावर आली नसती..”

“लुक कबीर.. तू उगाच स्वतःला दोष देऊ नकोस..”, रोहन कबीरला समजावत होता. आणि दोघांच्या बोलण्याचा काहीच कॉन्टेक्स्ट माहीत नसल्याने मोनिका दोघांकडे स्तंभीत होऊन आळीपाळीने बघत होती.

बऱ्याच वेळानंतर बातम्या बदलल्या आणि तिघंजणं पुन्हा आपल्या टेबलावर परतले.

“कोण आहे ही राधा? आणि कबीर तू कसं ओळखतोस तिला?”, शेवटी न रहावून मोनिकाने विचारले.

“मोनिका प्लिज.. आय रिअली डोन्ट वॉन्ट टु टॉक अबाऊट इट..”, थोडंस इरिटेट होत कबीर म्हणाला

कबीरचे ते इरिटेटेड एस्क्प्रेशन्स मोनिकाला नविन नव्हते. इतक्या प्रयत्नांनंतर ती कबीरच्या थोडी जवळ गेली होती. तिला ते परत बॅक-टु-झिरो करायचे नव्हते.

“ऑलराईट…व्हेनएव्हर यु फिल लाईक… मी निघते मग.. मला थोड्या फोटोच्या प्रिंट्स कलेक्ट करायच्या आहेत.. कॉल मी..”, असं म्हणून मोनिका तेथून निघून गेली.

“मला अजूनही विश्वास बसत नाहीए ती ‘राधाच’ होती..”, बऱ्याच वेळानंतर कबीर म्हणाला

“सोड ना.. हे बघ.. मला वाटतं दॅट्स व्हॉट राधा ऑलवेज वॉन्टेड.. आय मीन.. नॉट द पोलिस स्टेशन.. पण बिईंग-हिप्पी वगैरे.. कदाचित तिला त्यातले चांगले वाईट आता समजले असेल..”, रोहन म्हणाला.

“रोहन मला भेटायचंय तिला.. आत्ता…”, अचानक टेबलावरून उठत कबीर म्हणाला
“हे बघ कबीर.. मला वाटतं ही वेळ योग्य नाही. तिची काय मानसिक परिस्थीती असेल, तिच्या घरी काय वातावरण असेल आपल्याला माहीत नाही. तू असा अचानक तिच्या समोर गेलास तर.. त्यापेक्षा लेट्स वेट.. ती पण ह्याच शहरात आहे.. आणि तू पण.. आज नाही तर नंतर भेटशीलच…

“हो रे.. पण तो पर्यंत ती परत पळून गेली तर…??”, कसनुसे हसत कबीर म्हणाला..

रोहनला मात्र त्याच्या त्या बालीश प्रश्नामुळे हसु आवरणे खरंच कठीण होतं होते.

“सो हाऊ वॉज द डेट विथ मोनिका?”, विषय बदलत रोहन म्हणाला
“ए प्लिज.. डेट वगैरे काही नव्हती ही.. आम्ही आपलं कॅज्युअली भेटलो..”, कबीर
“तू असशील कॅज्युअली, ती नव्हती. तू बघीतलं नाहीस किती मस्त आवरून, तयार होऊन आली होती ती?”, रोहन

“बुल्शीट, मोनिका नेहमीच अशी झकपक असते…”, कबीर म्हणाला..
….

“रिअल्ली?” काही वेळ विचार केल्यावर तोच पुन्हा म्हणाला
“आय थिंक देअर इज समथींग कुकींग कबीर.. मी सुध्दा चांगलं ओळखतो मोनिकाला… मला अजूनही वाटतं, मोनिका इज युअर फ्युचर… मान्य आहे राधा तुला आवडते अ‍ॅन्ड ऑल.. बट आय गेस इट्स टु लेट.. ती परत घरी आलीय तिच्या..” टीव्हीकडे बोट दाखवत रोहन म्हणाला…

टीव्हीवर अनुराग-राधा एअर-पोर्टवरून घरी परतत असतानाचे फुटेज चालु होते. कबीर पुन्हा टीव्हीला चिकटला आहे हे पहाताच रोहन उठून उभा रहात म्हणाला.. “बरं चल, तुझं हे गर्ली कॉफी-कुकिज वगैरे खाऊन झालं असेल तर जरा मॅनली ड्रींक्स घेऊया? ते नविन बार्बेक्यु-नेशन सुरु झालेय तेथे कॉम्लीमेंट्री टकीला शॉट्स आहेत.. व्हॉट्स से?”

“नो यार.. बार्बेक्यु इतकी भुक नाहीये…”, कबीर

“ऑलराईट्स, जस्ट ड्रिंक्स देन? कॅफे-इस्टवुडस?”, रोहन झोमॅटोवर जवळपासची लोकेशन्स बघत म्हणाला..

“साउंड्स गुड… पण मी थोडा चेंज करून येतो पट्कन.. गाडी आहे ना तुझी?”, कबीर.. “यप्प.. ये पट्कन, मी थांबतो”, रोहन

काऊंटवर बिलाचे पैसे देऊन कबीर शेजारच्या बिल्डींगमधील त्याच्या घरी कपडे बदलायला गेला.

कबीर गेल्यावर इतका वेळ व्हायब्रेट-मोड्वर वाजणारा फोन शेवटी रोहनने उचलला.

मोनिका इतका वेळ आपल्याला फोन का करत आहे हे त्याला कळत नव्हते, पण तो फोन नक्कीच कबीर संबंधी आहे हे त्याला ठाऊक होते आणि समहाऊ कबीरसमोर तो फोन घेणे त्याला शक्य नव्हते म्हणून तो फोन उचलत नव्हता. पण कबीर नजरेआड होताच रोहनने फोन उचलला.

“हम्म मोनिका.. बोल..”

“कबीर नाहीए ना तेथे…?”, अधीरतेने मोनिकाने विचारले

“नाहिए..”

“हे बघ रोहन.. तू आम्हा दोघांचा जवळचा मित्र आहेस.. म्हणून विश्वासाने मी तुला काही सांगु आणि तुझ्याकडून काही मागु शकते?”, मोनिका

“ऑफकोर्स.. गो अहेड..”

“रोहन.. ती राधा कोण आहे… तिला बघून कबीर असा हायपर का झाला ह्याच्याशी खरं तर मला काही घेणं देणं नाही. मी आणि तो मध्ये काही काळासाठी एकत्र नसताना ती किंवा दुसरं कोणी त्याच्या आयुष्यात होतं का ह्याबद्दलही मला काही माहीती नकोय. पण एक गोष्ट नक्की आहे की.. आय वॉन्ट टु विन बॅक कबीर…”

….

“माझ्याकडून काही चुका झाल्या मला मान्य आहे, आणि मला त्या सुधारायच्या आहेत.. विल यु हेल्प मी?”, मोनिका

“आय डोन्ट वॉन्ट टु कमीट एनीथींग मोनिका..,कबीरच्या मनात काय आहे, हे मलासुध्दा ठाऊक नाही. तो सध्या तरी एका वेगळयाच मनस्थीतीत आहे.. सो मला त्याला प्रेशराईज नाही करायचंय, पण एक नक्की, शक्य ती सगळी मदत मी तुम्हा दोघांनाही करीन…”, रोहन

“थॅंक्स रोहन.. आय कुडंट आस्क यु मोर दॅन धिस.. बाय…” असं म्हणून मोनिकाने फोन ठेवून दिला.

तेव्हढ्यात समोरून कबीर रस्ता क्रॉस करून येताना त्याला दिसला.. “देवदास रे.. खरंच देवदास.. दोन-दोन मुली हाताशी असूनही हा मात्र एकटाच..”, स्वतःशीच हसत रोहन म्हणाला..

घटनेला एक आठवडा उलटून गेला होता, पण एक दिवसही राधा कबीरच्या मनातून गेली नव्हती. आणि दोघंही एकाच शहरात म्हणल्यावर कबीर कधीही, कुठेही जाताना सतत राधा कुठे दिसते का हेच पहात होता. परंतू राधा त्याला ह्या दिवसांत तरी कधीच दिसली नाही. राधाने ते ७-८ दिवस स्वतःला घरातच, किंबहुना खोलीतच कोंडून घेतले होते. अनुराग फ्रांन्सला निघून गेल्यावर त्या मोठ्या व्हिलामध्ये ती एकटीच पडली होती. गरजेपुरतीच ती खोलीतून बाहेर पडे. घरातल्या नोकर-चाकरांसमोरही जायची तिला इच्छा होत नव्हती. अनुराग आणि त्याच्या फॅमीलीबरोबर कित्येक वर्ष काम केल्याने, त्याच्याशी लॉयल असलेले ते राधाचा द्वेष करु लागले होते.

“रोहन…”

“कबीर..राधाविषयी बोलणार नसलास तरच बोल..”, संगणकावर काम करता करता रोहन म्हणाला, तसं तोंड बारीक करून कबीर पुन्हा आपल्या केबिनकडे निघाला..

“ओके.. सॉरी.. बोलं..”, कबीरला थांबवत रोहन म्हणाला..

“रोहन.. मला भेटायचंच आहे राधाला.. एकदाच.. मग भले तिने मला ओळख नाही दाखवली तरी चालेल, किंवा मला तुला भेटायचं नाही किंवा अजून काहीही म्हणाली तरी चालेल.. पण एकदाच…”

“अरे हो.. हो.. इतका हायपर का होतो आहेस… करु काही तरी आपण ओके…?”

इतक्यात कबीरचा फोन वाजला.. कबीरने वैतागून स्क्रिनवरचा नंबर बघीतला आणि फोन बंद करून टाकला…

“काय रे? घेतला का नाहीस फोन?”, रोहन

"ह्या मोनिकाने एक वैताग आणलाय.. दिवसांतून ४-५दा फोन करते..", कबीर

"का?"

"काही नाही.. असंच.."

"हे बघ कबीर...", रोहन खुर्चीतून उठत म्हणाला..

"आता तू मोनिकाची बाजु घेऊन मला समजावण्याचा प्रयत्न करणार असशील तर बोलु नकोस..", हसत हसत कबीर म्हणाला..

..."बरं.. सॉरी.. हे बघ.. तू म्हणतोस ना.. तसंच कदाचित मोनिकाच माझं फ्युचर असेल.. पण जोपर्यंत मी राधाला भेटत नाही, तिच्याशी बोलत नाही तो पर्यंत मी मोनिकाबद्दल विचारच करु शकत नाही.. आय वॉन्ट टु सी दॅट डोअर क्लोज्ड रोहन.. मला राधाने सरळ सरळ सांगावं.. मगच मी राधाला विसरायचा प्रयत्न करेन. माझी आणि राधाची शेवटची भेट..ती काहीही बोलत नसतानाही तिची खुप काही बोलणारी नजर मी विसरु शकत नाही रोहन.. आय नो जशी मला ती आवडते तसाच मी सुध्दा तिला आवडतो..."

"असेल ना.. पण त्यावेळची परिस्थीती वेगळी होती कबीर.. तेंव्हा राधा एकटी होती, स्वतंत्र होती..."

"ॲग्रीड.. म्हणूनच तिला एकदा का होईना मला भेटणं महत्वाचं आहे.. पण कसं हेच कळत नाहीए..."

"ओके हे बघ.. तुला राधा म्हणाली होती ना की तुझं पुस्तक पब्लिश झालं की ती नक्की वाचेल?", थोडावेळ विचार करून रोहन म्हणाला.

"हो.. म्हणाली होती...", कबीर..

“बरं, मग एक काम कर.. तुझ्या पुस्तकाच्या शेवटी एक नोट टाक.. लिही की हा पुस्तकाचा शेवट नाही, पण पुस्तकाचा शेवट जाणण्यासाठी कथेचा नायक अजूनही ‘मिरा’ची वाट बघतोय.. तुझा फोन नंबर तर असतोच पुस्तकावर… म्हणजे बघ.. आशय असा लिही, बाकी शब्द काय वापरायचे तुच जास्त जाणतोस.. पण राधाने हे पुस्तक वाचलं तर तिला नक्कीच कळेल की हे पुस्तक तुम्हा दोघांच्या गोष्टीचं आहे.. नशिबात असेल तर ती नक्की फोन करेल..”

“वॉव्व.. दॅट्स ग्रेट आयडीया रोहन.. जर राधाने फोन केला ना मला.. तर तुला काय वाट्टेल ते देईन मी…”

“बाकी आपण पुस्तकाची पब्लिसीटी दणकून करु.. तुझं पुस्तक लॉंच झालंय हे राधापर्यंत पोहोचलं पाहीजेच.. आणि आपण ते पोहोचवुच..”, रोहन कबीरच्या दंडावर थोपटत म्हणाला..

कबीरचं पुस्तक रोहन म्हणाला तसं खरंच दणक्यात लॉंच झालं. क्रॉसवर्डमध्येही ह्यावेळेस चांगली गर्दी झाली होती. रिडींगच्या वेळेस कबीरची नजर सतत राधाचाच शोध घेत होती..

“कुठे आहेस तू राधा?…प्लिज एकदा.. फक्त एकदा भेट…”, कबीरचे मन आक्रंदत होते..

पब्लिसीटीमध्ये कोणतीही कसर ठेवण्यात आली नव्हती. होर्डींग्ज, लिडींग न्युजपेपर्समध्ये जाहीरात, इव्हन रोहनने कबीरची एक छोटी मुलाखत पण लोकल रेडीओ-एफ-एम वर आयोजीत केली. रेडीओवर पुस्तकाबद्दल बोलताना कबीर प्रचंड नर्व्हस झाला होता. कदाचित.. कदाचित त्याचं बोलणं कुठेतरी राधा ऐकत असेल…..

“द हिरो ऑफ द स्टोरी इज स्टील वेटींग फ़ॉर मिरा.. होपींग टु गेट ए कॉल फ़्रॉम हर वन डे…”, शो संपताना सुचक शब्दात कबीर म्हणाला होता.

जे काही शक्य होतं ते दोघांनी मिळून केलं होतं. आता सर्वकाही नशीबाच्या हातात होतं.

पुस्तक लॉंच झाल्यापासून साधारण दोन आठवड्यांनी रोहन आनंदाने काही पेपर्स घेऊन कबीरच्या केबिनमध्ये आला..

“कबीर गुड न्युज.. आपली फर्स्ट एडीशन विकली गेली आहेस कुठे?? यु रॉक मॅन.. दुसरी एडीशन ऑन इट्स वे….”

पण कबीरच्या चेहऱ्यावर फारशी उत्सुकता नव्हती…

“तू का असा तेराव्याला आल्यासारखा तोंड करून बसला आहेस…”, कबीरचा मख्ख चेहरा बघून रोहन म्हणाला

“मग काय करु.. दोन आठवडे होऊन गेले….”

“तरीही राधाचा फोन नाही.. असंच ना? अरे पुस्तक वाचून पुर्ण व्हायला तरी वेळ देशील की नाही तिला. असं काय लहान मुलासारखं करतोएस. तुला काय वाटतं, पहिल्याच दिवशी जाऊन तिने तुझं पुस्तक विकत घेतलं असेल आणि एका दिवसांत संपवून लगेच तुला फोन करायला हवा का?”

“पण मग बाकिच्या लोकांचे कसे फोन येतात मला.. आतापर्यंत शेकडो ‘मिरा’ मला फोन करून गेल्या.. ऑल फ़ेक.. म्हणे मी मिरा बोलतेय.. तुझ्या पुस्तकातली तुझी मिरा.. ओळखलंस का? एका प्रश्नाचं उत्तर कुणाला देता आलं नाही पण.. काय टाईम-पास वाटतो का लोकांना हा..”

“हा हा हा हा.. हे मात्र फार भारी हं.. लेका सेलेब्रेटी झालास तु...” असं म्हणून रोहन निघून गेला.

दिवसांमागून दिवस जात होते. प्रत्येक दिवसांगणिक कबीरची निराशा आणि फ्रस्ट्रेशन वाढत चालले होते आणि एका दिवशी दुपारी त्याचा फोन किणकीणला...

तो आधीच प्रचंड वैतागलेल्या मुड मध्ये होता.. मोनिकाला प्रत्येक वेळी भेटायला नाही म्हणणं त्याला अवघड होतं होतं आणि शेवटी कंटाळून त्या संध्याकाळी हॉटेलमध्ये भेटायचं त्याने मनाविरुध्द कबुल केलं होतं.

“आता हा फोन जर कुणा खोट्या मिराचा असेल तर तिचं काही खरं नाही..”, मनोमन कबीर म्हणाला आणि त्याने फोन उचलला..

“हॅल्लो.....कोण बोलतंय?”

“मिरा...”, पलिकडून आवाज आला...

का कुणास ठाऊक, पण कबीरच्या सर्वांगावर शहारा आला. अचानक त्याचे स्नायु आखडले गेले, ह्रुदय दुप्पट वेगाने ब्लड पंप करु लागले, कानाच्या पाळया गरम झाल्या....

काहीश्या साशंक स्वरात तो म्हणाला... “राधा?”

पलिकडून काही क्षण शांततेत गेली आणि मग आवाज आला... “हम्म.. राधा बोलतेय..”

कबीरला पुढे काय बोलावं तेच सुचेना. तो नुसताच फोन कानाला लावून बसून राहीला..

“हॅल्लो.. आहेस का?”

“हो.. आहे आहे..”, राधाच्या आवाजाने तो भानावर आला

बहुदा राधाला सुध्दा पुढे काय बोलायचे हे सुचेना, त्यामुळे काही क्षण शांततेत गेले.

“कशी आहेस?”, कबीरने विचारले

“टी.व्ही. बघतोस ना? मग माहीती असेलच की मी काय काय दिवे लावलेत ते..!”, काहीसं हसून राधा म्हणाली..

“तुझीच चुक आहे.. काय गरज होती त्या दिवशी असं अचानक निघून जायची. मला थोडा वेळ दिला असतास तर....”

“हे बघ कबीर.. जुन्या गोष्टींबद्दल बोलून काय उपयोग.. जे झालं ते झालं.. लेट्स मुव्ह ऑन...”

“राधा, मला भेटायचंय तुला.. प्लिज नाही म्हणु नकोस.. तू म्हणशील तेथे, म्हणशील त्या हॉटेलमध्ये...”

“मला पब्लिक-अटेंन्शन नकोय कबीर.. भेटुयात.. पण हॉटेलमध्ये नको...”

“ऑलराईट.. मग कुठे?”

“अं.. तुझ्या घरी? चालेल?”

“येस चालेल.. कधी?”

“आज संध्याकाळी? साधारण ७ वाजता?”

“डन.. मी वाट बघेन..”

“ठिके मग.. व्हॉट्स-ॲपवर मॅप पाठव.. भेटु संध्याकाळी..”

“ओके.. बाय..”

“बाय….”

फोन बंद झाला तरीही कबीर बऱ्याच वेळ फोन कानाला लावून बसला. त्याने घड्याळात पाहीले. ३.३० वाजून गेले होते. कबीरला त्याची लिव्हींग रुम आठवली. प्रचंड पसारा, अस्ताव्यस्त पसरलेले कपडे, पुस्तक, चार्जर्स.. पूर्ण घर एक कचराकुंडी झाली होती.

कबीरने लॅपटॉप बंद केला आणि तो तडक घरी पोहोचला. बाहेरचे कपडे बदलून त्याने घरातले कपडे घातले आणि घर आवरायला सुरुवात केली. घरातल्या प्रत्येक वस्तुचा त्याला अचानक राग येऊ लागला होता..

“ही.. ही खुर्ची.. ही काय खुर्ची आहे.. गेल्या महीन्यात त्या प्रदर्शनात काय मस्त रिक्लायनर्स होत्या.. त्या घेतल्या असत्या तर..”

“बिन-बॅगमधले थर्माकॉलचे बॉल्स चेपून ती पुर्ण चपटी झाली होती..”

“कधीकाळी मोनिकाच्या आवडीने घेतलेले सोफा आणि कुशन कव्हर्स फारच भडक आणि ऑड वाटत होते”

“भिंतींवरच्या मॉडर्न-आर्ट्स पेंन्टींग्सच्या फ्रेम्स अगदीच थिल्लर वाटत होत्या..”

“सेंटर-टेबलाचे टवके उडल्याने ते अधीकच जुनाट वाटत होते..”

कबीरला सगळे सामान फेकून द्यावेसे वाटत होते, पण हे सगळं करायला आज्जीबात वेळ नव्हता. जेव्हढं शक्य होईल तेव्हढं करत त्याने लिव्हींग रुम साफ़ केलं. कोपऱ्यावरच्या फ्लोरीस्टकडून केशरी आणि पिवळया रंगाच्या जर्बेराच्या फुलांचा एक गुच्छ आणलाआणि सेंटर-टेबलावरच्या फुलदाणीत सजवला. अनेक दिवस वापराविना पडून राहीलेलं रुम-फ्रेशनरचा फवारा मारला. सिडी-प्लेयरवर ‘जगजीतच्या’ गाण्यांची एक सिडी लावली आणि बऱ्यापैकी कपडे करून तो तयार झाला.

वेळ कसा गेला ते कबीरला कळालेच नाही. घड्याळात ७ वाजून गेले होते. वातावरणात जणु एक प्रकारचा दबाव असल्यासारखं त्याला वाटत होतं. घड्याळयाच्या सेकंद काट्याचा आवाज सुध्दा स्पष्ट ऐकू येत होता.

*“हाथ छूटे भी तो.. रिश्ते नहीं छूटा करते... वक़्त की शाख से... लम्हे नहीं टूटा करते...”*

जगजीतसिंगच्या मॅजीकल आवाजाने तो पुरता सुखावला गेला. रेलींगचेअरवर आरामात बसून डोळे मिटून तो त्या गाण्याचा आनंद घेत होता.

साधारणपणे ७.२०च्या सुमारास त्याच्या दारावरची बेल वाजली तसा तो खाड्कन खुर्चीतून उठला. बुलेट-ट्रेनपेक्षाही अधीक वेगाने त्याच्या छातीचे ठोके पडत होते. त्याने एक दीर्घ श्वास घेतला आणि दरवाजा उघडला. समोर राधा उभी होती. लाल-पांढऱ्या चेक्सचा शर्ट आणि फिक्कट निळया रंगाची जिन्स असा साधाच पेहराव तिने केला होता. पण कबीरला ती तितकीच सुंदर भासली जशी त्याला त्या दिवशी हॉटेलमध्ये वाटली होती.

पाठीमागे धरलेल्या हातातल्या फुलांचा गुच्छ कबीरला देत ती म्हणाली.. “तुझ्या पुस्तकाच्या सस्केसबद्दल अभिनंदन...”

त्या फुलांकडे हसून बघत कबीर म्हणाला... “जर्बेरा...!!”

“हो ! का? हसायला काय झालं?”

दारातून बाजुला होत, कबीरने सेंटर टेबलाकडे बोट दाखवले..

“छान आहे की रे घर तुझं..” लिव्हींग रुम न्याहाळत राधा म्हणाली.. “मला वाटलं लेखकाचं घरं म्हणजे असं उगाचंच साहीत्य संबंधीचे म्युरर्ल्स, विवीध मान्यवर लेखकांची किंवा त्यांच्या कोट्सच्या फ्रेम्स वगैरे असेल...”

“बस.. काय घेणार?”, कबीरने विचारलं

“काय आहे? स्कॉच?”, राधा

“आहे.. सोडा चालेल?”

“नको, एकच सिक्स्टी कर, ऑन द रॉक्स…”

कबीरने फ्रिजमधून बर्फ काढला आणि दोन ग्लास आणि स्कॉचची बॉटल घेऊन तो राधाच्या समोरच्या खुर्चीत बसला.

“कसं वाटलं पुस्तक?”, पेग भरून राधाकडे देत कबीर म्हणाला “खुप छान. खरंच आवडलं मला, मस्त लिहीलं आहेस. म्हणजे असं उगाच काय म्हणतात ते.. शब्दबंबाळ लेखन न करता नेहमीच्याच, ओघवत्या भाषेत लिहीलंस त्यामुळे वाचायला छान वाटलं…”

“आणि मीरा? आवडली??”

“खुपच लक्ष ठेवून होतास की तू माझ्यावर.. अगदी माझ्या बारीक-सारीक सवयी पण छान टिपल्या आहेस.. म्हणजे असं मी मला स्वतःला एक त्रयस्थ म्हणून अनुभवत होते…”

“मग..लेखक म्हणल्यावर ते करावंच लागतं…”

“जे घडलं ते तर तू व्यवस्थीत उतरवलं आहेसच, पण जे नाही घडलं ते पण.. म्हणजे तो किसिंग सिन खरचं इंटेन्स होता बरं का…”

कबीर थोडासा शरमला.. “आय मीन.. कथेसाठी थोडं फार रोमॅन्टीक काही तरी हवंच ना! नाहीतर तेंव्हा तसा रोमांन्स काही नव्हताच तेथे…”

“अहं. अहं.. हा टॉन्ट होता का?”, हसत हसत राधा म्हणाली..

रेकॉर्डरवर ’झुकी झुकी सी नजर’ चालु होते..

राधाने डोळे मिटून मान मागे करून काही क्षण त्या गाण्याचा मनमुराद आस्वाद घेतला…

“काय आवाज होता यार.. ॲबस्युलेटली मॅजीकल.. खरंच रोमांच येतात कधी कधी अंगावर…”

..

“इफ़ यु डोन्ट माईंड, थोडा मोठा करु आवाज…”

“कर की.. विचारायचं काय त्यात..”

राधाने गाण्याचा आवाज थोडा मोठा केला..

“यु नो व्हॉट.. माझ्या काही मेमोरीज आहेत ह्या गाण्याच्या.. कॉलेजला असताना ना, रंगपंचमीला, रंग खेळून झाल्यावर मी, माझा मित्र.. आमच्या दोघांच्या गर्ल-फ्रेंड्स आणि इतर काही मित्र-मैत्रीणी.. आम्ही बाईकवरून डॅमवर गेलो होतो पाण्यात खेळायला… माझ्या मित्राची गर्लफ्रेंड सॉलीड हॉट होती आणि तिचा आवाजपण इतका मस्त गोड होता. मस्त गाणी म्हणायची..

तर तेथे पाण्यात खेळून झाल्यावर, सगळे तिला गाणं म्हण, गाणं म्हण म्हणून मागे लागले होते. मी तेंव्हा ना जरा शाय टाईप्स होतो. जास्ती बोलायचो नाही. मी आपला मान खाली घालून उभा होतो.

तर ती एकदम माझ्याकडे बघून म्हणाली.. “ठिके ह्याच्यासाठी मी एक गाणं म्हणते..” आणि तिने तेंव्हा ’झुकी-झुकी सी नजर..’ म्हणलं होतं.

“व्वा.. एक तर एखाद्या हॉट मुलीनं गाणं म्हणावं आणि ते पण.. मित्राच्या गर्लफ्रेंडने.. तू तर एकदम सातवें आसमॉं पर वगैरे असशील की…”

“हो ना... अजूनही हे गाणं लागलं की तो प्रसंग जश्याच्या तसा माझ्या डोळयासमोर उभा रहातो..”

“सो त्या दिवशी....”, कबीर पुढे काही बोलणार इतक्यात त्याचा फोन वाजला.. कबीरने कुणाचा फोन आहे बघीतला आणि कट करून ठेवून दिला..

“का रे? घे की फोन...”, राधा म्हणाली

“नथिंग इंम्पॉर्टंट..”

“बघ बघ.. कुठल्यातरी मीराचा असेल फोन...”, राधा हसत म्हणाली..

“खरंच अगं, इतके फोन येत होते नंतर.. त्या दिवशी तुझा फोन आला.. आय वॉज लाइक.. आता हा फोन तुझा नसेल आणि दुसरीच कोणी असेल.. तर तीचं काही खरं नव्हतं...”

“हम्म.. बरं तू काही तरी म्हणत होतास.....”

“हो.. तर त्या दिवशी....”, इतक्यात कबीरचा फोन पुन्हा वाजला..

“अरे खरंच घे फोन.. महत्वाचा असेल...”, राधा..

कबीरने वैतागून फोन कट केला आणि फोन बंदच करून टाकला..

“नाही गं.. हेच नेहमीचे स्पॅम कॉल्स.. तर मी म्हणत होतो की त्या दिवशी.. तू गेल्याचं लक्षात आल्यावर.. तुला खुप शोधलं.. बस स्टॅंडपर्यंत जाऊन आलो....”, कबीर

“तू गेला होतास बस स्टॅंडवर...ओह गॉड.. आय वॉज सो राईट..”, राधा

“म्हणजे?”, गोंधळून कबीर म्हणाला..

“मला माहीती होतं.. तू मला शोधायचा प्रयत्न करशील.. म्हणून मी मुद्दामच आधी बस-स्टँडला गेले आणि तेथून टॅक्सी बदलून दुसरीकडे…”, स्वतःवरच खुश होत राधा म्हणाली..
“व्हेरी स्मार्ट..”, काहीसा चिडून कबीर म्हणाला..

“ए बाय द वे.. सोफी ऑन्टी कश्या आहेत.. त्यांना लिहीलेल पत्र दिलेस का त्यांना?कश्या आहेत त्या? बऱ्या आहेत का आता? तेंव्हा ॲक्सीडेंट झाला होता…”

“हम्म.. दिलं मी पत्र.. पण त्या ओके होत्या.. बहुतेक त्यांना माहीती होतं तू कधी ना कधी अशी अचानक जाणार म्हणून..”

“हम्म.. मी फोन करेन त्यांना उद्या..”

“एनिवेज.. बाकी? अनुराग काही म्हणला का भेटल्यावर..?”

“हो.. म्हणाला ना.. बरंच काही म्हणाला.. म्हणजे डायरेक्ट नाही काही बोलला पण..”

“पण? पण काय?”

“तो फ्रांन्सला आहे सध्या.. इथे त्याला माझ्यामुळे फ़ार एम्बॅरस झालं असतं.. सो तो काहीतरी कारण काढुन फ्रान्सला गेला.. आणि वकिलाबरोबर नोटीस पाठवली…”

“कसली?”, खुर्चीच्या काठावर सरकत कबीर म्हणाला..“डीव्होर्स…”

काही क्षण शांततेत गेले..

“आय डोंन्ट नो व्हॉट टु से? पण आत्ता खरं त्याने तुझ्या पाठीशी रहायला हवं होतं.. म्हणजे त्याचा राग स्वाभावीक आहे.. पण असं एकदम एक्स्ट्रीम होण…”

“कबीर.. ॲक्च्युअली डीव्होर्सचं कारण वेगळंच आहे..” काहीसं अस्वस्थ होत राधा म्हणाली

“तू त्याला सोडून गेलीस.. असं पोलिस केस वगैरे हेच ना?”, कबीर
“नाही.. आय मीन तो एक त्याला बहाणा मिळाला, पण.. सोड ना.. सांगीन कधीतरी.. इट्स बिट मोअर पर्सनल…”

“मग? आता?”

“म्हणजे तो आत्ता लगेच केस फाईल करणार नाहीए.. कदाचित हे प्रकरण निवळलं की.. नाहीतर आत्ता ही डिव्होर्स केस त्याच्या विरोधात जाईल.. रागाच्या भरात घेतलेला निर्णय न्यायालयात मान्य नाही होणार… पण मी आता त्या घरात नाही राहु शकत…”

“तू परत गायब होणार की काय मग?”

“आय विश कबीर.. पण ते शक्य नाहीए.. माझ्यावर ’ॲटेम्प्ट ऑफ़ मर्डरची’ केस आहे, मला पोलिस-स्टेशनला दोन आठवड्यातून एकदा रिपोर्ट करायला सांगीतलं आहे.. शिवाय.. पोलिसांच्या परवानगीशिवाय मला शहर सोडता येणार नाहिए.. सो आय एम रिअली स्टक…”

“दॅट्स सॅड राधा.. पण हे नक्की झालं कश्यामुळे…?”

कबीरला सोडून बाहेर पडल्यानंतरपासून ते आत्तापर्यंतचा सगळा प्रवास राधाने कबीरला ऐकवला. कधी आनंद, कधी एस्काईटमेंट, कधी भिती, कधी चिंता.. राधाच्या चेहऱ्यावरचे भाव क्षणाक्षणाला बदलत होते.. आणि कबीर??..

कबीर अधीकाधीक तिच्या प्रेमात बुडत चालला होता.

अनुरागच्या घरी आल्यानंतर तिला किती एकटं वाटत होतं आणि घरातले नोकर-चाकर कसं तिला हिडीस-फिडीस करत होते हे ऐकल्यावर कबीरला राहावलंच नाही, त्याने हातातला ग्लास खाली ठेवला, उठून राधाच्या जवळ गेला आणि आवेगाने तिला मिठीत घेतलं…

“स्टॉप राधा.. प्लिज स्टॉप.. मी अधीक नाही ऐकू शकत.. प्लिज स्टॉप…”

महीन्यानंतर राधाला पहिल्यांदा कुणी जवळ घेतलं होतं. तिचा नवरा.. तिचे आई-वडील.. तिचे सो-कॉल्ड हाय-सोसायटीमधले मित्र-मैत्रीणी, सगळयांनी तिच्याशी संबंध तोडले होते. राधा खरोखरंच एकटी पडली होती. कबीरची ती उबदार मिठी ती झिडकारु शकली नाही. तिच्या डोळयांतून अश्रु वाहु लागले आणि त्याच वेळी लिव्हींग रुमचं दार उघडल्याचा आवाज आला.

दोघांनीही मागे वळून बघीतलं.. दारामध्ये ऑलीव्ह रंगाचा पार्टी-वेअर घातलेली एक छोट्या चणीची मुलगी उभी होती…

“मोनिका???”, कबीर आश्चर्याने म्हणाला..

मोनिकाने एकवार राधाकडे बघीतलं आणि मग ती कबीरला म्हणाली.. “ओह सॉरी.. मी डिस्टर्ब केलं का?”

कबीर काहीच बोलला नाही..

“सांगायचंस ना मग तसं.. मी निदान वाट तरी नसते बघत बसले…”, मोनिका

“तू माझी वाट बघत होतीस?”

“कुल.. सो आज आपली डेट होती हे पण तू विसरलास का? आणि ते पण हिच्यासाठी…” राधाकडे बोट दाखवत मोनिका म्हणाली.. “ब्लडी जंकी आणि क्रिमीनल बिच…”

“स्टॉप इट मोनिका.. यु ओन्ली नो हाफ़ ट्रुथ…”, कबीर चवताळून म्हणाला..

“तरीच म्हणलं हा फोन का बंद करून बसलाय.... यु रिअली डोन्ट डिझर्व्ह मी कबीर.. गुड बाय.. आणि हो.. ही तुझ्या फ्लॅटची किल्ली जी इतकी वर्ष मी जपून ठेवली होती.. आय गेस.. मला आता त्याची गरज नाही..”

कबीर काही बोलायच्या आधीच मोनिका दार आपटून निघून गेली....

“तुझी गर्लफ्रेंड?”, राधा

“होती.. आम्ही लिव्ह-इन मध्ये होतो काही वर्षांपुर्वी, देन वुई ब्रोक-अप..”, कबीर

“पण आत्ता तुमची डेट होती ना..”

“मला तसंही जायची इच्छा नव्हतीच.. पण खरं तर मी विसरून गेलो होतो..”

“दॅट्स नॉट गुड कबीर.. जा थांबव तिला.. मी.. जातेय... बाय...”

“थांब राधा..मोनिका गेली तर जाऊ देत, तसंही आमच्यात आता काही नाहीए, आणि भविष्यात काही होईल असेही वाटत नाही.. इट्स गुड फ़ॉर हर खरं तर....”

“हे बघ कबीर.. विषय निघालाच आहे तर बोलते.. आपल्या दोघांतही तसं काही नाहीए, आणि भविष्यात काही होईल असेही वाटत नाही.. सो.. इट्स गुड फ़ॉर यु अलसो टु नो इट...”

“पण का राधा? आता तर तू आणि अनुराग सुध्दा वेगळे होताय.. मग काय प्रॉब्लेम आहे..”

“कबीर, हे सगळं बोलण्याची ही वेळ नाही, मला असं वाटतंय की तू मोनिकाला थांबव.. निदान तिची माफ़ी माग. इट्स नॉट गुड टु किप अ गर्ल वेटींग ॲन्ड देन कॅन्सल द डेट.. बी अ जेंटलमन.. मे बी ती माफ़ करेल.. मे बी तुम्ही एकत्र याल.. माझ्यामुळे तुमच्यात भांडणं नकोत.. आपण नंतर बोलु... ” असं म्हणून कबीरला पुढे काही बोलु न देता राधा बाहेर पडली..

कबीरला काय करावं तेच कळेना.. मोनिकाच्या मागे जाऊन तिला थांबवावं का राधाच्या?

कोपऱ्यातल्या बारवर ठेवलेली स्कॉचची बॉटल कबीरला अधीक खुणावत होती.. “कम टु मी डिअर.. यु निड मी मोर दॅन एनीथींग एल्स...”

कबीरने हताशपणे हवेत हात हलवले आणि त्याने स्कॉचची बॉटल तोंडाला लावली. स्ट्रॉंग स्कॉच कबीरचा घसा जाळत पोटामध्ये उतरत होती..

बट देअर वॉज समथींग एल्स दॅट वॉज बर्निंग मोर दॅन हीज थ्रोट.. इट वॉज हीज हार्ट...

“गुड मॉर्निंग रोहन..”, ऑफीस मध्ये आल्यावर कबीर म्हणाला..

रोहनने मात्र काही उत्तरच दिले नाही, संगणकावर तो काम करण्यात मग्न होता.

“रोहनss... गुड मॉर्नींग...”, कबीर पुन्हा एकदा म्हणाला.. “गुड मॉर्निंग...”, रोहन

“का रे? असा उदास का? काय झालं?”, कबीर

“काही नाही असंच..”

“तब्येत बरी आहे ना?”

“हम्म...”“बरं.. आपल्या पुस्तकाच्या सेल्सचा रिजनल रिपोर्ट घेउन जरा केबिनमध्ये येतोस का?.. बघु अजून कुठे कमी सेल्स असेल तर तेथे प्रमोट कसं करता येईल...”, कबीर “मी मेल करतो फाईल..”, रोहन

कबीरने जरावेळ रोहनकडे रोखुन कडे बघीतले आणि मग तो ठिक आहे म्हणून केबिन मध्ये निघून गेला.

रोहनचे काय बिनसले होते कुणास ठाऊक, पण त्याला मुळपदावर यायला दोन दिवस लागले. काहीतरी फॅमीली प्रॉब्लेम असेल म्हणून कबीरनेही त्याला नंतर फारसे छेडले नाही.

एके दिवशी कबीर नुकताच ऑफीसमध्ये आला होता तोच त्याचा फोन वाजला. राधाचा फोन बघताच त्याला एकदम आश्चर्याचा धक्काच बसला.

“हायsss.. प्लिजंट सप्राईज..”, कबीर

“हाय..! काय करतोएस?”, राधा

“नथिंग, ॲज युजवल.. जस्ट आलोय ऑफिसला.. तू बोल..”

“अम्म.. दोन दिवस फ्रि आहेस का?”

“दोन दिवस???”

“हम्म.. म्हणजे काही महत्वाचं काम असेल तर राहु देत.. पण जनरल.. आज आणि उद्या?”

“तसं महत्वाचं काही नाहीए, बोल काय काम आहे?”

“मला गोकर्णला जायचंय.. ऑफीशीअल आयडेंटीफिकेशनसाठी.. म्हणजे ज्यांनी त्या दिवशी मला…अं…. त्यांची ओळख पटवायची आहे.. तस् तेथे तासाभराचच काम आहे.. पण इट्स लॉंग जर्नी.. ड्रायव्हर आहे.. पण एकट्याने जायचा कंटाळा आलाय.. तू फ्रि असशील आणि बरोबर यायची इच्छा असेल तर…”

“व्हाय नॉट.. तेवढाच बदल होईल मला पण.. आणि तुझी कंपनी असेल तर…”

“प्लिज.. उगाच फ्लर्ट करु नकोस..”

“नाही खरंच.. मी येतो बरोबर.. कधी जायचं आहे?”

“तासाभरात? तू सांग कुठे पिक-अप करु.. आत्ता निघालो तर संध्याकाळी ४ पर्यंत पोहोचु तेथे. मग तेथलं काम संपलं की लेट्स हेड टु गोवा.. सोफी ऑन्टीकडे आजची रात्र राहु.. तेव्हढीच भेट पण होईल त्यांची.. उद्या दुपारी जेवणं करून निघु.. संध्याकाळ पर्यंत परत…”

“फॅन्टास्टीक.. येतो मी, एक काम कर, घरापाशीच ये.. मी पट्कन हॅन्डबॅग भरून ठेवतो…”

“ओके देन, सी-यु अॅट १०?”

“१० इज फ़ाईन..”

“बाय..”

“बाय..”

फोन ठेवल्यावर कबीरला काय करु आणि काय नको असं झालं होतं. अख्खे दोन दिवस त्याला राधाची सोबत मिळणार होती. त्याने पट्कन लॅपटॉप बंद केला, रोहनला दोन दिवसाचा प्लॅन सांगीतला आणि बॅग भरायला तो घरी पळाला..

साधारणपणे १०.२०ला राधाचा कबीरला फोन आला की ती खाली गाडीमध्ये त्याची वाट बघतेय.

कबीरने त्याची हॅन्डबॅग उचलली आणि तो खाली उतरला. दारासमोरच एक काळया रंगाची ‘सी-क्लास मर्सिडीज’ उभी होती. काचा काळया रंगाच्या फिल्मने झाकलेल्या असल्याने आतमधले काही दिसत नव्हते. कबीरने मागची डिक्की उघडली, आपली बॅग आतमध्ये टाकली आणि मागचे दार उघडून तो आतमध्ये शिरला.

मागच्या सिटवर राधा बसली होती. काळया रंगाचा सॅटिनचा लो-नेक शर्ट, काळया रंगाची फॉर्मल पॅन्ट, वर क्रिम-कलरचा ओव्हरकोट, हाय-हिल शुज, डोळयावर मोठ्या काचांचा गॉगल आणि शेजारी लेपर्ड-स्किनची महागडी पर्स. तिच्या प्रत्येक गोष्टींतून श्रीमंती ओसंडून वाहात होती.

कबीर तिच्या शेजारी बसताच एक मंद पर्फ्युमचा सुगंध त्याच्या नाकात शिरला.

“तू पोलिस-स्टेशनला चालली आहेस का सेलेब-पार्टीला?”, कबीरने न राहवून विचारले

“ऑफकोर्स पोलिस-स्टेशनला.. पण तेथे इंप्रेशन नको का पडायला? दे शुड नो हु आय एम! मी कोणी चिप रस्त्यावरची स्लट नाहीए हे कळालं पाहीजे त्यांना. ही राधा आणि ती राधा वेगळी आहे…”

“ओके ओके.. पण निदान तो गॉगल तरी काढ.. मला फार ऑकवर्ड होतेय…”

हसत राधाने गॉगल काढुन ठेवला..

“आय मीन.. अजून तरी मी अनुरागचीच बायको आहे ना बाहेरच्यांसाठी…”,

ड्रायव्हरला ऐकू जाणार नाही अश्या हळु आवाजात ती म्हणाली..

“राधा.. आपण माझ्या गाडीतून जाऊयात का? मला चालवायला काही प्रॉब्लेम नाही.. फोर्ड-इको-स्पोर्ट आहे माझी..”, कबीर

“का? काय झालं? मर्सिडीज आवडत नाही का?”

“नाही, तसं नाही.. पण आपल्याला असं सारखंच हळु आवाजात बोलावं लागणार असेल तर अवघड आहे..” हळु आवाजात ड्रायव्हरकडे बोट दाखवत कबीर म्हणाला…

“हम्म खरं आहे.. पण मग तू मर्सच चालव ना, येईल नं चालवता.. फोर्डमध्ये माझे हे कपडे जरा….”

“ठिके ठिके.. लै कौतुक तुझ.. चालवीन मी मर्सिडीज...”

ड्रायव्हरला तसंही राधाबरोबर येण्यात काहीच उत्साह नव्हताच. पडत्या फळाची आज्ञा मानुन तो लगेच गाडीची किल्ली तिच्या हाती सोपवून निघून गेला.

राधा आणि कबीर पुढच्या सिटवर येऊन बसले.

“शुड वुई?”, कबीरने गाडी सुरु करत विचारलं.

“येस प्लिज...”, राधाने ए/सी चालु केला आणि सिट मागे सरकवून रिलॅक्स होत म्हणाली..

कबीरने गाडीचा एस्कीलेटर दोन-तिनदा दाबुन फायरिंगचा आनंद घेतला आणि मग गाडी गेअरमध्ये टाकून गोकर्णकडे प्रस्थान केले...

शहर मागे टाकून गाडी एक्स्प्रेस-वे वरून वाऱ्याच्या वेगाने पळत होती. १००-१२०-१४०-१६०

“सुप्पर ए यार, म्हणजे आधी बसलो होतो मर्सीडीजमध्ये पण चालवण्याचा अनुभव काही वेगळाच.. १६० आणि कसली स्टेबल आहे अजूनही...”

“क्रुज-कंट्रोल चालु कर, सगळे कंट्रोल ऑटो सेट होतात..”, डॅशबोर्डवरच्या एका बटनाकडे बोट दाखवत राधा म्हणाली... “.. पैसा सर्वकाही नसतो मान्य.. पण काही गोष्टींचा आनंद पैसा असल्याशिवाय घेता येत नाही हे ही खरं.. नाही का?”

“अगदी.. थॅंक्यु अनुराग फॉर धिस...” हाताची दोन बोट आधी ओठांना आणि मग आकाशाकडे बोट दाखवत कबीर म्हणाला.

“ए .. त्या दिवशी काय झालं मग? तू भेटलास मोनिकाला?”, अचानक काहीतरी आठवल्यावर राधा म्हणाली

“नाही..”

“का??? मी सांगीतलं होतं ना तुला?”, डोळे मोठ्ठे करत राधा कबीरवर ओरडली

“आणि मी पण तुला सांगीतलं.. आमच्यात काही नाहीए..”

“पण मग डेट कश्याला कबुल केलीस तिच्याशी.. हाऊ मीन ऑफ़ यु कबीर…”, राधा अजूनही चिडली होती.

तिच्या त्या रागाच कबीरला खुप कौतुक वाटत होतं. राधा त्याची असती तर तिला जवळ, मिठीत घेऊन तिला मनवायचा त्याने प्रयत्न केला असता पण…पण राधा त्याची नव्हती.. निदान सध्या तरी..

“ती ऐकतच नव्हती.. मी दहा वेळा नाही म्हणालो तिला..”

“मग अकराव्यांदा पण म्हणायचंस..”

“जाऊ देत ना सोड.. जे झालं ते बरंच झालं…”

“गोव्यात, तू बोलला नाहीस मला तुला गर्लफ्रेंड आहे ते..”

“कधी बोलणार? आपण दोन दिवसांतच गायब झालात.. आणि तेंव्हा ती माझी गर्लफ्रेंड नव्हती.. आमचा ब्रेक-अप आधीच झाला होता..”

“ओके ओके.. टॉन्टींग ची एक संधी सोडू नकोस.. बर सांग ना.. कधीपासून एकत्र होतात तुम्ही? का ब्रेक-अप झालं? तुच काही तरी केलं असशील…..”

पुढचा अर्धा-पाऊण तास कबीर तिला मोनिका आणि त्यांच्याबद्दल सांगत होता.

“आमच्या रिलेशनशीपमध्ये सुरुवातीचा काही काळ सोडला तर ती आणि मी नव्हतोच.. फक्त मी आणि मीच होतो..”

“तू असे साधे कपडे का घालतोस?”

“पार्टीमध्ये कुणाशी जास्त मिक्स का नाही होत?”

“माझ्या सगळया फ्रेंड्सना तू बोअरींग वाटतोस.. तू असा कुल आणि ट्रेंडी का नाही राहात?”

“मी कित्तीदा तिला सांगून बघीतलं. अनेकदा तिला माझ्या फॅन-मेल्स दाखवल्या. जितक्या तुझ्या मैत्रीणी नसतील त्याच्या दहापट अधीक मुलींनी मला ई-मेल / फोन करून मी त्यांना आवडतो, माझं लिखाण त्यांना आवडतो सांगीतलं होतं हे दाखवून दिलं..”

“मग?”

“मग काय? तिला तात्पुर्त पटायचं.. परत ये रे माझ्या मागल्या. तिला मी तिला आवडण्यापेक्षा इतरांना आवडणं जास्त महत्वाच वाटायचं..”

“जस्ट द सेम विथ मी.. अनुरागही काही वेगळा नव्हता…”

“तू बदललंस का स्वतःला अनुरागसाठी? मी तरी थोडाफार प्रयत्न केला…”

“अरे, पण ते एकच कारण नव्हतं अनुरागबद्दल.. मला हवं असलेलं स्वातंत्र्य तो मला कधीच देऊ शकला नसता. तू जे काही सांगीतलंस मला, निदान त्यावरून मोनिका, ती एक गोष्ट सोडली तर.. सिम्स टु बी नाईस गर्ल… दिसायला पण चिकनी आहे रे…”

“ह्म्म.. मोना तशी आहे चांगली. आमच्या ब्रेक-अप नंतर मी खरंच डिप्रेस होतो.. त्यातच मला ते लव्ह-स्टोरी लिहायची ऑफर आली. मी तयारच नव्हतो, पण एक तर माझं

तिसरं पुस्तक इतक हिट नाही झालं.. वुई अँज अ युनिट आम्हाला सक्सेसची गरज होती, रोहनने खुपच पर्स्यु केलं आणि मी गोव्याला पोहोचलो…"

"उउउउह्ह्ह.. 'मोनिका'वरून एकदम 'मोना'… समवन सिम्स टु बी स्टिल इन लव्ह…"

"प्लिज……", काहीसा लाजत कबीर म्हणाला..

"लेट मी सी.. लेट मी सी.. आर यु ब्लशींग?", कबीरच्या दंडाला धरून त्याला मागे सरकवत राधा म्हणाली…

"धिस कॉल्स फॉर अ चिअर्स..", असं म्हणून तिने थंड ग्लोव्ह-कंपार्टमेंटमधून बडवायजर बिअरचे दोन कॅन काढले आणि एक कबीरला दिला..

"नो थॅंक्स.. आय़ डोंन्ट ड्रिंक व्हाईल ड्राईव्ह…"

"ए काय नाटकं रे तुझी? बिअर काय ड्रिंक आहे का? स्पार्कल्ड वॉटर आहे ते…"

"थॅंक्स पण नको…"

"थांब..मोनालाच फोन करते.. सांगते कसा बोअरींग आहेस तु…", कबीरच्या खिश्यातून मोबाईल ओढुन घेत राधा म्हणाली…

"ओके.. ओके… दे इकडे", असं म्हणून राधाने फोडलेला बिअरचा कॅन घेउन कबीरने तो तोंडाला लावला…

"तू तिला लव्ह-लेटर्स वगैरे सॉल्लीड लिहीली असशील ना? लेखकच तु.. हो ना?"

"हो म्हणजे.. लिहीली होती थोडीफार…."

"वॉव्व.. ए.. सांग ना.. काय काय लिहीलं होतंस…"

“प्लिज…”

“प्लिज काय.. सांग.. जे आठवतेय ते सांग.. म्हणजे असं कविता वगैरे करायचास का?” “मला नाही आठवत ए.. सोड ना राधा.. मोनिका तुझ्यासाठी विनोदाचा विषय असेल.. माझ्यासाठी नाही..”, गंभीर होत कबीर म्हणाला..

“ओके.. सॉरी.. हर्ट केलं असेल मी तर.. रिअली सॉरी…”

गाडी मुंबई-गोवा हायवेला लागली. राधा आणि कबीर गप्पांमध्ये बुडून गेले होते जणु एकमेकांना गेली कित्येक वर्षांपासून ओळखतात. गप्पांचा विषय अक्षरशः काहीही असत. एखाद्या गाण्यावरून.. एखाद्या सिनेमावरून सुरु झालेली चर्चा अगदी जागतिक राजकीय विषयांपर्यंत पोहोचायची.

“तुला गुलजारची शायरी आवडते?”, राधा
“म्हणजे काय?”

“थांब, पेन-ड्राईव्ह मध्ये आहे एक फोल्डर…”, राधाने एंटरटेंमेंट-सिस्टीममधील गाण्याचा फोल्डर बदलला..

गुलजारच्या धिर-गंभीर आवाजातली शायरी सुरु झाली..

*बेबस निगाहों में है तबाही का मंज़र,*

*और टपकते अश्क की हर बूंद*

*वफ़ा का इज़हार करती है……..*

*डूबा है दिल में बेवफाई का खंजर,*

*लम्हा-ए-बेकसी में तसावुर की दुनिया*

*मौत का दीदार करती है..........*

*ऐ हवा उनको कर दे खबर मेरी मौत की... और कहेना,*

*के कफ़न की ख्वाहिश में मेरी लाश*

*उनके आँचल का इंतज़ार करती है..........*

दोघांनीही ती शायरी एकत्रच म्हणली.. जणु वर्षांनुवर्ष ऐकत आले होते..

"उफ़्फ़.. काय आवाज आहे यार.. यु नो व्हॉट.. माझा टर्न-ऑन पॉईंट काय आहे?", राधाने विचारलं

"काय?"

"आवाज.. समोरच्या व्यक्तीचा आवाज चांगला असेल ना.. बस्स.. मला पटवण्याची आधी लढाई तो उसने तभी जित ली.."

"सो यु टर्न ऑन बाय गुलजार?", हसत कबीरने विचारलं

"व्हाय नॉट? गुलजार.. जगजीत सिंग.. अमीताभ बच्चन.. इव्हन नसरुद्दीन शहा.. एज हार्डली मॅटर्स..."

"हम्म ट्रु.."

"व्हॉट अबाऊट यु.. मुलींमध्ये तुला काय आवडतं सर्वात? आय मीन.. 'बट-ऑब्व्हीयस' गोष्टी सोडून सांग..", डोळे मिचकावत राधा म्हणाली

"डोळे.. डोळे जर चांगले असतील ना..", कबीर राधाच्या डोळयात बघत म्हणाला आणि पुढचं वाक्य अर्धवटच राहीलं..

कबीरच पुढंच वाक्य अर्धवट का राहीलं हे लक्षात येताच.. “उप्प्स.. सॉरी..” असं म्हणून राधाने डोळ्यावर तो मोठ्ठा गॉगल चढवला आणि खिडकीकडे तोंड करून येणारं हासु दाबण्याचा प्रयत्न करु लागली...

“हम्म.. दॅट्स बेटर..”, असं म्हणून कबीरने गाडीचा वेग वाढवला...

जेवणासाठीचा अर्धा-पाऊण तासाचा छोटासा ब्रेक घेऊन ते लगेच पुढे निघाले...

“तू सोफी ऑन्टींना फोन करून सांगीतलंस आपण येतोय ते?”

“हम्म.. कालच रात्री केला होता फोन.. खुप खुश झाल्या..”

गोकर्ण ४० कि.मी. वर आलं तसं राधा थोडी टेन्स असल्याचं कबीरला जाणवलं.

“राधा.. डोन्ट वरी.. सगळं ठिक होईल..”

“हम्म.. होप सो.. मागच्या वेळी मी तेथे होते.. दॅट वॉज टेरीबल.. आय जस्ट होप.. की ही फक्त फॉर्मॅलीटीच असेल आणि तासाभरात आपण बाहेर पडु..”

“नक्कीच.. मी आहे तुझ्याबरोबर.. रिलॅक्स...”, कबीरने राधाला धीर देण्याचा प्रयत्न केला

गाडी पोलिस-स्टेशनच्या आवारात आली तसं राधाने एकदा आरश्यात बघून चेहरा ठिक केला आणि कपडे निट करून ती पोलिस-स्टेशनमध्ये शिरली. कबीरही गाडी लॉक करून तिच्या मागोमाग शिरला.

चिफ़-इन्स्पेक्टरच्या जागेवर दुसराच कोण तरी थोडासा वयस्कर पोलिस इन्स्पेक्टर बसला होता.

राधाला पहाताच तो उठून उभा राहीला.

“अं.. मी राधा.. ते इन्स्पेक्टर...”

“ते आता नाहित इथे.. त्यांची ट्रांन्स्फर झालीय.. त्यांच्या जागी आता मी आहे.. तुमची केस माझ्याकडेच आहे...” तो वयस्कर इन्स्पेक्टर म्हणाला..

“ओह..”

“त्यांचा शहाणपणा नडला त्यांना.. तुमची फ.आय.आर नाही, चार्जशीट नाही, कसली फारशी चौकशी नाही आणि त्यांनी सरळ बातमी मिडीयाला लिक केली.. वरच्यांना ते आवडलं नाही... त्यात तुमचे मिस्टर...”

“एनिवेज.. मी थोडी गडबडीत आहे.. आपण फॉर्मैलीटी उरकुयात का?”, राधाने विषय मध्येच तोडत विचारलं.

चेहऱ्यावरून ती बराच कठोरपणाचा आव आणत होती.. पण मनातून प्रचंड घाबरली होती..

“हो हो नक्कीच.. आणा रे त्यांना..”, असं म्हणून इन्स्पेक्टरने एका हवालदाराला आत पिटाळलं..

राधा खुर्चीत सरळ होऊन बसली. तिच्या मानेच्या नसा ताणल्या गेल्या होत्या. हाताच्या मुठी घट्ट आवळून ती वाट बघत बसली.

थोड्याच वेळात चार्ली, रॉकी आणि इतर गुन्ह्यांत पकडलेले ४-५ कैदी तिच्यासमोर येऊन ठाकले.

चार्ली आणि रॉकी मान खाली घालून उभे होते. राधाला वाटले होते, दोघं जण प्रचंड चिडलेले असतील, तिला बघताच तिच्या अंगावर धावून येतील वगैरे. पण तसं काहीच नव्हतं हे पाहून राधाच्या जिवात जीव आला.

“ह्यांच्यापैकी कोण होते?”, तो वयस्कर इन्स्पेक्टर म्हणाला

राधा काही बोलणार एव्हढ्यात कबीरने तिला थांबवले आणि तो त्या इन्स्पेक्टरला म्हणाला, “इन्स्पेक्टर साहेब, ह्या केसमधून बाहेर पडण्याचा काही मार्ग..”

कबीरचे बोलणे ऐकून सगळयांनी वळून त्याच्याकडे बघीतले.. जणु काही सगळयांना तेच हवे होते.

“म्हणजे??”, इन्स्पेक्टर म्हणाला

“म्हणजे… त्या दिवशी जे काही झाले.. अर्थात दुर्दैवीच होते.. पण ती एक घडलेली चुक होती. कुणाकडूनच जाणून-बुजून घडलेला गंभीर गुन्हा नव्हता…”, कबीर म्हणाला

“असं कसं.. दोघांनीही एकमेकांविरुध्द गंभीर गुन्हे दाखल केले आहेत.. नाही कसं म्हणता..”

“हो.. मान्य आहे.. पण कदाचित त्यावेळेस तेथे पोलिस पोहोचले आणि…”

“मग तेच तर.. त्यावेळेस तेथे पोलिस पोहोचले नसते, तर अ‍ॅटेंप्टेड मर्डर किंवा रेप पैकी एक काहीतरी नक्कीच झाले असते.. नाही का..”

“अगदी खरं आहे.. पण समजा.. समजा आज ह्या ओळख परेड मध्ये राधा-मॅडमनी दोघांनाही ओळखलेच नाही तर???”

“कबीर अरे पण त्या दिवशी तेथे पोलिस नसते आले तर खरंच…”, राधा खुर्चीतून उठत म्हणाली..

“एक मिनीट राधा.. हे बघ त्या दिवशी जे काय झालं ते झालं.. पण त्याच्यामुळे पुढे अनेक महीने.. किंवा वर्ष तुम्हाला कोर्टाच्या.. पोलिस-स्टेशनच्या फेऱ्या माराव्या लागणार आहेत.. मान्य आहे का तुला??”

राधा काहीच बोलली नाही..

“जर राधा मॅडमने ओळखलेच नाही.. किंवा हे ते दोघं नव्हेतच असं स्टेटमेंट दिलं तर मग प्रश्नच मिटला.. पण त्यांच्या केसच काय.. जी राधावर त्यांनी फाईल केली आहे.. त्यांच्या केसनुसार तर राधा तेथेच होती ना!. कॉन्ट्रडीक्ट होतात स्टेटमेंट. राधा म्हणते, हे दोघं ते नव्हेत.. ते म्हणतात राधाच होती ती.. शिवाय आमच्या पोलिसांनी दोन्ही पार्टीजना एकत्र पकडलं आहे.. त्याचं काय? तिघांच्याही ब्लड-सॅंपलमध्ये ड्रग्ज सापडले.. त्याचं काय?”

“मला बोलु तर द्या.. सांगतो.. कदाचित त्या दिवशी असं झालेलं असु शकतं. राधा तिकडे फिरायला गेली होती.. एकटीच.. हे लोकं तिकडेच होते.. ड्रग्जच्या नशेत.. त्यांनी राधाला बघीतलं.. तिला जबरदस्ती ड्रग्जचं इंजेक्शन दिलं.. पण राधा तेथून निसटली.. ह्यांनी तिचा पाठलाग केला.. पुढे पोलिसांनी त्यांना पकडलं…”

“म्हणजे सगळी चुक आम्ही कबुल करायची आणि ही फुकटची सुटणार.. ते शक्य नाही.. आम्ही अडकलो तर ही पण अडकणार..”, रॉकी चवताळून म्हणाला..

“अरे राजा.. जरा बोलु देशील मला?”, कबीर त्याला थांबवत म्हणाला…

“तू काही बोल.. आम्ही अडकलो तर ही पण अडकणार हे नक्की..”, रॉकी..

“हं.. तर त्यावेळेला राधाला जे ‘जबरदस्तीने’ ड्रग्ज दिले होते.. त्यावेळी ती नशेतच होती.. त्यामुळे आता तिला काही केल्या आठवतच नाहीये तेंव्हा नक्की काय घडलं, कुणी केलं वगैरे.. सो.. ती ओळखु शकत नाहीये ह्यापैकी कोणी होतं किंवा नव्हतं. आणि ह्या दोघांच म्हणाल.. तर त्यांची चुक ते मान्य करतील.. त्यांचा गुन्हा इतकाच ठरतो की त्यांनी ड्रग्जचं सेवन केल, राधाला दिलं आणि काही कारणामुळे ते तिला पकडायला धावले. अर्थात कुठल्या कारणामुळे ते त्यांनाही आठवत नाहीए आता. पळता पळता हा.. रॉकी.. पडला.. दगडावर तोंड आपटलं.. त्याला लागलं..” जसं काही अगदी साधंच काहीतरी घडलं असावं अश्या आवेशात कबीर डोळे बारीक करून हातवारे करत बोलत होता..

“पोलिसांना बघीतल्यावर दोघं जण घाबरले.. आणि आपली चुक त्यांनी राधावर ढकलायचा प्रयत्न म्हणून तिच्यावर काहीतरी केस फाईल केली..”

“अरे पण….”, रॉकी पुढे काही बोलणार एव्हढ्यात चार्लीने त्याला थांबवले आणि तो म्हणाला.. “ह्याबदल्यात आम्हाला काय मिळणार?”

“आत्ता कसं.. मुद्याचं बोललास…” हळुवार, एखाद्या वकिलाप्रमाणे टाळया वाजवत कबीर म्हणाला… “आता ड्रग्ज तर रक्तात सापडले तुमच्या.. सो तोच एक गुन्हा नक्की आहे.. त्याबदल्यात तुम्हाला तुरुंगात तर जावं लागेलच.. पण ह्याबाजुला हिप्पी लोकं आणि ड्रग्ज काही नविन नाही.. कित्ती तरी लोकं अशी येतात आणि जातात.. तुम्ही राधावरची केस मागे घ्या आणि किती पैसे घेणार ते बोला…”

चार्ली, रॉकी… इन्स्पेक्टर कबीर.. कबीर राधा.. सगळे एकमेकांकडे आळीपाळीने बघत होते.

कबीरने सांगीतलेला प्लॅन तसा बरा होता..

“पण मिडीया? त्यांना काय सांगायचं?”, इन्स्पेक्टर ने विचारलं..

“हेच.. जे आपण आत्ता बोललो ते…”, कबीर

“पण त्यांना ते पटायचं का? उगाच गोंधळ व्हायचा…”

“अहो आहे कुणाला वेळ ह्या केसकडे बघायला. तेथे दिल्ली युनिव्हर्सीटीत गोंधल चालु आहे..त्यात बजेट.. मग क्रिकेटसच्या टुर्नामेंट्स.. आय.पी.एल.. मिडीआ फुल्ल बिझी आहे सगळयात.. असे कित्येक मोठ्ठाले घोटाळे आले आणि गेले.. हे तर किरकोळ आहे.. आणि समजा कुणी विचारलंच तर आपण जे बोललो तेच सत्य आहे.. आणि पटण्यासारखे नसले तरी.. कुणाकडे काही पुरावासुध्दा नाहीए…”

“दहा लाख..”, बराच विचार करून चार्ली म्हणाला..

"ए.. चड्डीत राहून बोल..", कबीर म्हणाला... "एक विसरु नको.. आत्ता राधा बाहेर आहे आणि तू अजूनही तुरुंगात.. असा तुरुंगात खितपत पडून रहायला हिप्पी झालायेस का? जा ना बाहेर.. खा.. पि.. गाणी म्हण.. पोरी फिरव.. ऐश कर.."

चार्ली आणि रॉकीने एकमेकांकडे पाहीले

"पाच लाख..."

"एनिवेज इन्स्पेक्टर, आपण ओळख परेड चालु करुयात.. जर राधाने दोघांना ओळखलं तर मग मात्र तुम्हाला काही करता येणार नाही.. नाही का?"

इन्स्पेक्टर इन्स्पेक्टर ने खिश्यातून रुमाल काढुन आपल्या कपाळावरचा घाम टिपला. त्याला आपली जवळ येत चाललेली निवृत्तीची तारीख दिसत होती. कसंही करून त्याला ह्या केसमधून बाहेर पडायचं होतं.

"हो अगदी बरोबर.. मग मात्र मी काहीच करु शकणार नाही...", चेहरा गंभीर करून इन्स्पेक्टर म्हणाला..

"दोन लाख.. फायनल..", चार्ली म्हणाला..

"एक लाख.. फायनल.. टेक इट ऑर लिव्ह इट...", कबीर निग्रहाने म्हणाला

रॉकी आणि चार्लीने एकमेकांत बरीच कुजबुज केली. एक लाख सुध्दा त्यांना काही कमी नव्हते. शंभर रुपयांसाठी सुध्दा तरसणारे ते.. लाख-रुपये खुप जास्ती होते..

"ड्न..", दोघंही एकदम म्हणाले..

"इन्स्पेक्टर साहेब.. तुमंच काही??", कबीर

"छे छे.. मला त्यातला एक रुपायाही नको.. दोन महीन्यांत मी रिटायर होतोय.. उगाच मी पैसे घेऊन हे केलं कुठं निघालं तर..."

“ओके ओके..” कबीर हसत म्हणाला..

पण मला माझ्या सिनीयर्सशी आधी बोलायला हवं.. त्यांना योग्य वाटलं तर…

“शुअर…”, कबीर म्हणाला

इन्स्पेक्टर दार उघडून आपल्या केबिनमध्ये फोन करायला निघून गेले..

राधा दोन्ही हातांची बोट क्रॉस करून मनातल्या मनात प्रार्थना करत होती. अगदी अनपेक्षीतपणे कबीरने तिचं आयुष्य वेगळयाच वळणावर येऊन थांबवले होते. ती जरका ह्या केसमधून बाहेर पडु शकली असती तर.. एक नविन.. स्वच्छंद आयुष्य तिची वाट पहाणार होते.

ती खुर्चीतून उठून चार्लीपाशी गेली.

“शिना कशी आहे? इथेच आहे अजून”, राधाने विचारले.

“नाही.. इथे नाहीएत.. पोलिसांनी सगळयांना पळवून लावले. कोस्टल-कर्नाटका साईडला गेलेत सगळे..”, चार्ली म्हणाला..

“हम्म.. इथून सुटलात तर तुम्ही तिकडेच जाणार?”

“हम्म..”, चार्ली म्हणाला.

राधाने रॉकीकडे पाहीलं, पण तो चेहरा दुसरीकडे करून उभा होता.

जवळ जवळ १५-२० मिनीटांनंतर इन्स्पेक्टर बाहेर आले.

“कमीशनर साहेब तयार आहेत.. पण तुम्हाला दोघांनाही स्टेटमेंट्स लिहून द्यावी लागतील. राधा मॅडम.. इथून बाहेर पडल्यावर प्लिज बाहेर कुठे ह्याची वाच्यता करु नका.. विशेषतः मिडीयाशी काही कम्युनिकेशन नकोय याबद्दल.. ओके?”

राधाने बोटांची चिमटी करून ओठांवरून फिरवत तोंडाला कुलुप लावल्याची खुण केली.

“चार्ली-रॉकी… एक महीना.. इथे तुरुंगात रहावं लागेल.. हवालदार घेऊन जा ह्यांना…”, इन्स्पेक्टर

“तुमचे पैसे.. कुठे पाठवायचे?”, कबीर

“इथेच.. हातात पैसे पडल्याशिवाय कुठल्याही स्टेटमेंटवर आम्ही सह्या करणार नाही”, रॉकी म्हणाला..

“अरे.. आम्ही काही लाखरुपये बरोबर घेउन फिरतो का?”, कबीर वैतागून म्हणाला..
“कबीर.. आय गॉट धिस.. आहेत माझ्याकडे..”, असं म्हणून राधा कारमधून तिची पर्स घेऊन आली.

कबीर तिचे पैसे देऊन होईपर्यंत डोळे फाडून तिच्याकडे बघत होता.

इन्स्पेक्टरने दोन चार फॉर्म्स त्यांच्याकडून भरून घेतले.. हवालदारने दोघांचे स्टेटमेंट्स लिहून घेतले. आणि मग जशी कबीरने सांगीतली तशी ‘क्लिन-चीट’ सही शिक्यासहीत इन्स्पेक्टरने राधाच्या हातात ठेवली.

“सो.. ऑल डन?”, हातातल्या कागदाकडे बघत राधा म्हणाली…

“ऑल डन.., आपण सगळेच सुटलो नाही का?”, कसनुस हसत इन्स्पेक्टर म्हणाला.

कबीर आणि राधा बाहेर निघाले तसं राधा म्हणाली, “कबीर, दोन मिनीटं थांबतोस.. मी पट्कन गाडीत चेंज करते.. खुप हेवी झालंय हे.. आणि गरम पण खुप होतंय..”

“शुअर..” कबीर म्हणाला..

राधा गाडीच्या मागचं दार उघडून आत गेली आणि दहा मिनीटांनी कपडे बदलून बाहेर आली..

“लेट्स गो..कबीर…”,असं म्हणून ती पुढच्या सिटवर जाउन बसली..

कबीरही ड्रायव्हिंगसीटवर बसला आणि गाडी सुरु करून ते पोलिस-स्टेशनच्या बाहेर पडले.

पुढची दहा मिनीटं कुणीच कुणाशी बोलत नव्हते.

“राधा? इतकी छान गोष्ट घडली.. काहीच बोलत नाहीएस…”, कबीर शेवटी न रहावून म्हणाला..

“बोलते.. पण त्याआधी.. इथून पुढे कुठेतरी बीच-साठी एक्झीट आहे का बघ.. मला समुद्र किनाऱ्यावर जायचं आहे..”, राधा म्हणाली..

“ओके..”, असं म्हणून रस्त्यावरचे बोर्ड बघत कबीरने गाडी वळवली.

दहा-पंधरा मिनीटांनंतर एक छोट्याश्या वाटेवर त्याने गाडी वळवली आणि ते समुद्रकिनारी येऊन पोहोचले.

गाडी थांबताच राधाने दार उघडले आणि कबीरची वाट न बघता ती धावत धावत समुद्रापाशी गेली. कबीरही तिच्या मागोमाग गेला.

राधा समुद्राच्या लाटांपाशी पोहोचली. लाटांचा घनगंभीर आवाज आसमंतात भरून राहीला होता. राधाने डोळे बंद केले.. दोन्ही हात आडवे पसरले आणि अनपेक्षीतपणे ती टाहो फोडून जोरात किंकाळी मारली.. आणि परत एक.. परत एक.. आणि परत एक.. इतके दिवस मनात साठून राहीलेला राग, चिंता, दुःख, भिती तिच्या ओरडण्यातून बाहेर पडत होतं.

समुद्राच्या लाटांच्या आवाजात तिचा आवाज लगेचच विरून जात होता.

राधाच्या डोळयांतून अश्रु वाहात होते, पण ती अजूनही जोरजोरात ओरडत होती.

घसा सोलवटून निघाला तसं ती थांबली. कबीर तिच्या शेजारीच उभा होता. तिने कबीरकडे बघीतलं आणि म्हणाली.. “थॅंक्स म्हणायला हवंय.. खरं तर मला नाही म्हणायचंय.. आय ऑलवेज वॉन्ट टु बी इन डेब्ट ऑफ़ धिस…”

कबीर हसला आणि मानेनेच त्याने नाही म्हणलं..

“बट नो.. आय हॅव टु गिव्ह समथींग बॅक…सो रेडी?”

“ओके..”

“मागे आकाशात बघ कबीर.. आत्ता कसली वेळ आहे?”,

“अं.. सुर्यास्त..” मावळतीकडे झुकलेल्या सुर्याकडे बघत कबीर म्हणाला..

“ओके.. गुड..”, राधाच्या चेहऱ्यावर एक मिस्टीरियस हास्य होते… “नाऊ लुक ॲट मी…. लुक ॲट माय ड्रेस…”

कबीरने राधाकडे बघीतले.. तिने गुलाबी रंगाच्या टी-शर्टवर पांढऱ्या रंगाचा सी-थ्रु शर्ट आणि खाली आकाशी रंगाची स्लॅक्स घातली होती.

“हम्म मग?”

“उफ़्फ़.. काय तु…”, गाल फुगवून राधा म्हणाली..

“हे कसलं गिफ़्ट..”, कबीर न कळून म्हणाला…

“अं.. बरं हे बघ..”, दुसरं काहीतरी आठवल्यावर तिने वाळुमध्ये शोधून एक दगड उचलला आणि समुद्रात भिरकावला…..आणि म्हणाली “ते बघं.. ते काय होतं..?”

“भाकऱ्या…”, कबीर म्हणाला…

“एक्झॅक्टली.. भाकऱ्या.. भा.क.ऱ्या...” असं म्हणून राधा खळखळून हासु लागली..

आणि अचानक कबीरला साक्षात्कार झाला.. हे सर्व त्याने कुठे तरी पाहीलं होतं.. राधाचा तो ड्रेस.. सुर्यास्त.. पाण्यावर टप्पे पडत जाणारा दगड.. त्याच्या पडणाऱ्या भाकऱ्या, राधाचं निरागस हास्य आणि...आणि राधाचा आणि कबीरचा इमॅजनेटीव्ह किस...

येस्स.. त्याच्याच पुस्तकातला तो एक प्रसंग होता.. जो आज राधाने प्रत्यक्षात आणला होता...

स्तंभीत झाल्यासारखा तो राधाकडे बघत होता... “इज धीस फॉर रिअल?”, कबीर म्हणाला..

“क्लोज युअर आईज मिस्टर...”, कबीरच्या अगदी जवळ जात राधा म्हणाली

“आर यु गोईंग टु..”,कबीर

“आय सेड.. क्लोज युअर आईज कबीर..”

कबीरने डोळे बंद केले...

अतिव-सुखाच्या कोमात जाण्यापुर्वी कबीरला एकच गोष्ट जाणवली.. जास्मीनचा जवळ जवळ.. अगदी जवळ येत जाणारा.. बेधूंद करणारा सुगंध आणि राधाचे त्याच्या ओठांवर टेकलेले ओठ...............

ईटरनीटी…

ए प्युअर ब्लिस्स…

तो क्षण किती वेळाचा होता दोघांनाही ठाऊक नाही. कदाचित काही सेकंद..

कदाचित एखादा मिनिटं..

कदाचित कित्येक मिनिटंही…

जणू सर्व काळ त्या क्षणापुरता थांबुन गेला होता. समुद्राच्या लाटा, वाऱ्याच्या झुळुकीने हलणाऱ्या नाराळाच्या झाड्यांच्या झावळया, एकसंध आकारात उडणारे पक्षांचे थवे.. सर्व काही..

राधा आणि कबीर भानावर आल्यावर एकमेकांपासून दूर झाले.

“वॉव्व.. आय… आय नीड अ बिअर…”, खाली मान घालून कपाळ चोळत कबीर म्हणाला..

“का रे? टेस्ट आवडली नाही का?”, पहील्यासारखेच खळखळून हसत राधा म्हणाली..

“तू ना.. खरंच.. अशक्य आहेस…” कबीर..

“तू मला ओळखलं कुठे आहेस अजून? चल जाऊ या? उशीर होतोय.. अजून ६ तासाचा ड्राईव्ह आहे…”, असं म्हणून राधा कारकडे जाऊ लागली.

कबीर अजूनही तिच्या पाठमोऱ्या आकृतीकडे बघत होता. राधा अगदी तश्शीच दिसत होती जशी त्याने त्याच्या पुस्तकात ‘मीरा’ रंगवली होती.

अचानक त्याच्या डोक्यात प्रकाश पडला..

“राधाssss..”, त्याने जोरात हाक मारून राधाला थांबवलं आणि तो धावत धावत तिच्या जवळ गेला.

“काय झालं?”, राधा वाळूमध्ये बसून त्यातले शंख शिंपले गोळा करत होती..

“हे.. हे तू सर्व आधीच प्लॅन केलं होतंस ना?”

’हे म्हणजे? शंख-शिंपले? त्यात काय प्लॅन करायचंय, दिसले म्हणून घेतेय.. तुला नाही आवडंत?”

“शंख-शिंपले नाहीत स्च्युपीड… किस्स.. तू आधीच प्लॅन केला होतास ना?”, कबीर वैतागून म्हणाला

“ऑफ़कोर्स नॉट.. इट वॉज स्पॉन्टॅनिअस…”

“ओह नो.. इट वॉज प्लॅन्ड.. तू हे नक्कीच आधीच ठरवलं होतंस राधा..”, कबीर खात्रीने म्हणाला..

“नाही कबीर.. हे असं कुणी आधीच ठरवून करतं का?”
“हो.. तू केलं आहेस.. नाही तर तुझे कपडे.. तुझी हेअर-स्टाईल.. तुझे डायलॉग्ज.. सगळंच कसं त्या कथेनुरुप होतं..”

“ओह.. ओह खरंच की कबीर.. योगायोग अजून काय..”, अडखळत राधा म्हणाली

“यु वेअर रॉंग राधा.. मी तुला चांगला ओळखतो…

“नो कबीर.. बट एनिवेज.. तुला तसं वाटतं तर तसं..सो व्हॉट…?”

“देन इट वॉज नॉट ए किस्स टु से थॅंक्यु…”

“अज्जीब्बात नाही.. आणि भारतात, अजून तरी थॅंक्सचा किस्स गालावर देतात.. ओठांवर नाही..”

“तेच मला म्हणायचंय.. मग तू मला किस का केलंस?”, आपला पॉईंट प्रुव्ह झाल्यासारखा कबीर म्हणाला..

राधा आपले कपडे झटकत उठून उभी राहीली… “आपण हे गाडीत बोलुयात का? सुर्य ऑलमोस्ट बुडालाय समुद्रात…”

“नाही.. मला आत्ता.. इथे.. ह्या क्षणालाच उत्तर पाहीजे.. आजचा दिवस खुप मस्त गेला राधा.. आपल्या दोघांसाठी.. लेट्स पुट अ क्रिम ऑन इट.. पट्कन सांग सुर्य पुर्ण अस्ताला जाण्याआधी..”, कबीर

“तू काय वकीलीचं ट्रेनिंग घेऊन आला आहेस का आज? आधी तिकडे पोलिस-स्टेशनमध्ये कसले एकावर एक फंडे मारत होतास.. आणि इथे प्रश्नावर प्रश्न…”

“विषय बदलु नकोस.. राधा सुर्य मावळतो आहे.. प्लिज बोल..”

“अरे काय चाल्लंय.. सुर्य मावळतो.. सुर्य मावळतोय.. चल प्लिज जाऊयात इथून…”

राधाच्या मनामध्ये चाललेला गोंधळ तिच्या चेहऱ्यावर स्पष्ट दिसत होता.

“कबीर तू म्हणालास ना तू ओळखतोस मला? मग झालं तर.. तुला उत्तर माहीती असेलच ना?”

“माहीती आहे.. पण मला तुझ्याकडून ऐकायचंय राधा..”

“का पण? समजून घे ना तु?”

“हे बघ राधा.. मी एक लेखक आहे. आणि पुस्तकांमध्ये प्रत्येक गोष्ट पात्रांच्या तोंडून यावी लागते. वाचक समजून घेतील, त्यांना कळेल वगैरे गोष्टींना अर्थ नसतो. चित्रपटांमध्ये हाव-भाव करून सांगता येतं, पुस्तकांत नाही..”

“हे पुस्तक नाहीए ना पण…”

“कमॉन राधा.. किस करताना तू लाजली नाहीस.. मग आता काय होतंय एव्हढं…”

“हे सगळं आत्ताच बोलायला हवं का?”, राधा
“हो.. आत्ताच.. तुझा काही भरवसा नाही, त्या दिवशी सारखी रात्रीतून गायब होशील…”, कबीर चिडून म्हणाला..

राधा पुन्हा एकदा खळखळून हासली… तिने एक दीर्घ श्वास घेतला.., कबीरचे दोन्ही हात हातात घेतले आणि मान खाली घालून ती कबीरच्या जवळ जाउन थांबली.. तिची नजर अजूनही जमीनीकडेच खिळलेली होती. मनात येणारे हासु दाबण्याच्या प्रयत्नात तिचे चिक-बोन्स फुगून वर आले होते. सुर्यास्ताच्या प्रकाशाने का अजून कश्याने कुणास ठाऊक पण तिच्या गालावर एक लालसर छटा पसरली होती.

“आय…..”..मोठ्या प्रयत्नांनी तिने पहीला शब्द उच्चारला..
जणु काही मनातल्या मनात एक ते दहा आकडे म्हणून होइपर्यंत राधा थांबली आणि मग पुढे म्हणाली…

“लव्ह…..”

ह्यावेळी मनातल्या आकड्यांची संख्या एक ते किती होती कुणास ठाऊक… पण तिने बऱ्याच वेळानंतर कबीरकडे बघीतले. तिची ती नजर.. ज्याने कबीरच्या काळजाचा अनेक-वेळा वेध घेतला होता, ज्याने कबीरला तिच्यासाठी वेडापिसा बनवले होते, जिच्यासाठी कबीर खरोखरच सगळं जग मागे सोडून यायला तयार होता..

ती बराच वेळ कबीरच्या डोळ्यात काही तरी शोधत होती. त्या क्षणामध्ये कबीरला तिची नजर जणु त्याच्या डोळ्यामार्गे त्याच्या मनामध्ये, तिच्यासाठी लिहीलेल्या भावना वाचते आहे असेच वाटून गेले.

जेंव्हा तिची खात्री पटली तेंव्हा राधा पुढे म्हणाली…

“….. यु”

कबीरने तिला जवळ ओढले आणि घट्ट मिठी मारली. त्याला आयुष्याकडून अजून काहीही नको होते. जे त्याला हवं होतं, ज्यासाठी तो गेले काही महीने तडफडत होता.. ते त्याला मिळालं होतं. त्याने आकाशाकडे पाहीलं आणि दोन बोटं कपाळाला टेकवून सलाम ठोकला.

अर्थात.. पुढे काय होणार आहे ह्याची त्याला त्या क्षणी कल्पना नव्हती…

अंधार पडायला लागला तसं दोघंही कारपाशी परतले.

कबीरने राधाला थांबवले, स्वतः दार उघडले आणि राधाला आत बसायची खुण केली..

“अरे बापरे.. इतका रिस्पेक्ट… आय एम फ्लॅटर्ड..”, गाडीत बसत राधा म्हणाली. “ये तो शुरुवात है.. आगे आगे देखो होता है क्या..”, असं म्हणून कबीरने गाडी सुरु केली आणि दोघंही गोव्याला जायला निघाले..

गाडीमध्ये कोणीच कुणाशी बोलत नव्हतं. त्याच दिवशी सकाळी दोघं एकमेकांशी इतकं काही काही बोलत होते, पण आता मात्र बोलायला शब्दच सापडत नव्हते.

कबीरला तर शरीर पिसासारखं हलकं हलकं झाल्यासारखं वाटत होतं. म्युझिक-सिस्टीमवर अर्जित-सिंगची गाणी वाजत होती. प्रत्येक गाण, गाण्यातले प्रत्येक शब्द कबीरला जणु आपल्यासाठीच लिहीले आहेत असंच वाटत होतं.

चोहोबाजुला गर्द झाडी, थंडगार वारा.. कबीरला हा प्रवास कधीच संपु नये असंच वाटत होतं.

दुसऱ्या दिवशी मस्त बाईक घेऊन राधाबरोबर गोवा फिरण्याची स्वप्न रंगवण्यात कबीर बुडून गेला होता. फोन वाजला तसा तो भानावर आला.

मोनिकाचा फोन होता.

कबीरने काही क्षण फोनकडे बघीतले आणि फोन बंद करून ठेवून दिला.

परंतू थोड्यावेळाने पुन्हा फोन वाजला.

“अरे फोन वाजतोय.. घे ना..”, राधा कबीरला म्हणाली..

क्षणभर चलबिचल झाल्यावर कबीर म्हणाला… “मोनिकाचा आहे.. काय करु? घेऊ का नको घेऊ?”

“तुझी मर्जी.. मी काय सांगु?”, खांदे उडवून राधा म्हणाली.

कबीरने गाडी कडेला लावली आणि फोन उचलला.

“हॅल्लो.. कबीर! कुठे आहेस?”, मोनिका

“गोव्याला.. का? काय झालं?”, कबीर

“कुणाबरोबर?”, मोनिका

“काय झालं काय?”, कबीर

“कबीर.. मी विचारलं, कुणाबरोबर आहेस?”

“राधा…”

“कबीर.. तुला काहीच वाटत नाही का रे? का माझ्या मनाची काहीच पर्वा नाहीए तुला? इतका निर्दयी कसा असु शकतोस तु?” , मोनिका

“निर्दयी? आणि मी? आणि तू मला असं अचानक सोडून निघून गेली होतीस तेंव्हाचं काय?”, कबीर

“कबीर.. मी दहा वेळा माफी मागीतली तुझी.. अजून दहा हजार वेळा सॉरी म्हणायला तयार आहे? तू जरा पण आपल्या दोघांबद्दल विचार करणार नाहीयेस का?”

“मोनिका.. मला वाटतं ती वेळ आता निघून गेली आहे..मी तुला तेंव्हा पण सांगीतलं आणि आता पण सांगतोय.. आपण त्यां त्याच गोष्टींवर बोलून खरंच काही अर्थ नाहीए…”

“पण कबीर…”

“मोनिका प्लिज.. आय एम इन रिअल्ली गुड मुड राईट नाऊ, अ‍ॅन्ड आय डोन्ट वॉन्ट टु स्पॉईल इट.. आपण मी परत आल्यावर बोलुयात ओके.. बाय..”, असं म्हणून मोनिकाला बोलायची संधी न देता कबीरने फोन बंद केला..

राधा इतका वेळ त्यांच बोलण ऐकत होती.

कबीरने राधाकडे बघीतलं. राधा थोडी अपसेट दिसत होती.

“तुला नाही आवडलं का तिने फोन केलेला?”, कबीर हसत म्हणाला..

राधा काहीच बोलली नाही.

“समबडी इज बिकमींग पझेसिव्ह..”, हसत हसत कबीर म्हणाला

राधा खिडकीतून खाली दिसणारा समुद्र बघत होती.

“ओके.. दोन मिनीटं खाली उतर…”, कबीर राधाला म्हणाला.

“कबीर प्लिज.. आधीच उशीर झालाय.. इथे असं आडवळणावर नको थांबुयात..”, राधा

“फक्त दोनच मिनीटं.. थोडे पाय मोकळे होतील…”, कबीर

राधा आणि कबीर दोघंही खाली उतरले.

एखाद्या परिकथेमध्ये वर्णावे तसं ते दृश्य होतं. एव्हाना सर्वत्र अंधार पडला आणि पोर्णिमेच्या चंद्राच्या चांदण्याने रस्ता न्हाऊन निघाला. घाटातून खाली दूरवर पसरलेल्या समुद्राचं चांद्रप्रकाशात चमचमणारं पाणी सुंदर दिसत होतं. सर्वत्र निरव शांतता होती.

कबीर राधाच्या समोर आला आणि एक पाय वाकवून गुडघ्यावर खाली बसून राधाचा हात हातात घेत म्हणाला..

“लेट्स गेट मॅरीड राधा….”

“एक्स्युज मी? व्हॉट?”, राधा म्हणाली..

“आय सेड.. लेट्स गेट मॅरीड”, कबीर

“पण तुला माहीते.. ते शक्य नाहीए…”, कबीरच्या हातातून हात सोडवून घेत राधा म्हणाली

“हो म्हणजे.. आय नो.. यु आर स्टील मॅरीड.. तुमचा डिव्होर्स झाला नाहीए.. पण आज ना उद्या होईलच ना…”, कबीर

“नो कबीर.. प्रश्न डिव्होर्सचा नाहीचे…”

“मग?”, कबीर उठून उभा राहीला

“आय डोंन्ट वॉंट टु बी इन रिलेशनशिप..”, राधा म्हणाली..

“आय डोंन्ट गेट ईट… काल तू मला किस केलंस.. स्वतःहून ‘आय-लव्ह-यु’ म्हणालीस.. मग?”, कबीर

“मग? आय लsssव्ह यु…”, लव्ह शब्दावर जोर देत राधा म्हणाली.. “आय स्टील लव्ह यु कबीर.. पण ह्याचा अर्थ असा नाही होतं की आपण लग्न करावं”

“मला तू आवडतेस… तुलाही मी आवडतो.. मग लग्न करण्यात प्रॉब्लेम काय आहे?”, गोंधळून कबीर म्हणाला

“कबीर.. मी आधीच्या लग्नातून बाहेर का पडले ते तुला माहीती आहे ना.. मी..मला स्वातंत्र्य हवंय कबीर.. आय वॉन्ट टु लिव्ह लाईफ़ ऑन माय टर्म्स…”

“ठिक आहे ना मग.. मी तुला प्रॉमीस करतो की तुला.. किंवा तुझ्या स्वातंत्र्यात मी कधीच येणार नाही.. तुला तुझं आयुष्य जसं जगायचंय तसं जगायला तू मोकळी आहेस..”, कबीर

“ओके.. काल तू वकिल झाला होतास.. आता मी वकिल होते..”, कबीरला थांबवत राधा म्हणाली..”तुला ऐकायचंय ना मला रिलेशनशिप का नकोय.. किंवा आपलं लग्न का शक्य नाहीए… तर ऐक…”

“सगळ्यांत पहील्यांदा.. मगाशी तुला मोनिकाचा फोन आला होता… यु नो.. फ़ॉर ए सेकंद आय फेल्ट `जे’, मला नाही आवडलं तिचा फोन आलेलं..”

“अग पण दॅट्स ओके.. इट्स नॅचरल.. रिलेशनशीप मध्ये असं होतंच.. त्यात काय एव्हढं? दॅट्स हाऊ इट इज टु बी इन रिलेशनशिप”, कबीर म्हणाला

“ॲन्ड दॅट इज द एक्झॅक्ट रिझन आय डोंन्ट वॉन्ट एनी रिलेशनशिप कबीर.. हे असं् आयुष्यात प्रत्येकवेळेस कधी मी तर कधी तू माझ्या बाबतीत पझेसिव्ह व्हायचं..! कश्यासाठी?”

कबीर काहीच बोलला नाही..

“मी जेंव्हा जेंव्हा तुझ्याकडे बघते कबीर.. तुझ्या चेहऱ्यावर फक्त एकच भाव असतात.. लेट्स गेट मॅरीड.. लेट्स हॅव किड्स… माझ्या स्वप्नात ते आयुष्य नाहीए कबीर जे तू बघतो आहेस. माझी स्वप्न वेगळी आहेत..”

“ओके.. काय स्वप्नं आहेत तुझी?”

“मला सगळं जग फिरायचंय.. मला प्रत्येक वेळी नविन ओळखी हव्यात.. त्याच त्याच लोकांबरोबर मला अख्खं आयुष्य घालवणं मान्य नाही. रुटीन लाईफ़ माझ्या लेखी नाही कबीर.. तुला माहीते, मी परत आल्यावर काही दिवसांनी जेंव्हा मला डिव्होर्सचं कळलं तेंव्हाच मी ठरवलं किंवा खरं तर त्या आधीच मी ठरवलं होतं की ह्या घरातून बाहेर पडायचं. सो व्हॉट आदर ऑप्शन्स आय हॅव.. मला आई-वडीलांनी दूर लोटलं होतं. मित्र-मैत्रींणीनीही माझ्याशी नातं तोडलं होतं. मला माझ्या पायावर उभं रहाणं आवश्यक होतं. मी माझ्यासाठी जॉब शोधायचं ठरवलं.

विचार केला, कुठलं काम असेल जे मी आनंदाने आणि एकाग्रतेने करु शकेन? आणि मग मनात विचार आला.. व्हाय नॉट ट्राय इन ट्रॅव्हल कंपनी. मी स्ट्रॉबेरी-टुर्समध्ये इंटव्ह्‌र्यु दिला.. आय ट्राईड माय बेस्ट टु कन्व्हींन्स देम.. खुप अवघड होतं कबीर.. आय मीन कुठली टुरीस्ट कंपनी एका तुरुंगाची हवा खाऊन आलेल्या, ड्रग्ज ॲडीक्टचा शिक्का असलेल्या व्यक्तीला कामावर घेईल. दे वॉन्टेड टु बिलीव्ह मी.. पण…”

राधा दोन क्षण थांबली..

“काल पोलिस-स्टेशनमध्ये मला क्लिन चिट मिळाल्यावर मी त्या ट्रॅव्हल कंपनीच्या ऑफीसमध्ये फोन केला होता…”

“वेट व्हॉट..? तू काल फोन केला होतास त्यांना? कधी? आणि मला नाही सांगीतलंस ते?”, कबीर तिचं बोलण तोडत म्हणाला..

“ते बघ.. बघीतलंस.. तू स्वतःच बघ.. तू नकळत एक्स्पेक्ट केलंस ना माझ्याकडून की मी तुला सगळं सांगाव, माझे निर्णय तुला विचारून घ्यावेत…”

कबीर खजील झाला.. त्याने काही न बोलता मान खाली घातली..

“मला माहीते तू मुद्दाम नाही केलेस, किंवा तू अनुरागसारखा पण नक्कीच नाही.. पण हे सगळं होतंच अरे रिलेशनशिपमध्ये.. आणि तेच मला नकोय.. एनिवेज.. तर मी त्यांना सांगीतलं क्लिन-चिट बद्दल.. पोलिसांकडून ऑफीशीअल क्लिन-चिट मिळेल दोन-चार दिवसांत ती पण त्यांना फॅक्स करेन.. अ‍ॅन्ड दॅट लेडी वॉज हॅप्पी.. शी इज रेडी टु टेक मी ऑन पेरोल.. अर्थात एकदम ‘टुर-लिड’ ची पोस्ट नाही मिळणार.. पण ‘टुर-ऑपरेटर’ची नक्कीच मिळेल.. इफ़ एव्हरीथींग गोज वेल.. देन…”, राधा काही क्षण थांबली..

“देन??”, कबीरने विचारलं..

“देन मोस्टली आय विल बी फ्लाईंग टु इटली ऑन माय फ़र्स्ट टुर असाईनमेंट..”, राधाच्या चेहऱ्यावरून आनंद ओसंडून वाहात होता.

कबीर काही तरी बोलणार होता, पण त्याने शब्द गिळून टाकले…

थोडा वेळ विचार करून तो म्हणाला.. “तू जे म्हणते आहेस ना.. ते काही अंशी मला पटतंय राधा.. गुड की तू तुझ्या आयुष्याबद्दल.. आयुष्याकडून असलेल्या अपेक्षांबद्दल फर्म आहेस.. पण मग काल…”

“काल काय कबीर.? काल मी तुला आय-लव्ह-यु म्हणाले असंच ना? अरे तुच सांग त्याचा अर्थ काय होतो? माझं तुझ्यावर प्रेम आहे.. हाच ना? मग आहेच ना, मी नाही म्हणतच नाहीए.. पण ह्याचा अर्थ असा कधी होतो की `लेट्स-हॅव-सेक्स'.. `लेट्स-गेट-मॅरीड', `लेट्स-स्टार्ट-ए-फॅमीली', `यु-लिसन-टु-मी' वगैरे? हा अर्थ आपण जोडतो त्याला हो ना?”

“हे बघ, तू ब्लाईंडली मी म्हणतेय म्हणून ॲक्सेप्ट कर असं मी म्हणत नाहिए, पण मला जेन्युईनली असं वाटतंय की तुला माझं मत, माझे विचार समावेत, पटावेत..”

कबीरचा जे घडतंय, आपण जे ऐकतोय, त्यावर विश्वासच बसत नव्हता. खांदे पाडून तो गाडीला टेकून उभा राहीला

“ओके.. समजा.. समजा मी तयार झाले लग्नाला.. तरी तुझे आई-बाबा तयार होतील आपल्या लग्नाला? एक डिव्होर्सी, तुरुंगात गेलेली.. ड्रग्जच्या नशेत झोकांड्या खाताना अख्या नॅशनल टीव्हीवर झळकलेली.. आपला वंश कधीच पुढे न्हेऊ शकणारी मुलगी त्यांना.....”

“व्हॉट?? व्हॉट?? आता हे काय अजून नविन...”, कबीर उसळत म्हणाला.. राधा स्वतःशीच हसली.. “कसली विचित्र आहे ना मी.. ऐकावं ते नवलंच नाही.. तुला आठवतं मी म्हणलं होतं माझं आणि अनुरागचं डिव्होर्सचं कारण मी घर सोडून जाणं नाहीये, समथींग पर्सनल आहे.. आठवतं?”

“हम्म..”, कबीर म्हणाला

“वेल हेच ते कारण.. त्या दिवशी मला पोलिसांनी पकडल्यावर मला मेडीकल टेस्टला न्हेलं होतं. युझवल प्रोसीजर असते ती. ॲटेंप्टेड रेपची केस होती, सो मला गायनॅककडे पण न्हेलं होतं.. जस्ट टु मेक शुअर की रेप झाला नाहीए .. युजवल प्रोसीजर... नंतर नंतर जामीनावर मी सुटले, आम्ही घरी आल्यावर, काही दिवसांनी पोलिसांनी त्यांचे मेडीकल रिपोर्ट्स कुरीअर केले.. अर्थात अनुरागनेच ते मागीतले होते.. जस्ट टु मेक शुअर...”

तर.. बिसाईड्स रेप झाला नाहीए बरोबर त्या टेस्टमध्येच असाही रिपोर्ट आला की मी कधीच कन्सीव्ह नाही करु शकणार.. जेनेटीक डिसॉर्डर आहे.. पहील्यापासूनच.. अर्थात आम्हाला कुणालाच हे माहीत नव्हते. पण अनुरागला मुल होऊ शकणार नाही हे कळल्यावर त्याचा माझ्यातला उरला-सुरला इंटरेस्टही संपला. ती पोलिस-केस वगैरे एक कारण आहे डिव्होर्सचं. खरं कारण हे आहे कबीर…”

बोलता बोलता राधाच्या डोळयात अश्रु उभे राहीले…

“ओह.. आय एम सो सॉरी…”, कबीर..

“आठवतं.. आपली सगळयांत पहीली भेट.. त्या मेडीकल शॉपमध्ये.. त्या वेळी आम्ही गेले सहा महीने बेबी साठी ट्राय करत होतो.. नंतर मी पळून गेले आणि इथे आल्यावर त्या आठवड्यात यु नो.. आय मिस्ड माय पिरीएड्स.. अर्थात थोडं लेट झाले.. त्यात मला उलट्या होत होत्या.. मी सॉल्लीड घाबरले.. मला वाटलं की मी घर सोडून यायला आणि मी कन्सीव्ह व्हायला एकचं वेळ आली का.. बट लकीली तसं काही नव्हतं.. जस्ट फुड-पॉईझनींग होतं.. एनीवेज.. डोन्ट बी सॉरी..

तर तू सांग तुझे आई-बाबांना चालेल अशी मुलगी सून म्हणून.. त्यांच जाऊ देत.. तू किती दिवस जुळवून घेशील माझ्याशी. माझं सौदर्य अजून १५-२० वर्ष.. पुढं काय? माझ्या शरीराचा अणु आणि रेणू स्वातंत्र्यासाठी झगडत राहील.. तुला जशी आदर्श पत्नी हवी तशी मी कधीच होऊ शकणार नाही कबीर..”

“मी..समजावीन आई-बाबांना.. आपण दत्तक घेऊ मुलं..”, कबीर शेवटचं अस्त्र काढत म्हणाला

“पण का कबीर? का तू ॲडजस्टमेंट करावीस…? यु नो व्हॉट.. यु आर सो स्विट.. यु डिझर्व्ह ए मॅरेज-मटेरीअल गर्ल. बाहेर अश्या हजारो मुली आहेत हु बिलीव्ह इन ट्रु लव्ह.. ॲन्ड लुकींग फ़ॉर बॉईज लाईक यु.. कश्याला माझ्यासाठी तू कॉम्प्रमाईज करतोस..? हे बघ उगाच

भावनेच्या भरात निर्णय नको घेऊस.. निट विचार कर... मोनिका खरंच चांगली मुलगी आहे, एकदा तिच्या हातून चुक घडली असेल.. त्याची जन्मभरासाठी तिला शिक्षा देऊ नकोस..”

कबीर काहीच बोलला नाही.

“एनिवेज.. आपण सोफी ऑन्टीकडे नको जाऊया.. लेट्स गो होम कबीर...”, राधा..
“पण का? जाऊ या की.. मे बी तुझा मुड ठिक होईल..”, कबीर

“नको कबीर.. खरंच.. लेट्स गो होम.. मला बाकीची पण बरीच काम आहेत.. उद्या त्या स्ट्रॉबेरी टुर्सला भेटून नोकरी तरी पदरात पाडून घेते..”, कबीरच्या संमतीची वाट न बघता राधा गाडीत जाऊन बसली..

कबीरने एकवार आकाशाकडे बघीतले आणि मग गाडीत बसून त्याने गाडी माघारी वळवली...

कबीर आणि राधा साधारण ३-३.३० तास ड्राईव्ह मध्ये एकमेकांशी एक शब्दही बोलले नाहीत.

शेवटी बऱ्याचवेळानंतर राधा म्हणाली, “आय एम सॉरी!”

“सॉरी? सॉरी कशाबद्दल? बिचबद्दल.... की त्या घाटाबद्दल?”, कुत्सीतपणे कबीर म्हणाला

“दोन्हीबद्दल...”, राधा

"म्हणजे? तुला म्हणायचंय की दोन्ही बाबतीत चुकलीस?"
"नाही.. मी चुकीची नक्कीच नाही वागले.. पण तू हर्ट झालास.. म्हणून सॉरी.."
"ओह.. सो तुला वाटत नाहीए तू चुकलीएस.. मग तुला काय करायचंय कोण हर्ट झालं आणि कोण नाही. तू बरोबर आहेस ना.. मग झालं तर…"

"नाही, तसं नाही. सगळ्यांत पहीलं म्हणजे मी माझ्या भावनांना आवरायला पाहीजे होतं.. निदान तुझ्या बाबतीत. मी प्रेझेंट मधे जगणारी मुलगी आहे कबीर.. त्या क्षणी जे वाटलं ते करते. आधी काय घडलं होतं.. किंवा पुढे काय होईल ह्याचा फारसा विचार नाही करत. पण तू तसा नाहीएस.. तू कुठली पण गोष्ट मनाला लाऊन घेतोस.. सो त्यावेळीच मी स्वतःला थांबवलं असतं.. तर तो घाटातला प्रसंग टाळता आला असता…", राधा

"एनिवेज.. जे झालं ते चांगलंच झालं ना.. वन्स अ‍ॅन्ड फ़ॉर ऑल.. आपण दोघंही आता एकमेकांच्या बाबतीत सुपर क्लिअर आहोत.. सो गुड फ़ॉर बोथ ऑफ़ अस… ", कबीर

"हम्म.. खरंय.. बर.. थोडा ब्रेक घेऊया का?.. तू सकाळपासून ड्राईव्हच करतो आहेस… २.३० वाजलेत.. पुढे पेट्रोल पंप आहे एक.. मॅक्डोनाल्ड पण आहे.. मागेच एक बोर्ड होता.. थांबुयात तिथे?"

"ओके…"

पाच एक किलोमीटरवरच्या पेट्रोल-पंपावर कबीरने गाडी आतमध्ये वळवली.

"काय घेशील… बर्गर-फ़्राईज-कोकच आणु का दुसरं काही?", राधा

"मी आणतो ना, बस तु..", कबीर

"प्लिज.. उगाच फॉर्मेलीटी नको.. आणते मी..", गाडीतून उतरत राधा म्हणाली..

"अरे पण रात्री..अपरात्री.. मी येतो बरोबर फ़ार तर.."

"कबीर.. रिअली.. इट्स ओके.. मला फ़्रेश व्हायला जायचंच आहे.. मी आणते...", असं म्हणून राधा निघून गेली.

कबीरही गाडीतून खाली उतरला. बाहेरचा गार वारा लागल्यावर त्याला थोडं बरं वाटलं. गाडीतल्या त्या ए/सीने त्याचं डोकं भणभणायला लागलं होतं. दोन्ही हात-पाय ताणून त्याने अंग मोकळं केलं. दोन तिनदा चालत चकरा मारल्यावर त्याला थोडं मोकळं वाटलं. मॅक्डोनाल्डच्या काचेच्या तावदानातून त्याने आतमध्ये नजर टाकली तेंव्हा काऊंटरवर राधा ऑर्डर देत होती.

"का आवडतेस तू राधा मला एव्हढी?", त्याने स्वतःलाच प्रश्न केला..."तू सांगीतलेली कुठलीच गोष्ट तू म्हणतेस तशी मला किंवा माझ्या आई-वडीलांनाही आवडणारी, पटणारी नाही. दोघांनीही जुळवून घ्यायचं ठरवलं तरीही ही दरी इतकी मोठ्ठी आहे की आपण कधी एकत्र येण्यापेक्षा समांतरच राहून जाऊ.. सगळं मान्य आहे मला हे.. पण तरीही.. तरीही.. तुला विसरण सोडाच.. तुला विसरायचा प्रयत्न करणं.. किंवा.. तुला विसरायचा प्रयत्न करायचा आहे ह्या विचाराने सुध्दा वेदना होताएत..."

कबीरच मन राधाला विसरायला लागणार आहे ह्या विचारानेच बगावतीवर उतरलं होतं. त्याच्या मनाचा कुठलाही कोपरा राधाला विसरायला तयार नव्हता.

कबीरने लक्ष विचलीत करण्यासाठी मोबाईलमध्ये डोकं खुपसलं...व्हॉट्स-अप चालु झाले तसे अनेक मेसेजेस इन-बॉक्स येऊन पडले. त्यात एक मेसेज रोहनचा ही होता.

कबीरने रोहनचा मेसेज ओपन केला...

"अभिनंदन.. अभिनंदन.. त्रिवार अभीनंदन.. शेवटी तुला जे पाहीजे ते मिळालं... बिग पार्टी तू आल्यावर.." रोहनने सोबतच पार्टी, फुलं, केक वगैरेंचे इमोटीकॉन्सही पाठवले होते.

कबीरला आठवलं.. त्या दिवशी संध्याकाळी बिचवरूनच त्याने पट्कन रोहनला मेसेज केला होता.. राधाच्या किस आणि आय-लव्ह-यु बद्दल... आता मात्र त्याला पश्चाताप झाला.

आपण उगाचच त्याला सांगायची घाई केली असंच त्याला त्या क्षणी वाटलं. त्याचं सहज लक्ष रोहनच्या स्टेटस कडे गेलं आणि त्याला आश्चर्यंच वाटलं.. रोहन ऑनलाईन होता.

"हा इतक्या उशीरा काय करतोय ऑनलाईन..?", त्याच्या मनात विचार येऊन गेला. एकदा त्याला पिंग करावं असं कबीरला वाटलं.. पण मग त्याला झाला गेला सगळाच प्रकार सांगत बसावं लागलं असतं आणि कबीर आत्ता त्या मुड मध्ये नव्हता.. म्हणून मग त्याने सोडून दिलं.

एव्हढ्यात राधा ऑर्डर घेऊन पोहोचली..

"काय रे? कसला विचार करतोएस..?"

"अगं. हा रोहन.. अजून ऑनलाईन आहे..."

"रोहन?.. तुझा मिडिआ-मॅनेजर का कोण तो.. तोच का?"

"हम्म तोच..काय करत असेल इतक्या रात्री?"

"तुला काय रे चांभार चौकश्या..? प्रेमात वगैरे पडला असेल कुणाच्या तरी तो.. घे... पिरी-पिरी मसाला चालतो ना फ्राईजवर?", हातातले पार्सल कबीरला देत राधा म्हणाली..

"हम्म..."

"मग.. प्लॅन काय आहे आता?",५-१० मिनिटं शांततेत खाण्यात गेल्यावर कबीर म्हणाला..

"अम्म.. आपण पोहोचलो की लगेचच दुपारी वगैरे मी स्ट्रॉबेरी-टुर्सना भेटेन.. मला तो जॉब हव्वाच आहे.. सगळे पोलिस-रिपोर्ट्स जमा करेन.. बहुदा २-४ दिवसांत मिळेल त्यांचं ऑफ़र लेटर.. तो पर्यंत मला घर शोधायचं आहे.. तुझ्या माहीतीत असेल कुठे रेंन्टवर तर सांग ना...", राधा

“काय बजेट आहे तुझं?”. कबीर

“तसा बजेटचा काही प्रॉब्लेम नाही यायचा.. माझ्या पगाराचे पैसे असतील.. शिवाय डिव्होर्सनंतर चांगली पोटगी मिळेलच.. केवळ तेव्हढेच पैसे इ.एम.आय म्हणून वापरले तरी नविन घर घेता येईल मला.. पण माझंच अजून ‘पुढे काय’ नक्की नाहीए.. सो इन्व्हेस्ट आत्ता तरी नाही करायचंय मला कुठे…”

“मी एक सुचवु का? म्हणजे बघ पटलं तर.. नाही तर दे सोडून..”

“हम्म बोल..”

“तू माझ्याच घरात का नाही रहात? माझा ३ बि.एच.के. आहे.. मी एकटाच रहातो मोठ्या घरात…”

राधाने त्याच्याकडे चमकून बघीतलं..

“तू त्या हिप्पींबरोबर रहात होतीसच की.. मी काय तितका वाईट नाहीए.. शिवाय.. तुझी वेगळी खोली असेल.. तुझी प्रायव्हसी तुला मिळेल ह्याची काळजी घेईन मी…. खरं तर एव्हढं मोठ्ठ घर.. मोना गेल्यावर खायला उठतं.. आपलं बाकी काही असलं नसलं तरीही तसं बरं जमतं.. जोपर्यंत तुला मनासारखं घर मिळत नाही तोपर्यंत रहा पाहीजे तर..”

“हम्म.. ऑफ़र तशी टेंप्टींग आहे..”, बर्गरचा मोठ्ठा तुकडा तोंडात कोंबत राधा म्हणाली.. “पण नको.. थॅंक्स..”

“पण का? काय प्रॉब्लेम आहे?”, वैतागून कबीर म्हणाला..”माझ्या प्रत्येक गोष्टीला नाहीच म्हणायचं ठरवलं आहेस का तु?”

“तसं नाही रे.. पण हे बघ.. मी एक दिवस काय तुझ्याबरोबर फिरले तर नको ते करून आणि नको ते बोलून बसले.. एकत्र रहायला लागलो तर.. माहीत नाही काय होईल.. त्यापेक्षा नकोच..”

“अरे असं कसं काहीही होईल.. आपण काय लहान आहोत का?”, कबीर काही आपला हट्ट सोडायला तयार नव्हता..

“ए चल.. झालं असेल तर निघु..”, कबीरचा विषय टाळत राधा म्हणाली आणि ती गाडीत जाऊन बसली..

कबीरने काही क्षण राधाकडे निरखुन बघीतलं. ह्या विषयावर पुढे काही बोलण्यात आत्ता तरी अर्थ नाही हे त्याच्या लक्षात आलं. त्याने हातातल्या वाळून गेलेल्या बर्गरकडे बघीतलं. त्याला खाण्यात कसलाही इंटरेस्ट राहीला नव्हता. उरलेला बर्गर आणि कोक त्याने शेजारच्या डस्ट-बीन मध्ये टाकून दिले आणि हात झटकून तो गाडीत बसला.

राधा मोबाईलवर मेसेज करण्यात मग्न होती. त्याने गाडी चालु केली आणि तो घराकडे परतायला निघाला.

दुसऱ्या दिवशी कबीर थोडा उशीराच ऑफीसमध्ये गेला तेंव्हा रोहन त्याची वाटच बघत होता. कबीरला बघताच तो आनंदाने उभा राहीला, पण तो काही बोलणार त्याच्या आधीच कबीरने त्याला थांबवले.

“प्लिज काही बोलु नकोस…”

“का रे? काय झालं? पहील्याच दिवशी वहीनींशी भांडलास की काय?”, कबीरचा पडलेला चेहरा पाहून रोहनने विचारले.

“वहीनी?? हा हा हा…”, निराशाजनक स्वरात हसत कबीर म्हणाला…

“जरा कळेल असं बोलशील का?” कबीरच्या केबीनमध्ये त्याच्या समोरची खुर्ची ओढुन त्यावर बसत रोहन म्हणाला..

पुढच्या तासाभरात कबीरने त्याला इथून निघुन.. ते इथे परतेपर्यंतचा सर्व प्रवास ऐकवला.

“कठीण आहे बाबा तुझं खरंच.. काय नशीब घेऊन आला आहेस तु…”, रोहन काहीश्या त्रासीक स्वरात म्हणाला.. “मोनिका मिळाली.. मोनिकाने तुला सोडलं.. तू गोव्याला गेलास.. राधा मिळाली.. राधा हरवली.. मग परत राधा मिळाली.. कुठे? तर पोलिस स्टेशनमध्ये.. मग परत राधा मिळाली.. मग तिने तुला किस्स केलं.. आय.लव्ह.यु. म्हणाली.. आणि मग? तरीही राधा परत हरवली…? अरे काय चाल्लंय काय??”

“मी तरी काय करु तुच सांग, खरंच माझी कुंडली तपासून घ्यायची वेळ आली आहे..”

“मग आता काय? परत आपला मोर्चा मोनिकाकडे का? ती आहेचे रिकामी तुझ्यासाठी नाही का?”, रोहन

“मोनिका? ती कुठून मध्येच उगवली? आणि तू का इतका चिडतो आहेस?”

“नाही तर काय? तुझंच नक्की ठरत नाहीए राधा की मोनिका..”

“पण मी मोनाबद्दल काहीच बोललो नाहीए..”

“नाही कस? मध्ये तुम्ही दोघं भेटत नव्हतात परत?”

“आम्ही दोघं नाही, ती.. ती भेटत होती मला..”

“मग तू नाही म्हणु शकला असतास तिला भेटायला.. कश्याला तिला तंगवून ठेवतोस.. सरळ सांग तिला की मला तुझ्यात इंटरेस्ट नाही म्हणून…”

“ते माझं मी बघेन.. पण तू का एव्हढी तिची बाजु घेतो आहेस..?”

“म्हणजे काय? तू वापरतो आहेस मोनिकाला.. राधा नसली की तिच्याकडे.. राधा असली की कोण मोना ! असा प्रकार आहे तुझा…”

"हे बघ रोहन..", कबीर काही बोलणार एव्हढ्यात त्याच्या डेस्कवरचा फोन वाजला आणि दोघांच बोलणं तिथेच खुंटलं..

त्या दिवशी घरी आल्यावर कबीरने रोहनच्या बोलण्याचा खुप विचार केला. रोहन म्हणत होता तसं खरोखरंच तो वागत होता का? मुद्दाम नक्कीच नाही.. पण नकळत?

एकाच वेळी दोन दगडांवर पाय ठेवून तो मोनाला दुखवत होता का? पहील्यासारखं प्रेम त्याला मोनाबद्दल नक्कीच वाटत नव्हतं आणि राधा भेटल्यानंतर ते प्रेम मोनाबद्दल भविष्यात पुन्हा कधी मनामध्ये निर्माण होईल ह्याची धुसर आशाही त्याला वाटत नव्हती. अर्थात त्याने कधी हे स्पष्टपणे मोनिकाला सांगीतलेही नव्हते. कदाचित रोहन म्हणतो तसं मोनिका अजूनही त्याची वाट बघत असेल.

कबीरने बराच विचार केला आणि मग त्याने मोनिकाला फोन लावला..

"हाय कबीर.. व्हॉट अ प्लिजंट सर्प्राईज...", मोनिका आनंदाने म्हणाली..

"हाय मोना.. कशी आहेस?"

"मी मस्त.. बोल.. कशी आठवण काढलीस?"

कबीरला खरं तर असं फोनवर ब्रेक-अप करणं बरोबर वाटत नव्हतं. निदान शेवटचं का होईना... प्रत्यक्ष भेटून ह्या गोष्टी स्पष्ट कराव्यात अशी त्याची इच्छा होती. पण .. पण कदाचित तो प्रत्यक्षात मोनाला समजावून सांगण्यात यशस्वी झाला नसता.. तिच्या निरागस चेहऱ्यासमोर त्याचे शब्द घश्यातच अडकले असते..

"मोना थोडं बोलायचं होतं..", काहीसा गंभीर होत म्हणाला.."
"बोलं ना.. ब्रेक-अप करायचंय?", अगदी सहजतेने मोनिका म्हणाली खरी, पण कबीरच्या पायाखालची जमीनच सरकली.

“ब्रेक तर केंव्हाचं झालं ना आपलं? तुच तर केलं होतंस”, कबीर म्हणाला...
“हो ना? मग कश्यासाठी बरं फोन केलास तु?”

“हे बघ मोना.. मला माहीती आहे.. तुला अजूनही वाटतं की आपण दोघांनी पुन्हा एकदा एकत्र यावं.. तुझ्या जागी मी असतो तर कदाचित मलाही तसंच वाटलं असतं...”

“माझ्या जागी म्हणजे? म्हणजे अशी मी एकटी.. बेसहारा..अबला.. माझ्या आयुष्यात कोणीच नाही... असं?”

“नाही.. तसं नाही.. म्हणजे तुला तुझी चुक उमगली आहे.. आधीचा ब्रेक-अप हा आपल्या चुकीने झाला होता तर..”

“आहे ना मान्य तुला.. की मी माझी चुक कबुलली आहे.. मग का पुन्हा पुन्हा आठवण करून देतो आहेस...?”

“तू भांडणारच आहेस? का मला बोलून देणारेस?”
“ओके.. बोल..”

“मला असं वाटतं की आपल्यात असलेलं प्रेम केंव्हाच संपलं आहे.. निदान माझ्याबाजुने तरी.. मग त्याला ओढुन-ताणून.. माफ़ीच्या चिकटपट्या लावून उगाच प्रयत्नांनी उभं करण्यात काय अर्थ आहे?”

“तुला हे खरंच असं वाटतं आहे का? राधा..”

“राधाला मध्ये आणु नकोस मोना.. तिचा यामध्ये काहीच संबंध नाही.. आपण आपल्या दोघांबद्दल बोलतो आहोत.. आणि तो विषय आपल्या दोघांमध्येच रहावा.. प्लिज..”

“...”

"मला वाटतं उगाच कॉम्प्रमाईज करून.. एकमेकांवर आपल्या अपेक्षा लादुन, प्रयत्न करून पाहुयात म्हणत हे नातं टिकवण्याचा काय उपयोग.. प्रेम ही प्रयत्न करून निर्माण होणारी गोष्ट नाही ना मोना.."

"नाही? मग तू राधाच्या बाबतीत 'प्रयत्न' ह्या शब्दापासून कोसो-दूर आहेस तर..."

"मोना प्लिज.. राधाला ह्यात नको आणुस.. परत सांगतोय.."

"एनिवेज.. तू ठरवंलच आहेस सगळं तर बोलून तरी काय उपयोग पुढे..", मोनिकाचा आवाज बोलताना कापरा झाला होता..

"मोना.. ऐक ना.. मी फक्त एव्हढंच म्हणतो आहे की.. आपण आपल्यातून प्रेम हा शब्दच बाद करुयात ना... आपण एकमेकांचे चांगले मित्र तर होऊ शकतो.."
"प्लिज कबीर.. मला हे असलं फ्रेंड-झोनच प्रकरण जमत नाही.. म्हणजे.. असं नाही की उद्या तू मला रस्त्यात दिसलास तर मी रस्ता बदलून पळून वगैरे जाईन.. एनिवेज.. सो कबीर.. ऑल-द-बेस्ट.. तुला तुझं प्रेम जरुर मिळो ही मी तुझ्यासाठी रोज प्रार्थना करेन.."

"कश्याला अशी निरवा-निरवीची भाषा करतेस.. तू पण इथेच आहेस.. मी पण इथेच आहे.. नसेल ते फक्त आपल्यातले तुला अपेक्षीत असलेले नातं.. इतकंच.."

"इतकंच? फक्त 'इतकंच' कबीर?", मोनिका अचानक संतापून म्हणाली..
"मी तुझं पुस्तक वाचलं् कबीर.. राधाबद्दलच्या तुझ्या भावना तू 'इतकंच' ह्या एका शब्दात मांडु शकतोस? नाही ना?.. माफ़ कर.. तू नाही म्हणलास तरीही मी पुन्हा पुन्हा राधाचा विषय काढते आहे... पण मला असं वाटतं आज मी जेथे आहे.. तेथेच तू सुध्दा आहेस.. मला माहीते तेंव्हा मी चुकले.. मी हजार काय लाख वेळा ती चुक मान्य करेन.. केली आहे.. तुझं प्रेम समजण्याइतकी मी मॅच्युअर नव्हते.. तू माझ्यावर निस्वार्थी प्रेम करत राहीलास आणि मी सेल्फीशपणे तुझ्याकडून फक्त अपेक्षा करत राहीले.. तुला तुझं माझ्याकडून अपेक्षीत असलेलं प्रेम तुला मिळावं, आपण एकमेकांच्या चुका विसरून एकत्र यावं एव्हढंच मला वाटत होतं.. बट यु आर राईट.. मी कितीही प्रयत्न केले तरीही तुझ्यातलं माझ्यासाठीचं आटलेलं प्रेम कितीही प्रयत्न

केले तरी कदाचित मी परत निर्माण करु शकणार नाही.. ॲन्ड आय डोन्ट वॉन्ट टु लुक लाईक अ बिच.. तुझ्याकडे प्रेमाची भिक मांगणारी.. मलाही माझा सेल्फ एस्टीम जपायला हवा आणि त्याचबरोबर तुझ्या भावनांचा तुझ्या मतांचा आदर करायला हवा.. सो.. गुड बाय रायटर.. तुला तुझा मार्ग मोकळा आहे.. ह्यापुढे तुझ्या आयुष्यात मोना येणार नाही....”

कबीरने बोलण्यासाठी तोंड उघडले.. पण त्याच्या तोंडातून शब्दच फुटेना... दुःखाने त्याचा कंठ दाटून आला होता.. त्याने बोलण्याचा प्रयत्न केला, पण फोन कधीचाच बंद झाला होता...

कबीरने फोन ठेवून दिला आणि तो खिडकीत उभा राहीला... खिडकीचं दार उघडताच गरम हवेचा एक झोत आतमध्ये आला. मार्चमहीना सुरु झाला होता आणि आधीच ‘मे’महीन्याचा उन्हाळा जाणवु लागला होता. झाडांची पानगळ सुरु झाली होती.. रखरखलेल्या रस्त्यांवरून पाला-पाचोळा आणि धुळ उडवत गाड्या वेगाने धावत होत्या...

दूरवर कबीरची नजर आकाशात उडणाऱ्या पतंगावर स्थिरावली.. वाऱ्याच्या लहरींबरोबर सरसरून उंच-उंच जाणारा पतंग.. अचानक कटला जातो.. त्याच्याशी बांधल्या गेलेल्या मांज्याचा आणि त्याचा संबंध तुटतो आणि तो पतंग बेभान, स्वैर होतो.. वाऱ्याच्या लहरींवर स्वार होऊन मनसोक्त तरंगणारा तो पतंग आता त्याच वाऱ्याच्या लहरींनी भरकटून जातो.. जो वारा त्याला उंच उंच न्हेत असतो.. तोच वारा आता त्या पतंगाची चिरफाड करु लागतो..

दिशाहीन पतंग हेलकावे खात कबीरच्या नजरेआड होतो.. कबीरची नजर मात्र अजूनही त्या निळाशार आकाशात अजूनही भरकटत रहाते.. दिशाहीन...

“मग.. पुढे काय करायचं ठरवलं आहेस?”, कडक कॉफीचा घोट घेता घेता मेहतांनी कबीरला विचारलं.

“कश्याबद्दल?”, कबीरने न कळून विचारलं

“कश्याबद्दल काय.. तू पुस्तकाचा दुसरा भाग लिहीणार आहेस ना.. त्याबद्दल.. काही विचार केला आहेस का?”

“ओह.. हा.. ते… नाही.. अजून काही विचार नाही केलाय…”

“मग कर की सुरु आता.. आत्ता विचार चालु केलास तर ४-६ महीन्यात थोडीफार सुरुवात होईल…”

“हम्म.. बरं, आपल्या सगळया एडीशन्स संपल्या का?”

“अरे हा.. बरं झालं आठवण केलीस.. आपण तिसरी एडिशन जरा जास्तीच मोठ्ठी काढली होती.. पण थोडा आता सेल कमी झालाय.. पुस्तकही दुकानात पडून आहेत.. तर आमच्या मार्केटींग टीमने एक नविन कल्पना काढली आहे.. विक्री वाढवण्यासाठी…”

“काय?”

“तू ते पुस्तकाच्या शेवटी तुझा फोन नंबर टाकला होतास बघ.. नंतर तुला अनेक फोन आले होते.. बरोबर..?”

“हो.. जरा खुप जास्तीच आले होते…”

“आपण त्या फोन नंबरमधून एक लकी ड्रॉ काढायचा.. म्हणजे त्याच असं नाही.. पण आपण ही लकी-ड्रॉची जाहीरात केली की अजून जे फोन येतील ते आणि आधीच ह्यामधून…”

“आणि.. काय कार वगैरे देताय की काय?”, हसत हसत कबीर म्हणाला..

“नाही रे.. जो नंबर निघेल त्याच्या. किंवा तीच्याबरोबर तू डिनर डेटला जायचंस…”

“ओह प्लिज हा.. मी असलं काहीही करणार नाहीए..”, मेहतांना थांबवत कबीर म्हणाला..

“अरे.. असं काय करतोएस.. बिल आम्ही भरणारे…”, हसत मेहता म्हणाले.. “बिलाचा प्रश्न नाही.. पण लकी ड्रॉ मध्ये कुणी जख्ख आजोबा.. कजाग काकु.. एखादा टोंणगा निघाला तर? फ़ार पकवतात हो लोकं.. मी नाही डिनर डेटला वगैरे जाणार..”

“अरे नाही निघणार.. तुला आवडेल अशी.. तुला शोभेल अशी.. सुंदर.. डिसेंट मुलीला आपण सिलेक्ट करु.. ओके?”

“असं कसं करता येईल..?”

“का नाही येणार? अरे थोडे पैसे दिले की सगळा डेटा आजकाल ह्या टेलिफोन कंपन्या विकतात.. आणि ते तरी कश्याला.. माझ्या स्वतःच्या कित्येक ओळखी आहेत.. पैसे न भरताही प्रत्येक फोन नंबरची कुंडली मिळेल आपल्याला.. त्यावरून काढु आपण.. तू ठरव फ़ार तर..कुणाला शॉर्ट-लिस्ट करायचं ते.. मग तर झालं..?”

कबीरला त्यातल्या त्यात हा पर्याय बरा वाटला…

“काय हरकत आहे..”, त्याने स्वतःशीच विचार केला.. तश्याही बऱ्याचश्या संध्याकाळ त्याने एकट्याने घरात टीव्हीसमोर बसून घालवल्या होत्या

फ़ारसे आढेवेढे न घेता तो तयार झाला..

डेली-न्युजपेपरमध्ये जाहीरात येऊन गेल्यानंतर मध्ये आटलेला फोन्सचा ओघ पुन्हा सुरु झाला.

कबीरकडे भरपुर वेळ होता.. त्यामुळे तो येणाऱ्या फोन्सवर अगदी मनापासून गप्पा मारत होता. पुस्तक कधी वाचले? कुठला भाग जास्ती आवडला? आधी कोण-कोणती पुस्तकं वाचली.. वगैरे चौकश्या तो करत असे. ह्या फोन्सच्या माध्यमातून त्याला एक नव्याने हुरुप आला होता. शहराच्या.. राज्याच्या... काही अंशी देशाच्या कानाकोपऱ्यातून फोन आला की त्याला फ़ार आनंद वाटे. आपण जे लिहीतो ते लोकांना आवडते आहे.. आपली गोष्ट कुणाला ना कुणाला अगदी त्यांचीच गोष्ट वाटते आहे हे ऐकून तो भारावून जाई. त्यातल्या त्यात फ़ोनवरून जो आवाज चांगला वाटे.. जिच्याशी बोलताना त्याला छान वाटे असे नंबर तो कागदावर लिहून ठेवत होता जेणेकरून अश्याच लोकांचा डेटा फोन-कंपनीतून मागवता येईल..

असंच एकदा घरातल्या आराम-खुर्चीत रेलून तो पुढच्या भागात काय लिहावं ह्याचा विचार करत असतानाच त्याचा फोन वाजला..

"हॅल्लो.. कबीर..", पलीकडून एक गोड आवाज कानावर पडला..

"बोलतोय...", नकळत कबीर खुर्चीत सरळ होऊन बसला..

"कबीर, मी रती बोलतेय.. तुम्ही क्रेडीट कार्ड वापरता का?"

"डॅम इट..", कबीर स्वतःशीच चरफ़डला... "सॉरी.. मला नकोय क्रेडीट कार्ड.. थॅंक्स.."

पलिकडून खिदळण्याचा आवाज आला तसा कबीर फोन ठेवता ठेवता थांबला..

"सॉरी.. सॉरी.. मी क्रेडीट कार्डसाठी नाही फोन केला.. खरंच सॉरी.. मस्करी केली.."

"कोण बोलतंय?", कबीरने काहीसं चिडून विचारलं..

"सांगीतलं तर.. रती बोलतेय... मी पुस्तक वाचलं तुमचं...", पलिकडून पुन्हा तोच गोड आवाज..

"तरीपण मला क्रेडीट कार्ड नकोय...", ह्यावेळी मस्करी करत कबीर म्हणाला..

काही क्षण दोघंही हसण्यात गुंग झाले...

“नाही.. तुम्ही डेट वर न्हेणार आणि ऐनवेळी पैसे नाहीत बिल भरायला म्हणालात तर.. म्हणून म्हणलं आधी विचारावं, क्रेडीट कार्ड वापरता का...”, रती हसु थांबवत म्हणाली..

“ए प्लिज.. कबीर म्हणालीस तरी चालेल..”, कबीर...

“ओके.. कबीर..”

“गुड.. सो कशी वाटली गोष्ट.. इश्क ची?”, कबीरने विचारलं आणि मग पुढची ५-१० मिनीटं दोघंही पुस्तकातल्या विवीध भागांबद्दल बोलत राहीले...

“मग.. तुला काय वाटतं.. आपल्या हिरोने पुढच्या भागात काय करायला हवं? मीराची वाट बघणं योग्य आहे की त्याने मुव्ह ऑन करावं?”

“मला वाटतं.. त्याने त्याच्या आधीच्या गर्ल-फ्रेंडकडे परत जावं..”, रती

“का?”, कबीरला हे उत्तर अगदीच अनपेक्षीत होतं..

“का नाही?”, रतीने प्रतीप्रश्न केला..

“त्याच्या आधीच्या गर्लफ्रेंडनेच त्याला सोडलं होतं.. ते पण तिच्या स्वार्थासाठी.. अनपेक्षीत अपेक्षा ठेवुन.. नायकाने तीची खुप वाट बघीतली.. नाही असं नाही.. पण प्रत्येक गोष्टीला अंत असतो.. आणि शेवटी झालं ते चांगलंच झालं ना.. मीराच्या रुपाने त्याला पुन्हा एकदा प्रेम मिळालं, पहाताक्षणी तो तिच्या प्रेमात पडला आणि प्रत्येक भेटीत तो तिच्याकडे अधीकच ओढला गेला. अर्थात मीराच्या तिच्या आयुष्याकडून असलेल्या अपेक्षा वेगळया होत्या म्हणून ती कदाचित त्याच्या आयुष्यातून निघून गेलीही असेल.. पण असंही होऊ शकतं ना की.. त्याच्यापासून दूर राहील्यावरच मीराला प्रेमाची जाणीव होईल आणि ती परत येईल... म्हणजे मला तरी असं वाटतं.. तुला नाही वाटत ज्याच्यावर आपण मनापासून प्रेम करतो त्याने

आपल्या प्रेमाचा स्विकार करावा.. आपल्या आयुष्याचा साथीदार म्हणून तोच मिळावा म्हणून?”

“कबीर, जरं का तुझं शेवटचं वाक्य खरं असेल ना तर.. त्याची गर्लफ्रेंड सुध्दा हेच तर मागते आहे त्याच्याकडून…”

“पण.. तिनेच तर त्याला सोडलं होतं..”, रतीचं वाक्य मध्येच तोडत कबीर म्हणाला..

“कबीर.. तुझ्याकडे फक्त हे एकच कारण आहे का? का तू दुसरं पण काही बोलणार आहेस?”

कबीर काहीच बोलला नाही..

“कबीर.. यु नो व्हॉट अ ट्रु जंटलमन इज?”

“व्हॉट?”

“ट्रु जंटलमन तोच असतो जो स्त्रीचा आदर करतो.. तिच्या भावनांचा आदर करतो.. तिच्या मतांचा आदर करतो.. आणि तुझ्या कथेचा नायक जर त्याच्या पुर्वीच्या गर्लफ्रेंडकडे परत गेला ना तर तो एकावेळी दोन्ही स्त्रीयांच्या भावना सांभाळेल. एकीकडे त्याच्या गर्लफ्रेंडच्या प्रेमाला तो होकार देईल तर दुसरीकडे मीराच्या मतांचा आदर करून तिला हवं असलेलं आयुष्य तिला मिळावं म्हणून तिच्या मार्गातून बाजुला होईल..”

“मान्य.. पण म्हणून त्याने स्वतःच मन मारून परत तिच्याकडे जावं असं तुला म्हणायचं आहे का?”

“मन मारून? नाही कबीर मला नाही वाटत त्याला मन मारून म्हणतात.. अर्थात तू लेखक आहेस.. ती पात्र तू रंगवलेली आहेस.. सो तुझ्या पात्रांचा स्वभाव काय आहे.. त्यांच्या मनात काय चाललं आहे हे तुला अधीक माहीती.. पण माझ्या लेखी त्याला `इगो विसरणं’

म्हणत असावेत.. मला वाटतं त्याच्या गर्लफ्रेंडने सोडल्याच्या दुःखापेक्षा त्याचा इगो परत जाण्याच्या मार्गात अधीक येतोय.. मी चुकही असेन.. पण मला तरी असं वाटतं..”

कबीर क्षणभर खरोखरंच चकीत झाला.. मोनिकाकडे परत जाण्यात आपलं दुःख आड येतंय? का खरंच आपल्या मनात कुठेतरी खोलवर इगो दडून बसलाय? हा विचार त्याच्या मनाला स्पर्शुन गेला..

“क्षणभर हेही मान्य की कदाचित त्याचा इगो असेल.. पण बाकीच्या गोष्टींच काय.. अश्या इतरही अनेक गोष्टी होत्या ज्या त्याला पसंद नव्हत्या.. त्या पेज-श्री पार्टीज.. ते अपेक्षांच ओझं?”

“कबीर.. तू तो जुना बॉबी सिनेमा पाहीला आहेस..”, काही क्षण शांततेत गेल्यावर रती म्हणाली..

“डिंपलचा ना? हो पाहीलाय…”

“त्यात एक मस्त डायलॉग आहे बघ.. *कोई प्यार करे तो तुमसे करे, तुम जैसे हो वैसे करे। कोई तुमको बदल कर प्यार करे तो वो प्यार नहीं, सौदा है.. और सायबा.. प्यार मै सौदा नही होता…* आठवतोय ना…?”

नकळत कबीरच्या चेहऱ्यावर हास्याची एक लकेर येऊन गेली.. कित्येक दिवसांनी.. कित्येक दिवसांनी कबीर हसला होता…

त्याने घड्याळात नजर टाकली.. गेला अर्ध्या तासाहुनही अधीक काळ तो ह्या रतीशी फोनवर बोलत होता…

“मला आवडेल तुझ्याशी ह्या विषयावर अधीक बोलायला रती.. मला वाटतं.. प्रत्यक्ष भेटलोच तर तेंव्हा बोलायला थोडं ठेवुया नाही का?”, कबीर म्हणाला..

“ऑफ़कोर्स.. मी तयार आहे..”, रती

“डन देन.. होप सो.. यु विल बी द लकी विनर.. आणि आपण इथूनच पुढे आपला वाद सुरु करु.. व्हॉट से…?”

“आमेन…”, हसत हसत रती म्हणाली…

“बाय देन..”

“बाय…”

कबीरने फ़ार कष्टाने फोन बंद केला.. अजून कित्तीतरी वेळ तो रतीशी बोलु शकला असता.. त्याला बोलायचं होतं.. आणि तो बोलणारही होता.. त्याने रतीचा नंबर ठळक अक्षरांनी कागदावर लिहीला आणि मग मेहतांना मेसेज केला.. “लकी विनर शोधायची गरज नाही.. मला लकी विनर मिळाला आहे.. सोबत नंबर पाठवत आहे…”

पुढचे काही तास तो पुर्णपणे राधाला.. मोनाला विसरून गेला होता. पुढचा एक तास तो पुन्हा पुन्हा रतीबरोबरचं संभाषण आठवत होता. इतक्या फोन कॉल्समध्ये पहील्यांदा कुणीतरी त्याच्याशी वाद घातला होता.. मुद्देसुद संभाषण केले होते.. उगाचच आपलं ते नेहमीचंच `मी तुमचं पुस्तक वाचलं.. खुप छान आहे’ वगैरेंचा त्याला कंटाळा आला होता. रतीने त्याला त्याच्याच लेखनाचा विचार करायला लावला होता.. इतके आठवडे गंज लागून पडलेला त्याचा मेंदु आळस झटकून जागा झाला होता.. फ़्रेश झाला होता..

आता फ़क्त त्याला ती संध्याकाळ डोळयासमोर दिसत होती जेंव्हा तो रतीला प्रत्यक्षात भेटणार होता…

नकळत रतीच्या विचाराने त्याच्या अंगावर शहारा आला…

मेहतांनी 'ड्रॉ' ची तारीख एक महीन्यांनी ठेवली होती. तो महीना कबीरसाठी अंत पहाणारा ठरत होता. कबीर अक्षरशः एक एक दिवस मोजून काढत होता. रतीबद्दल.. तिला भेटण्याबद्दल त्याला उत्सुकता का वाटत होती हे त्यालाच कळत नव्हते, परंतू बऱ्याचदा असं होतं ना की काही व्यक्ती एका भेटीतच ओळखीच्या वाटतात तर काही अनेक भेटींनंतरही अनोळखी. राधाच्याबाबतीत कबीरची ही भावना खुप जास्ती स्ट्रॉंग होती, पण कदाचित तेंव्हा तो तिला प्रत्यक्षात भेटला होता. रतीशी तर तो फक्त फोनवरच बोलला होता.

त्या दिवसानंतर रतीला पुन्हा फोन करण्याचा त्याला अनेकवार मोह झाला. परंतू त्याचे दुसरे मन त्याला साथ देईना. शेवटी काहीही झालं तरी ह्या घडीला तो एक प्रथितयश लेखक होता आणि असा फोन करणं त्याला योग्य वाटेना. अनेकवेळा रतीला लावण्यासाठी उचललेला फोन त्याने नाईलाजाने ठेवून दिला होता.

रती दिसते तरी कशी ह्याची तर त्याला सॉल्लीड उत्सुकता होती. शेवटी त्याने मेहतांना फोन लावला..

“मेहता.. ते फोन रेकॉर्ड्सचे डिटेल्स तुम्हाला मिळतात म्हणाला होतात ना?”

“हो.. का रे? रतीचे डिटेल्स हवेत का?”

“हो.. “, काहीसा ओशाळत कबीर म्हणाला.. “मला तिचा फोटो हवा होता..”

“मला माहीती होतं तू विचारशील.. त्या दिवशी तू तिचा नंबर मेसेज केल्यानंतर लगेचच मी चौकशी केली होती.. पण..”

“पण? पण काय?”

“बहुतेक.. तिचे डिटेल्स नाही मिळु शकणार असं दिसतंय..”

“का? काय झालं?”

"अरे तिने तिचा नंबर प्रायव्हेट म्हणून नोंदवला आहे.. शिवाय तिचे वडील सैन्यात आहेत.. असे रेकॉड्‌र्सची गोपनियता बाळगली जातेच.. आणि त्यातच तिने तिचा नंबर प्रायव्हेट केला आहे.. सो एकुण प्रकार कठीण दिसतोय.."

"पण तुम्ही म्हणालात ना ओळखीची आहेत लोक.."

"आहेत ना.. मी नाकारतच नाहीए.. पण काही गोष्टींना मर्यादा असते कबीर... आणि आजकाल हे `हनी-ट्रॅप'चे प्रकार वाढल्यापासून फ़ार सावधानता बाळगावी लागतेय त्यांना.. ओपन नंबर असता तर काहीच प्रश्न नव्हता कबीर... पण तरीही मी प्रयत्न करतोय.. मिळाले डिटेल्स की पहीले तुलाच देणार..."

"हम्म.. प्लिज.. थॅंक्स..." असं म्हणून निराशेने कबीरने फोन ठेवून दिला...

राधा आणि मोनिका कबीरच्या आयुष्यातून जणु अदृश्यच झाल्या होत्या. मोनिकाकडून तरी निदान इतक्यात काही संपर्क होइल ह्याची कबीरला आशा नव्हती.. पण.. पण निदान राधाचा एकदातरी फोन येईल असे त्याला वाटत होते.. त्या 'स्ट्रॉबेरी हॉलीडेजचे' पुढे काय झाले? नोकरी मिळाली की नाही?, गोकर्ण-पोलिस-स्टेशनमधून क्लिनचीटचे ऑफीशीअल पेपर्स मिळाले का? अनुरागशी डायव्होर्सचं पुढं काही घडलं का? असे एक ना अनेक प्रश्न त्याला होते. पण ह्या वेळी त्याने राधाला फोन न करण्याचं ठरवलं होतं. आपली तिच्या आयुष्यात काही किंमत असेल तर ती करेलच फोन असाच काहीसा विचार त्याने केला होता.

मार्च उलटून एप्रील सुरु झाला होता आणि त्या रखरखत्या उन्हाळ्यात कबीरचे आयुष्यही रखरखीत बनले होते.

दिवसांमागून दिवस जात होते आणि शेवटी तो ड्रॉचा रिझल्ट मेहतांनी ठरल्याप्रमाणे प्रसिध्द केला.

"कबीर.. मला वाटतं तुच तिला फोन करून ती विजेती असल्याची बातमी सांगावीस..", मेहता कबीरला म्हणाले होते.. आणि कबीरने ही अगदी पडत्या फळाची आज्ञा मानुन मान्यता दिली होती.

"ठिक आहे मग.. मी ब्ल्यु-डायमंडला करतो बुकींग.. शुक्रवारी संध्याकाळी.. त्यांचा कपल्स-लाऊंज मस्तच आहे…", मेहता म्हणाले..

"ओके..", असं म्हणून कबीरने फोन बंद केला..

"काय रे? काय झालं?", कबीरच्या चेहऱ्यावरचा आनंद बघून रोहनने विचारलं.

"डेट.. रतीबरोबर…७.३०.. ब्ल्यु डायमंड.. शुक्रवार…".. कबीर म्हणाला..

टिक टिक वाजते डोक्यात.. धडधड वाढते ठोक्यात.. अशी कबीरची अवस्था झाली होती.. धडधडत्या हृदयाला दीर्घ श्वास घेऊन त्याने शांत करायचा प्रयत्न केला आणि रतीचा नंबर फिरवला..

"हॅल्लो..", बराचवेळ रींग वाजल्यावर पलीकडून तो गोड.. अती गोड आवाज कबीरच्या कानावर पडला…

"रती?", कबीरने आपला आवाज शक्यतो स्थिर ठेवत विचारले..

"कोण बोलतेय?", रती..

"रती.. कबीर बोलतोय… माझं क्रेडीट कार्ड आलंय.. कधी भेटायचं?"

"डोन्ट टेल मी… तो ड्रॉ मी जिंकले…??", एखाद्या लहान मुलीला महागडी बार्बी-डॉल मिळाल्याच्या आनंदात रती म्हणाली..

"येस्स.. यु आर द विनर… शुक्रवारी संध्याकाळी, ७.३०,ब्ल्यु-डायमंड??"

“अम्मं.. ब्ल्यु डायमंड? नको.. त्यापेक्षा.. ‘पाशा’ला भेटुया? जे.डब्ल्यु.मेरीयॉट रुफ-टॉप?”

“चालेल.. कधी गेलो नाहीए मी तिथे.. पण चांगले रिव्ह्युज आहेत.. कधी?”, कबीर..

“परवाच शुक्रवारी? ७.३०?”

“डन..”, कबीर क्षणाचाही विलंब न करता म्हणाला..

“ओके.. भेटु मग...”, असं म्हणून रतीने फोन बंद केला..

आयुष्यात जणु पहील्यांदाच कुठल्यातरी मुलीशी बोलावं आणि डेट फ़िक्स व्हावी तसं कबीरला वाटत होतं.

शुक्रवारी साधारणपणे ७लाच कबीर मेरीयॉटला पोहोचला.

पोर्चमध्ये उभ्या असलेल्या महागड्या कार्स.. लॉबी सुटा-बुटातले कॉर्पोरेट्स, बिझीनेस मिट्ससाठी आलेले फॉरेनर्स, तोकड्या/ट्रेंडी कपड्यांमध्ये वावरणारे पार्टी-फ़्रिक्सने गजबजून गेली होती.

कबीरने घड्याळात नजर टाकली.. रतीला यायला किमान अर्धातास होता... कबीर इतक्या लवकर आल्याबद्दल स्वतःवरच चरफडला. जवळचेच मॅगझीन उचलून तो लॉबीतल्या सोफ्यावर विसावला. पाच-एक मिनीटंच झाली असतील तोच त्याचा फोन वाजला..

“हॅल्लो.. कबीर?”, पलिकडून एका स्त्रीचा आवाज आला..

“येस्स.. बोलतोय..”

“सर.. मी ब्ल्यु-डायमंड मधून बोलतेय.. तुमचं ७.३० ला बुकींग आहे ते कन्फ़र्म करायला फोन केला होता.. शिवाय रेड-वाईन आणि चॉकोलेट्सची व्यवस्थाही केलेली आहे...”

कबीरने स्वतःचीच जीभ चावली.. ब्ल्यु-डायमंडचं बुकींग रद्द करायचंच तो विसरला होता.. पण त्याहीपेक्षा त्याने मेरीयॉटमध्येही बुकींग केले नव्हते... मेहतांना त्यावेळीच त्याने कल्पना दिली असती, तर त्यांनी बुकिंग बदलली असती.. पण रतीच्या विचारात धांदरट झालेला कबीर पुर्णपणे हे विसरून गेला होता.

“अं..माफ़ करा.. आजचं बुकिंग रद्द होऊ शकेल का?”, कबीर दिलगीरीच्या स्वरात म्हणाला..

“एनी प्रॉब्लेम सर?”

“अं.. येस.. मला बिझीनेस मिटींगसाठी अचानक बाहेर-गावी जावं लागतंय.. सो शक्य असेल तर.. प्लिज.. ऑनेस्ट रिक्वेस्ट..”

“नो प्रॉब्लेम सर.. पण बुकींगचे पैसे रिफ़ंड नाही होणार..”

“नॉट अ प्रॉब्लेम..थॅंक्यु सो मच...”

एक काम झालं होतं.. आता मेरीयॉटला बुकींग करणं गरजेचं होतं. त्याने इकडे-तिकडे नजर टाकली.. समोरच रिसेप्शनचं मोठ्ठं डेस्क होतं. कानाल हेडफोन-माईक लावून एक मरून-रंगाची साडी घातलेली तरुणी फोनवर बोलत बसली होती. मधूनच ती सहकाऱ्यांना खाणा-खुणा करून कामांच नियोजन करत होती.

कबीर तडक रिसेप्शनपाशी गेला. त्या तरुणीचं फोनवरंच संभाषण होईपर्यंत तो थांबला आणि मग म्हणाला..

“अं.. मॅडम.. पाशाचं बुकींग करायचं आहे.. अ टेबल फ़ॉर टु..”.. आपलं स्पोर्ट्स जॅकेट निट करत तो म्हणाला..

“शुअर सर.. मे आय नो युअर गुड नेम?”, त्या तरुणीने विचारलं…

“कबीर…”

त्या तरुणीने एकवार त्याच्याकडे पाहीलं आणि मग संगणकावर काहीतरी टाईप करायला लागली.. आणि मग अचानक थांबुन परत कबीरला म्हणाली.. “सर.. देअर इज ऑलरेडी अ बुकिंग ऑन युअर नेम..”

“कसं शक्य आहे.. मी तर पुर्ण विसरून गेलो होतो.. कुणी केलंय बुकिंग?”, आश्चर्यचकीत होत कबीर म्हणाला..

“रतीच्या नावाने बुकींग दिसतं आहे सर..”

“ओह.. दॅट्स ग्रेट.. थॅंक गॉड…”

“सर तुम्ही वर जाऊ शकता.. टॉप फ्लोअर..”, कोपऱ्यातल्या लिफ़्ट्कडे बोट दाखवत ती तरुणी म्हणाली..

“थॅंक्स..”, असं म्हणून कबीर लिफ़्टकडे जाण्यासाठी वळला..

“ह्या हॉटेल्सवाल्यांना इतक्या सुंदर-सुंदर मुली मिळतात कुठुन..?” असा विचार त्याच्या मनात तरळून गेला आणि तो लिफ़्टमध्ये शिरला..

‘पाशा’ कबीरला वाटले होते त्याहीपेक्षा सुंदर होते. १६व्या मजल्यावरच्या टेरेसवर ‘पाशा’ सजवले होते. सर्वत्र पांढरे-शुभ्र सोफा आणि खुर्च्या विसावल्या होत्या. टेरेसच्या कोपर्‍यांत डेरेदार फांद्या असलेली झाडं लावलेली होती आणि त्या फांद्यांना रंगीत बॉटल्स लावलेल्या होत्या.. त्या बॉटल्समध्ये सोडलेल्या एल.ई.डी दिव्यांमुळे सर्वत्र मंद प्रकाश पसरलेला होता. त्या बाटल्या जणु अनेक काजवे सामावून घेतल्याप्रमाणे दिसत होत्या. आकाशात मस्त निळसर रंग पसरला होता. मंद इंन्स्ट्रुमेंटल संगीत वातावरणाची रंगत अजूनच वाढवत होता.

कबीरने घड्याळात पाहीले ७.२५ होऊन गेले होते. कबीरने काऊंटरवर चौकशी करून बुक केलेलं टेबल जाणून घेतलं आणि तो तेथे जाऊन बसला.

घड्याळाचा काटा इंचाइंचाने पुढे सरकत होता. कबीर जेथे बसला होता तेथून एंन्ट्रंन्स स्पष्ट दिसत होता.

७.३० वाजले तसा कबीर सावरून बसला. केसांतून हात फिरवून त्याने हेअर-स्टाईल ठिक केली आणि खुर्चीत रेलून तो रतीची वाट पाहु लागला.

७.३५...

७.४०...

७.४५ झाले तरीही रतीचा काहीच पत्ता नव्हता. तिला फोन करायची एक प्रबळ इच्छा त्याच्या मनात येऊन गेली पण अजून ५ मिनीटं वाट पहायचं ठरवून त्याने हाती घेतलेला फोन खाली ठेवून दिला.

कबीर कंटाळून ५ मिनीटं संपायची वाट बघत बसला होता. त्याचं लक्ष वेधलं गेलं ते लॉबी-मध्ये भेटलेल्या रिसेप्शनीस्टकडे. खाली असताना बांधलेले केस तिने आता मोकळे सोडले होते. मरून रंगाची ती साडी तिच्या कमनीय बांध्याला घट्ट बिलगून बसली होती. तिथल्या वेटर्सना काही-बाही कामं सांगण्यात ती मग्न होती. कबीर तिच्याकडे बघण्यात गुंग झाला होता.

अचानक तिने मागे वळून कबीरकडे बघीतलं.. बहुदा कबीर तिच्याकडे बघत होता हे तिला जाणवलं असावं.. तसा कबीर एकदम चपापला..

मिनीटभर त्या वेटरशी बोलून ती तरुणी वळाली आणि कबीर जिथे बसला होता तेथे येऊ लागली.

कबीरने तिच्याकडे लक्ष नाही असं दाखवून फोन उचलला आणि रतीचा नंबर फ़िरवणार इतक्यात ती तरुणी कबीरसमोर येऊन उभी राहीली..

आपण तिच्याकडे बघत होतो हे तिच्या लक्षात आलंय आणि आता आपल्याला उपदेशाचे डोस ऐकावे लागणार हे लक्षात येताच त्याचा घसा कोरडा पडला..

“सॉरी.. मला उशीर झाला थोडा…”, ती तरुणी कबीरकडे बघून हसत म्हणाली…

“एस्क्युज मी?”, गोंधळून कबीर म्हणाला..

“ओह.. सॉरी.. मी रती…”, आपला हात पुढे करत ती तरुणी म्हणाली..

“तू रती?”, कबीर अजूनही गोंधळलेलाच होता…

“हो.. का? अजून दुसरी कोणी येणार होती का?”

“नाही म्हणजे.. तू तेथे खाली…”

“मग? मी काम करते इथे.. नको होतं का करायला?”, मिस्कील हसत रती म्हणाली..

“नाही तसं काही नाही..”, कसंनुसं हसत कबीर म्हणाला..

“कबीर.. मी शेक-हॅन्डसाठी दोन मिनीटं झाली हात पुढे केलाय…”, आपले डोळे मोठ्ठे करत रती म्हणाली..

कबीरला आपल्या बावळटपणाचा रागच आला…

“ओह येस.. मी कबीर..”, तिच्याशी हातमिळवणी करत कबीर म्हणाला.. “प्लिज.. हॅव अ सिट..”

समोरची खुर्ची कबीरने हाताने मागे ओढुन तिला बसायची खुण केली..

रती काही बोलणार इतक्यात तिचा फोन वाजला..“एक्स्युज मी.. मला घ्यावा लागेल हा फोन.. जस्ट अ मिनीटं”, असं म्हणून तिने फोन घेतला.

ती फोनवर बोलण्यात मग्न होती तेंव्हा कबीरला तिला जवळून बघण्याचा चान्स मिळाला..

डोळयांना फिक्क्ट निळसर चंदेरी रंगाचे आयलायनर लाऊन स्मोकी-आईजच्या मेक-अप मुळे तिचे डोळे तिच्या चेहऱ्यावर आखीव-रेखीव भासत होते. ओठांना गुलाबी रंगाचं लिप्स्टीक, गालावर हलकेच केलेला ब्लश तिचे रुप अजूनच खुलवत होता. बोलता बोलता तिने आपले केस कानांच्या मागे सरकवले.

कबीर तिच्या लक्षात येऊ नये ह्याचा प्रयत्न करत तिच्याकडे बघण्यात गुंग झाला होता..

तिचा फोन संपल्यावर कबीर म्हणाला…”अभिनंदन, लकी-ड्रॉ साठी..”

“थँक्यु..”, मान किंचीतशी तिरपी खाली वाकवत रती म्हणाली

“अ‍ॅन्ड थँक्स टु मेहता.. त्यांच्यामुळे आपण आज पहिल्यांदा भेटतोय..”, कबीर

“पहील्यांदा? सो मिन कबीर.. आपण भेटलोय आधी…”, हसत हसत रती म्हणाली..

“काय? केंव्हा? कधी? काहीही काय?”, कबीर

“हो.. खरंच.. तुझं ते बुक-लॉंच होतं.. क्रॉसवर्डमध्ये.. मी आणि माझी मैत्रीण आलो होतो तेंव्हा.. तुझी सही असलेलं पुस्तक पण आहे माझ्याकडे..”, रती

“रिअली? पण तेंव्हा आपण काही बोललो होतो असं आठवत नाही..”

“हम्म.. खरं तर माझी मैत्रीण खुप म्हणत होती मला बोल बोल म्हणून.. पण अरे, खरं तर मी थोडी शाय-टाईप्स आहे.. म्हणजे तेंव्हा तरी होते जरा जास्तच.. आता इथे रिसेप्शनला जॉब घेतल्यापासून जरा जास्तच बडबडी झालेय मी..”, रती म्हणाली..

“मग तर फ़ारच छान.. मला बडबडी लोकं खुप आवडतात.. आज आपल्याकडे खुप वेळ आहे.. सो…”

“बघ हं.. कंटाळशील.. म्हणशील.. कित्ती बोलते ही…”

“बघुच कोण पहीलं कंटाळतं ते…”, कबीर हसत हसत म्हणाला..

“हरकत नाही.. ॲपीटायजर ऑर्डर करु आधी..”, असं म्हणून रतीने वेटरला हात केला..

कबीर आणि रती त्या रोमॅन्टीक वातावरणात एकमेकांशी गप्पा मारण्यात मग्न होते तेंव्हा राधा इंटरनॅशनल-एअरपोर्टवर टुर-ऑपरेटर म्हणून आपल्या पहील्या-वहील्या असाईनमेंटसाठी एअर-इटलीची वाट बघत उभी होती.. तर रोहन..

रोहनबद्दल नंतर कधीतरी, सध्यातरी फ़क्त आणि फक्त रती आणि कबीरच…

कबीर मेन्यु-कार्ड बघण्यात मग्न होता तेंव्हा त्याच्या समोर एक नेपाळी किंवा तत्सम दिसणारी एक मुलगी येऊन उभी राहीली. तिच्या हातामध्ये पिवळयाधम्मक लिली फुलांचा एक मोठ्ठा गुच्छ होता.

कबीरने प्रश्नार्थक नजरेने रतीकडे बघीतलं.

रती हसत उभी राहीली आणि तिने तो गुच्छ त्या मुलीकडून घेऊन कबीरच्या पुढे धरला.. “हे घे.. तुझ्यासाठी…”

“अगं गेस्ट तू आहेस, मी नाही..”, उठून उभं रहात कबीर म्हणाला..

“घे रे.. एका मोठ्या लेखकाला भेटतेय.. एव्हढं तर करायलाच हवं ना?”

“ओहो… मोठ्ठा लेखक म्हणे… थॅंक्स.. मस्त आहेत फुलं..”, आधी रतीकडे आणि मग त्या मुलीकडे बघत कबीर म्हणाला..

“थॅंक्यु सर..मॅडमने सांगीतलं होतं, फुलं चांगलीच हवीत.. आजचा स्पेशल डे आहे…”, ती मुलगी हसत हसत म्हणाली..

“हॅना…ssss”, डोळे मोठ्ठे करून रती तिला म्हणाली..

“.. आणि मॅडम असं पण म्हणाल्या की सर्व्हीस निट हवीय आणि कुणाचा डिस्टर्बन्स नकोय…”, हॅना म्हणाली..

“ए.. गधडे, चोमडे, मॅडम काय गं? जा तुझी कामं कर, शिफ़्ट संपली नाहीए तुझी.. बघते तुला उद्या…”

“ओके मॅडम…”

“आणि सॅमला पाठव, अ‍ॅपीटायझर्स ऑर्डर करायची आहेत…”

“तुझ्याबरोबरच असते का हॅना?”, ती गेल्यावर कबीर म्हणाला..

“हो.. आम्ही एकत्रच जॉईन झालो इथे.. एक वर्ष झालं आता…पण..फ़ारच बडबड करत होती आज…. बघतेच तिला आता उद्या…” काहीसं फणकारून रती म्हणाली

“ए, पण रिअल्ली थॅंक्स फ़ॉर द फ्लॉवर्स..”, कबीर फुलांना न्याहाळत म्हणाला..

एव्हढ्यात वेटर ऑर्डर घ्यायला आला…

“ड्रिंक्स मध्ये काय घेणार?”, कबीरने रतीला विचारले..

“सॉरी.. मी ड्रिंक्स घेत नाही..”,रती म्हणाली..

“रिअल्ली?”

“हम्म.. पण तू कर ऑर्डर…”

“प्लिज.. एका सुंदर मुलीसमोर बसून एकटा दारु ढोसण्याइतपत मी बेवडा नाहीए, आणि तेव्हढे संस्कार आहेत अजून माझ्यावर.. तू नाही तर मी पण नाही..”

दोघांनी मिळून पुढची ऑर्डर दिली आणि मग रती म्हणाली.. “सो पुस्तकाबद्दल आपण बोलत होतो… आपण कुठे होतो?”

“आपण बॉबी बद्दल बोलत होतो..”, कबीर

“बॉबी..”

“हम्म.. तू तो डायलॉग मारलास ना..प्यार मै सौदा वगैरे.. तिथे..”

“ओह हा…आठवलं..”

“एक मिनीट, पण त्याआधी, मला जाणून घ्यायचं आहे.. लकी ड्रॉची विनर कोण आहे? कशी आहे? मला तुझ्याबद्दल काहीच माहीत नाही..”, कबीर तिला थांबवत म्हणाला “अम्म.. मी कशी आहे! एका वाक्यात सांगायचं तर ‘खुद की फेव्हरेट हुं!”, थोडीशी स्वप्नाळू आहे, स्वप्न बघायला खुप आवडतात, सिनेमे बघायला, पुस्तक वाचायला आवडतात… प्रेमावर गाढ विश्वास आहे.. कधी अजून कुणाच्या रिअल-लाईफ़मध्ये प्रेमात नाही पडले.. पण जेंव्हा पडेन तेंव्हा त्यानेच प्रपोज करावं वगैरे जुनाट विचार बाजुला सारून सरळ प्रप्रोज करेन.. किंबहुना.. मला प्रपोज करायला मिळावं ही एकमेव अपेक्षा मला प्रेमाच्या बाबतीत आयुष्याकडून आहे.. अम्म.. करीअर वगैरे फ़ारसं मला भावत नाही.. त्यापेक्षा मस्त लग्न करून संसार थाटायला मला खुप आवडेल.. ज्याच्याशी मी लग्न करेन ना कबीर.. तो खरंच खुप लक्की असेल.. खुप छान घर सांभाळेन मी त्याचं. इथे हॉटेलमध्ये कधी कधी जास्त वेळ थांबुन इथल्या शेफ कडून मी स्वयंपाकही शिकतेय.. आय डोंन्ट ड्रिंक.. आय डोंन्ट स्मोक.. मी एकदम परफ़ेक्ट हाऊसवाईफ़ असेन…”

रती स्वतःबद्दल भरभरून बोलत होती, आणि कबीर मंत्रमुग्ध होऊन ऐकत होता.

“थोडक्यात सांगायचं ना.. तर तुझ्या पुस्तकातल्या त्या मीराच्या अगदी विरुध्द आहे मी. स्वतःच्या नवऱ्याला सोडून, सारखं स्वातंत्र्य स्वातंत्र्य हवंय म्हणून स्वातंत्र्य मिळत नसतं.. नातेवाईकांच्या गोतावळयात, स्वतःच्या मुलांबरोबर, नवऱ्याबरोबरही आपण आपलं स्वातंत्र्य जपु शकतो..”

“एक्स्झाक्टली..”, कबीर एक्साईट होऊन म्हणाला.. अचानक रतीने कबीरच्या डोळयात डोळे घालून बघीतलं आणि म्हणाली.. “कबीर.. तुझं हे पुस्तक.. सत्य घटनांवर आधारित आहे ना? कदाचित.. तुझ्याच आयुष्यात घडून गेलेल्या?”

रतीच्या त्या प्रश्नाने कबीर पुरता गोंधळून गेला.. त्याला काय बोलावं तेच सुचेना..”असेलही.. कदाचित नसेलही..”, शब्दांची जुळवाजुळव करत तो म्हणाला..

“मला माहीते कबीर.. मीरा सोडून गेल्याचं दुःख तुझ्या चेहऱ्यावर स्पष्ट दिसतं आहे.. पुस्तकाचा शेवट जेथे झाला त्यानंतर पुढे काही घडलं का नाही, ते मला माहीत नाही.. पण मीरा तुझ्या आयुष्यात नाहीए हे नक्की.. हो ना?”

“काहीही हं रती..”, कबीर ओढुन ताणून हसत म्हणाला.. “मी एक लेखक आहे.. आणि लेखकाने लिहीलेली प्रत्येक गोष्ट त्याच्या आयुष्यात घडलेली असेलच असं काही नाही..”

“प्रत्येक गोष्ट नक्कीच नाही..पण ही असेल असं समहाऊ मला वाटतंय.. आणि म्हणूनच तू अजूनही मीराला शोधतो आहेस.. कदाचित ती इथे नसेल तर तिला इतरांमध्ये.. कदाचित माझ्यामध्येही शोधत असशील…हो ना?”

वेटर ऑर्डर घेऊन आला तसा तो प्रश्न तेथेच अर्धवट राहीला..

“एनीवेज.. माझं सोड.. आपण पुस्तकाबद्दल बोलुयात?”, ऑर्डर टेबलावर मांडून वेटर निघून गेल्यावर कबीर म्हणाला..

“जशी तुझी इच्छा, तुला तुझं वैयक्तीक आयुष्य, तुझी प्रायव्हसी जपायचा पुर्ण अधीकार आहे..”

“हम्म…”, आपल्या प्लेटमध्ये ऑर्डर वाढुन घेत कबीर म्हणाला..

“मग.. तू पुढच्या पार्टवर काम सुरु केलंस?”, काही वेळ शांततेत खाल्यावर रती म्हणाली

“तसा थोडा विचार केलेला आहे.. पण अजून लिहायला अशी सुरुवात केली नाही.. तुला काय वाटतं? काय व्हायला हवं पुढे?”

“अम्म.. म्हणजे कथेचा जो नायक आहे.. त्याबद्दल पुर्ण माहीती नाही पुस्तकात.. म्हणजे हे बघ.. शेवटी आपल्या भारतीय संस्कृतीत.. प्रेम जमलं की त्याच्या शेवट बहुतांशी लग्नातच होतो.. कथेच्या नायकाची मीराकडून तिच अपेक्षा आहे का? पुस्तकात म्हणल्याप्रमाणे मीराचे आधी लग्न झालेले आहे.. नायक ह्यासाठी तयार आहे का? त्याच्या घरचे हे लग्न मान्य करणार आहेत का?”

“नुसतं इतकंच नाही.. अजूनही असे अनेक प्रश्न अनुत्तरीत आहेत..”, कबीर स्वतःशीच बडबडला..

“दुसरी गोष्ट त्याच्या पहील्या गर्ल-फ्रेंडशी असलेलं त्यांच नात तुटलं.. जरी ते नातं, तिने तोडलं असलं तरी तू म्हणल्याप्रमाणे तिचं वागणं, तिची लाईफ़-स्टाईल आपल्या नायकालाही पटत नव्हतीच ना.. मग मीराचे हे स्वच्छंदी वागणं तो मान्य करेल.. तिच्याशी जुळवून घेऊ शकेल?”

“आणि मीराचं काय? म्हणजे ती जर नायकाचं प्रेम ती स्विकारत नसेल तर नायकाने काय करावं?”, कबीर

“तू लेखक आहेस.. तुला माहीती पाहीजे..”, हसत रती म्हणाली...

“हो म्हणजे.. तुझं काय मत आहे?”

“अम्म.. मला वाटतं तिच्या पहील्या लग्नात ती दुखावली गेली आहे.. तिचा नात्यांवरचा, प्रेमावरचा विश्वास काहीसा ढासळला आहे.. मला वाटतं नायकाने तिला थोडी मोकळीक द्यावी. तो जितका तिच्या जवळ जायचा प्रयत्न करेल तितकी ती दुरावत जाईल. जर तिच्या मनात सुध्दा प्रेम असेल तर आज ना उद्या तिला ह्याची नक्की जाणीव होईल...”

“तुला वाटतं असं...?”, कबीर

रती बराच वेळ कबीरचा चेहरा वाचण्याचा प्रयत्न करत होती. कबीरला ते असह्य झालं आणि त्याने नजर दुसरीकडे वळवली.

नंतरचा वेळ मात्र त्यांनी पुस्तक सोडून इतर विषयांवर गप्पा मारण्यात घालवला. मीराचा विषय निघाल्यावर कबीर काहीसा अपसेट झाला होता हे रतीने ताडले आणि मग तिनेच विषय बदलला. तिच्या मनमोकळया स्वभावाने कबीर पुन्हा जुनं विसरून तिच्या गप्पांमध्ये सामील झाला.

थोड्या-थोड्यावेळाने कोण-ना-कोणतरी सतत येऊन काही कमी नाही ना ह्याची खात्री करून जात होते. रतीनेच खरं तर ती संध्याकाळ कबीरसाठी स्पेशल बनवली होती. शेवटी बिल भरून झाल्यावर दोघंही बाहेर पडले.

“आता परत कामं? का आता घरी?”, कबीरने विचारलं.

“नाही आता घरी..”

“सोडु का घरी? कशी जाणारेस?”, कबीर

“माझी नॅनो आहे ना..”

“नॅनो..??”

“हो..का? चांगली आहे गाडी…”

दोघं गेटपाशीच गप्पा मारत उभे होते तोच कबीरच लक्ष गेटच्याच थोडं पुढे एका गडद-निळसर रंगाचा ब्लेझर, हातात फुल घेऊन उभ्या असलेल्या तरुणाकडे गेले आणि तो म्हणाला…”रोहन.. तु? इथे?”

कबीरला इथे बघताच रोहन पुरता गोंधळून गेला.. काय करावं हे न समजून तो जागच्या जागीच थिजून उभा राहीला..

“कबीर.. तु? तू तर ब्ल्यु-डायमंडला जाणार होतास ना?”

एव्हाना रतीपण तिथे येऊन थांबली.

कबीरने रतीची आणि रोहनची ओळख करून दिली.

“हो अरे.. पणे हिने ऐन वेळी बदलले.. पण तू काय करतो आहेस इथे.. आणि हातात फुलं वगैरे.. कोणी येणार आहे की काय?”, डोळे मिचकावत कबीर म्हणाला..

“हो म्हणजे.. नाही..”

“अरे असा बावचळल्यासारखा काय वागतो आहेस.. आहे तर आहे.. त्यात काय एव्हढं? माझ्यापासून लपवत होतास ना.. पकडला कि नाही?”

“नाही रे.. अगदीच तसं काही नाही..”

“नाही कसं.. त्या दिवशीच मी राधाला म्हणालो होतो.. तू रात्री दीडवाजता ऑनलाईन दिसलास तेंव्हा.. कुछ तो गडबड है..”

“बरं, चल मी निघतो.. आत जातो आता..”

“अरे थांब.. जरा मला तरी बघु देत कोण आहे ती..”

“तुला काय बघायचंय.. तुला माहीते कोण आहे ती...”

“कबीर.. तु? इथे?”, कबीर पुढे काही बोलणार इतक्यात मागून परीचीत आवाज आला..

कबीरने वळून मागे बघीतले...त्याच्या समोर मोनिका उभी होती..

“ओह माय गॉड…”, कपाळाला हात लावत हसत कबीर म्हणाला.. “केंव्हापासून चालु आहे हे…”

“कबीर.. प्लिज. चिडू नकोस.. ऐक..”, रोहन समजावणीच्या स्वरात म्हणाला..

“ए.. अरे चिडलो वगैरे नाहिए मी..आय एम रिअल्ली हॅपी फ़ॉर बोथ ऑफ़ यु…गो ऑन.. एन्जॉय.. तुमची संध्याकाळ आहे.. जा वेळ नका घालवु..”

“कबीर.. चिडला नाहीस ना…”,मोनिका

“वेडी आहेस का? मी कश्याला चिडू.. तुझं आयुष्य जगण्यास तू मोकळी आहेस.. रोहन खुप चांगला मुलगा आहे…जा पळा पट्कन…”, कबीर..

“आपण नंतर बोलु ह्या विषयावर..”, रोहन कबीरला म्हणाला आणि दोघंही बाय करून निघून गेले.

कबीर दोघंही नजरेआड होईपर्यंत त्यांच्याकडे बघत उभा होता.. बऱ्याचवेळानंतर त्याला रती अजूनही बरोबर असल्याची जाणीव झाली.. त्याने स्वतःला सावरले..

“इफ़ आय एम नॉट रॉंग.. मोनिका तुझी एक्स-गर्लफ्रेंड राईट?”, रती म्हणाली..

“हम्म..”, काहीसं थांबुन कबीर म्हणाला..

“हम्म.. जसं पुस्तकात लिहीलं आहे तसं.. आणि जर तुझी एक्स-गर्लफ्रेंड आहे.. तर मीरा पण आहे… हो ना…”

कबीरला खोटं बोलण्याचा काहीच मार्ग सापडेना.. त्याने काही न बोलता.. नुसती मान हलवली…

“आणि लास्ट-बट-नॉट-द-लिस्ट.. ही राधा.. म्हणजेच मीरा.. हो ना?”

कबीर जमीनीकडे बघत उभा होता.. म्हणून किंचीत कमरेत खाली वाकून रतीने त्याच्या चेहऱ्याकडे बघत विचारलं…

कबीरच्या मनात असंख्य भावनांचा कल्लोळ उडाला होता..राधा कुठे होती हे त्यालाच ठाऊक नव्हते.. आणि मोनिका आता ऑफ़ीशीअली त्याच्या आयुष्यातून निघून गेली होती. असं नाही की.. त्याला मोनिका त्याच्या आयुष्यात परत हवी होती.. पण तरीही.. काही क्षणापर्यंत त्याची होती… रोहनबरोबर तिला पाहून त्याला पहील्यांदा आपल्या एकटेपणाची जाणीव झाली…

“शुड वुई जस्ट से बाय?”, खालीच बघत कबीर म्हणाला..

“हम्म.. ओके.. पण मला परत भेटायचंय तुला.. भेटशील?”

“ओके..”

“बाय देन.. टेक केअर कबीर..”, रती म्हणाली..

कबीर काही न बोलता माघारी वळला….

“काय रोहन शेठ.. कशी होती कालची संध्याकाळ?”, रोहन ऑफ़ीसला येताच कबीर म्हणाला..

“मस्त.. कबीर.. तू खरंच चिडला नाहीस ना?”, रोहन

“नाही अरे.. मी का चिडु? खरंच मला आनंद झाला.. तुम्ही दोघंही अनुरुप आहात एकमेकांना..”

“आम्ही ठरवलं होतं तुला सांगायचं.. पण समहाऊ योग्य अशी वेळच मिळत नव्हती..”

“असु दे अरे.. तुम्ही दोघं खुश आहात ना.. मग झालं…”

“बरं आमचं जाऊ देत.. तुझं बोल.. तुझी संध्याकाळही चांगली गेलेली दिसतेय.. ती बरोबरची छानच होती.. रती ना?”, रोहन

“हम्मं.. खरंच छान आहे अरे ती.. इतकी मस्त बोलते ना.. खरं तर तिनेच माझी संध्याकाळ छान बनवली..”, असं म्हणून कबीरने त्या संध्याकाळबद्दल रोहनला सांगीतलं..

“तुला आवडलीय ती .. हो ना?”, कबीरकडे बघत रोहन म्हणाला..

“मला काय.. मला सगळ्याच आवडतात…”, कसंनुसं हसत कबीर म्हणाला..”पण खरंच, कुणालाही आवडावी अशीच आहे ती…”

“मग कसली वाट बघतो आहेस.. हो पुढे बिनधास्त.. राधाला विसरून जा.. तिने तिच्या आयुष्याचा मार्ग निवडला आहे.. आणि तिचा आणि तुझा मार्ग कधी एकच असेल असं मला तरी वाटत नाही..”

“हो रे.. पण राधा जातच नाही मनातून.. काय करु…?”

“थोडा मिक्स हो लोकांमध्ये.. रतीशी संपर्क वाढव.. राधा म्हणजे जग नव्हे.. जग खुप सुंदर आहे कबीर.. आज प्रेमात पडल्यावर माझ्या हे लक्षात आलेय.. इथे कोणी कुणासाठी थांबत नसतं..”

“खरं आहे.. रती म्हणाली आहे तसंही.. पुन्हा भेटुया...”

“अरे व्वा.. ए मग एक भारी आयडीया आहे.. लेट्स हॅव अ डबल-डेट..”, खुर्चीतून आनंदाने उठत रोहन म्हणाला..

“म्हणजे?”

“अरे म्हणजे.. मी-मोनिका.. तू आणि रती.. मस्त जाऊ ना एखाद्या छानश्या रेस्तॉरंटला.. मज्जा येईल...”

“चालेल भेटुया.. पण रतीला असं एकदम विचारणं बरोबर दिसणार नाही.. मी तिला आधी इनफॉर्मली भेटतो.. आणि मग तेंव्हा विचारेन..”

“डन देन.. सांग मग कधी.. कुठे ते...”

कबीरला वाटलं होतं, रती फोन करेल, पण ४ दिवस वाट पाहुनही तिचा फोन नाही आला.. शेवटी कबीरनेच तिला फोन लावला..

“हाSSSSSय कबीर...कसा आहेस??”,रती म्हणाली..

रतीच्या आवाजामध्ये एक फ्रेशनेस होता.. उत्साहाचा खळाळता झरा होता...

“मी मस्त...कुठे गायब आहेस..?”, कबीर

“मी कुठे गायब.. तुच गायब आहेस.. म्हणलं आज फोन करशील.. उद्या करशील..”

“हो का? बरं बरं.. सांग कधी भेटुया?”

“कश्याला?”

रतीच्या प्रश्नाने कबीर एकदम स्टंप्ड झाला..

“ओके ओके.. सॉरी.. मस्करी केली रे.. मी संध्याकाळी ७.३० नंतर मोकळी होते.. उद्या भेटुया?”

“चालेल.. पण पाशा नको.. ह्यावेळेस माझं कार्ड-पेमेंट असेल.. परवडणार नाही पाशा..”, हसत हसत कबीर म्हणाला..

“बरं..तसं असेल तर मग मला थोडा उशीर होईल..”

“का?”

“का काय अरे.. मी साडी घालून येऊ का तुझ्याबरोबर दुसरीकडे.. इथे पाशामध्ये चाललं असतं..”

“ओके.. ९.३०?”

“१० ला भेटु.. हायवे वर रंगला-पंजाब नावाचा ढाबा आहे.. मस्त असतं पंजाबी.. आणि उशीराच सुरु होतो तो.. चालेल?”

“पळेल.. भेटु उद्या..”

“बाSSSSSय…”

फोन ठेवल्यावर कबीर स्वतःशीच विचार करत होता.. किती सहज एकरुप झालो आपण हिच्याशी.. असं वाटतंय खुप वर्षांपासूनची ओळख आहे..हिच्याशी बोलायला लागलं की सगळं टेन्शन खल्लास होऊन जातं. असं खुप स्पेशल वाटतं… रोहनच्या म्हणण्याचा विचार

करावा का? राधाला विसरून... पण रतीबद्दल तरी काय माहीती आहे आपल्याला? कश्यावरून ती सिंगल असेल? कदाचित असेलही तिच्या आयुष्यात कोणी. पण मग तसं असतं तर ती बाहेर जेवायला यायला लगेच तयार झाली नसती.. कदाचित आढे-वेढे घेतले असते..

शट्ट.. एक गोष्ट कधी सरळ घडत नाही आपल्या आयुष्यात..

कबीर स्वतःवरच चरफडला..

रंगला पंजाब ढाबाच्या थिमनी सजलेलं एक रेस्तॉं होते. कबीर नेहमीच्याच वापरातले कपडे घालून आला होता.. निळया रंगाची जिन्स आणि पांढऱ्या रंगाचा शर्ट. तर रतीसुध्दा नेहमीच्याच पेहेरावात होती. गुलाबी रंगाची स्लॅक, गुलाबी रंगाच्याच फ्लॉवरी प्रिंटेड पॅटर्नचा स्लिव्हलेस कुर्ता, केसांना गुलाबी रंगाची रिबिन आणि हातात भरपुर बांगड्या.

“हॅल्लो..” दोघांनी एकमेकांना ग्रीट केलं

“टेबल घ्यायचं? का ह्या बाहेर मांडलेल्या कॉट्स?”, कबीरने विचारलं

“कॉट्स.. एनीटाईम.. टेबलवार तर आपण नेहमीच जेवतो..”, गार्डनमधल्या एका कॉटवर बसकण मारत रती म्हणाली..

“आधी ऑर्डर करु आणि मग गप्पा मारु.. खुप भुक लागलीय...”, कबीर मेन्युकार्ड चाळत म्हणाला..

“एस्क्युज मी.. लिकर-चं कार्ड...”, वेटरला हात करत कबीर म्हणाला..

“ए.. लिकर काय.. त्यापेक्षा जलजीरा घेऊ.. अरे फार मस्त मिळतं.. भारी चॅट-मसाला आणि खारी बुंदी वगैरे टाकून देतात..”, कबीरला थांबवत रती म्हणाली..

कबीरला रतीचं मनातल्या मनात हसूच आलं. आयुष्यात कधी ड्रिंक्स म्हणून आपण जलजीरा घेऊ असं स्वप्नात देखील वाटलं नव्हतं, पण रतीखातर त्याने ते मान्य केलं. बाकीची ऑर्डर देऊन झाल्यावर रती म्हणाली..

“कबीर.. तुला काहीतरी दाखवायचं होतं…”

“हम्म.. दाखवं की..”

“चिडणार नाहीस ना?”, पर्सध्ये हात घालत रतीने विचारलं..

“ते काय आहे त्यावर अवलंबुन आहे..”,हसत हसत कबीर म्हणाला.

रतीने पर्समधून कबीरचेच पुस्तक बाहेर काढले..

“हे काय? माझंच पुस्तक काय मला दाखवतेस…”, कबीर आश्चर्याने म्हणाला.. “अरे एक मिनिटं.. हे बघ..”, पुस्तक उलट करून मागचं पान दाखवत रती म्हणाली

कबीरने उत्सुकतेने पुस्तकाच्या मागच्या पानावर नजर टाकली. जिथे त्याचा फोटो छापला होता तो भाग रती त्याला दाखवत होती. रतीने त्या फोटोला पेनने दाढी-मिश्या काढल्या होत्या..

“हे काय? ऑफ़ीसमध्ये वेळ जात नव्हता म्हणून असले उद्योग करतेस का तु?” “अरे.. चं.. निट बघ ना.. छान दिसतेय तुला दाढी.. म्हणजे अशी फ़ार नाही.. पण थोडी खुरटी.. मस्त रफ़ लुक दिसेल की तुला…”, रती पुन्हा फोटोकडे बोट दाखवत म्हणाली

रतीने त्याचा.. त्याच्या लुकचा विचार केला हा विचारच कबीरला सुखावणारा होता..

“खरं का?” आपल्या हनुवटीवरून हात फिरवत कबीर म्हणाला “हे बघ.. तसंही तुझा ब्रेक-अप झालाय नं.. मग असा ब्रेक-अप झाल्यावर लुक चेंज करायचा असतो अरे..आणि अशी दाढी वगैरे तर म्हणजे अगदीच साजेसा होईल..”

कबीर काहीच बोलला नाही..

“ओके सॉरी.. तू हर्ट झाला असशील तर.. पण मी ही अशीच आहे.. प्रत्येक गोष्टीत काहीतरी पॉझीटीव्ह शोधणारी.. एकदम ऑप्टीमिस्टीक.. बरं ब्रेक-अपचं जाऊ देत.. पण खरंच चांगली दिसेल तुला थोडी-खुरटी दाढी.. ट्राय तर करून बघ..”, रती समजावणीच्या स्वरात म्हणाली.

“बरं बघु.. मी पण तुझ्यासाठी काही तरी आणलंय..”,खिश्यातून एक छोटी डब्बी काढत कबीर म्हणाला..

“अरे व्वा.. सुधारलास की.. मी म्हणलं मागच्या वेळेसारखा हात हलवतच येतोस की काय?”, त्याच्या हातातून ती ड्बी घेत रती म्हणाली..

रती ती डबी उघडत असताना कबीर तिच्याकडे निरखुन बघत होता.. एखाद्या निरागस मुलीसारखी प्रचंड उत्सुकता तिच्या चेहऱ्यावर होती. क्षणाक्षणाला तिच्या चेहऱ्यावरचे भाव बदलत होते..

रतीने ती डबी उघडली.. आतमध्ये केशरी आणि मोरपंखी रंगाच्या शेड्सचे दोन नेलपेंट्स होते…

“वॉव.. मिक्स-ॲन्ड मॅच.. लव्ह्ड इट…”, रती दोन्ही रंग निरखुन बघत म्हणाली “तू आणलेस?”

“म्हणजे काय?”

“म्हणजे.. तू दुकानात जाऊन आणलेस.. आपले आपले..?”

“हो.. सेंन्ट्रलला गेलो होतो.. तिथून आणलेत..बिल दाखवु का???” “नको नको.. राहु देत.. ए पण मस्तच आहेत…”

दोघांच्या गप्पा चालु असतानाच ऑर्डर आली…

टेबलावर खाणं मांडून वेटर गेल्यावर रती म्हणाली.. "कबीर मला मोनिका.. आणि राधा दोघींबद्दल ऐकायचं आहे.. सांग ना मला सगळं…"

"का? तुला का सांगु मी?", कबीर

"म्हणजे काय.. तुझ्या पुस्तकातली पात्र आहेत ती.. आणि मी ती कॉन्टेस्ट-विनर आहे.. त्या दिवशी आपलं बोलणं पुर्ण झालं नाही.. मला अजून जाणून घ्यायचं आहे त्या दोघींबद्दल.. म्हणजे रिअल-लाईफ़मध्ये त्या दोघी कश्या आहेत.. अगदी पुस्तकात लिहीले आहे तसेच का?"
"ओय.. झालं ती पार्टी संपली तिथेच.. आता कसलं विनर आणि कसलं काय? तेंव्हाच विचारायचं होतंस.."

"फटके देईन हा कबीर.. नाटकं करु नकोस.. निट सांग पहील्यापासून.. खाऊन देणार नाही नाहीतर मी तुला…", डोळे मोठ्ठे करत रती म्हणाली…

"ओके.. ओके.. सांगतो…" असं म्हणून कबीरने मोनिकाच्या भेटीपासून सगळं सांगायला सुरुवात केली

इटलीमधील नेपल्सच्या एअरपोर्टवर राधाने पाय ठेवला तेंव्हा ती प्रचंड रोमांचीत झाली होती. गेले काही महीने.. किंबहुना काही वर्ष तिच्यासाठी वाईटच ठरली होती. अनुरागशी लग्न झाल्यानंतर काही महीन्यातच तिच्या स्वप्नांचा चक्काचुर झाला होता. गोकर्णमधून ती थोडक्यात वाचली होती, त्यावेळेस अनुरागची आणि नंतर कबीरची मदत

झाली नसती तर ती एव्हाना एकतर पोलिस-स्टेशनमध्ये किंवा पोलिस-स्टेशनच्या चकरा मारण्यात अडकली असती.

पण ह्या सगळयांतून जाउन राधा आता सावरली होती.. स्वतःच्या पायावर उभी राहु पहात होती. मोठ्या कष्टाने तिने स्वतःसाठी नोकरी.. करीअरचा मार्ग निवडला होता. आपला आनंद कुणाजवळतरी व्यक्त करावा असं तिला राहून राहून वाटत होतं. लगेज चेकआऊट करून बाहेर आल्यानंतर तिने फोनमधील कॉन्टॅक्ट्सवरून नजर फिरवली. परंतू कुणाला फोन करावा असं तिला कुणी सापडतचं नव्हते. आई-बाबा, अनुराग, जवळचे मित्र-मैत्रीणी सगळयांनीच तिच्याशी संबंध तोडून टाकले होते. कॉन्टॅक्ट्स स्क्रोल करताना ती कबीरपाशी येऊन थांबली.

गोकर्णवरून परतल्यानंतर तिने कबीरला फोनच केला नव्हता आणि त्याने सुध्दा परत संपर्क करण्याचा प्रयत्न केला नव्हता. नविन नोकरी.. इटलीचा व्हिसा आणि आता नेपल्समध्ये प्रवेश ह्याबद्दल तिने कबीरला काहीच सांगीतले नव्हते.

कंपनीने राधाला फोनवर इंटरनॅशनल-रोमींग चालु करून दिले होतेच, शिवाय फॅमीलीसाठी काही फोन मोफ़त करण्याची सुविधाही दिली होती.

तिने घड्याळात नजर टाकली, इटलीतील वेळेनुसार संध्याकाळचे सात वाजले होते, त्यानुसार भारतात साधारण रात्रीचे १०.३० वाजून गेले असतील असा तिने विचार केला.

“काय करत असेल कबीर? करावा का त्याला फोन..? आपण इटलीतून फोन करतो आहोत हे मोठ्ठे सरप्राईज असेल? की मी फोन केला हेच त्याच्यासाठी सर्प्राईज असेल?” शेवटी ‘दोन मिनिटं बोलायला काय हरकत आहे.. नसेल मोकळा तो तर नाही घेणार फोन…’ असा विचार करून राधाने मोबाईलवर कबीरचा नंबर लावला..

“पण मग आता राधा आहे कुठे सध्या?”, कबीरचे बोलून झाल्यावर रतीने विचारले कबीर काही बोलणार एव्हढ्यात त्याचा फोन वाजला..

“नेम द एन्जल ॲन्ड एन्जल ॲपीअर्स…”, मोबाईल रतीला दाखवत कबीर म्हणाला..

राधाचा फोन बघून रतीच्या चेहऱ्यावरील क्षणभरासाठी का होईना बदललेले भाव कबीरने टिपले.

“घे ना फोन..”, रती म्हणाली

“नको.. जाऊ देत..”, कबीर फोन सायलंट मोडवर करून परत खिश्यात ठेवत म्हणाला..

“का? अरे घे.. एक महीन्याने फोन करतेय ना ती..”

“म्हणूनच नको.. आज आपली डेट..” आणि कबीर एकदम थांबला..

“ओह.. ही डेट होती का?”, काहीसं हसत रती म्हणाली…

“दॅट रिमाईंड्स मी.. रोहन म्हणत होता की आपण चौघ भेटुयात कुठेतरी.. म्हणजे आपण दोघं आणि तो आणि मोनिका.. व्हॉट से?”

“अं.. रोहन म्हणतोय ना.. मग मी रोहनला सांगते हो की नाही ते.. “, पुन्हा एकदा हसत रती म्हणाली..

“तू काय नेहमी माझी खेचायलाच बसलेली असतेस का? बर मी विचारतोय तुला.. जायचं का?”, कबीर खजील होत म्हणाला..

“मला चालेल… पण मी दोघांनाही फारसं ओळखत नाही रे.. एक काम कर ना, व्हॉट्स-ॲपवर एक ग्रुप बनव आपला चौघांचा.. म्हणजे जरा ओळखपण होईल..”

“वोक्के… चल निघुयात?”

“चलो…”

दोघंही बिल भरून हॉटेलमधून बाहेर पडले..

कबीरच्या फोनवर राधाचा चार मिस्ड-कॉलनंतर पाचव्यांदा फोन वाजत होता.

“काय म्हणतेय तुझी कोका-कोला गर्ल?”, रोहनने ऑफिस मध्ये येताच कबीराला विचारले

“कोका-कोला गर्ल?”

“अरे तिच रे ती, त्या दिवशी तुझ्याबरोबर होती ती”

“कोण? रती का?”

“हां , रती”

“मग कोका-कोला गर्ल काय?”,

“अरे तू ती कोका-कोलाची जाहिरात नाही पाहिलीस का? सिद्धार्थ मल्होत्रा वाली.. त्यातली ती काउंटरवरची मुलगी, रती अगदी तशीच दिसते की”, रोहन
“हो रे… तरीच मी विचार करत होतो, कुठे तेरी बघितल्यासारखे वाटतेय हिला”

“बरं बोल, विचारलस का तिला? भेटायला तयार आहे का ती?”

“हो, हो विचारलं ना, पुढच्या विकेंडला चालेल म्हणाली.. आपण संध्याकाळी भेटू शकतो”

“लै भारी, मी लग्गेच मोनिकाला सांगतो, खूप मज्जा येईल आपण सगळे भेटलो की…”,

“अरे पण मग तू एव्हढा उदास का?”

“रतीचा बॉयफ्रेंड आहे….”, रोहनची नजर टाळत कबीर म्हणाला.

“कोण म्हणलं?”

“तिच म्हणाली स्वतः.. ती म्हणाली की जनरल भेटायचं असेल तर येते.. पण इट्स नॉट अ डेट.. आय हॅव अ बॉयफ्रेंड..”

“काय नाव बॉयफ्रेंडचं?”

“पिटर..”

“पिटर.. काहीही.. मला नाही वाटत.. फ़ेकत असेल ती..”

“अरे नाही खरंच.. मॅरीएटमध्ये तो म-या-मी पब आहे ना.. तेथे बाऊंन्सर आहे म्हणे…”

“हॅ.. फ़ेकतेय ती..”

“अरे पण का? का फ़ेकेल?”

“का म्हणजे..? अरे ती ओळखतेच किती तुला? २-४ भेटींमध्येच आपण तिला डेट साठी विचारतोय.. ती बॅक-फुटवर जाणारच ना.. जगातल्या ९९% मुली पहील्यांदा हेच सांगतात…”

“मला नाही वाटत.. तिच्याकडे बघून वाटलं नाही तेंव्हा ती खोटं बोलत होती…”

“तिने फोटो दाखवला दोघांचा?”

“असं कसं मी सरळ विचारु.. दोघांचा फ़ोटो दाखवं..”

“बरं असु देत.. सध्यातरी येतेय म्हणलीय ना.. मग बघु पुढचं पुढे..”…

असं म्हणून रोहन तेथून निघून गेला

रोहन गेल्यावर कबीरचे मन पुन्हा राधाकडे वळले. आजूबाजूला लोकं असताना, कामात असताना कबीर राधाला विसरून जायचा, पण एकटेपणात मात्र नकळतच त्याचे मन पुन्हा राधाच्या विचारात गुंगून जायचे

“कश्याला फोन केला असेल राधाने?”

“मी फोन घ्यायला हवा होता का?”

“फोन घेतला नाही म्हणून राधाने काय विचार केला असेल?”

“परत तिला कॉल -बैक करावा का?”

एक ना अनेक विचार त्याच्या मनात घोळत होते.

शेवटी मोठ्या प्रयत्नाने त्याने राधाला फोन करायचा विचार मनातून काढून टाकला.

नेपल्समध्ये येऊन राधाला दोन आठवडे उलटून गेले होते. राधासाठी हा अनुभव खुपच थ्रिलींग होता. पर्यटकांबरोबर फ़िरता-फ़िरता तिचेही मस्त फ़िरणे होत होते.

एके दिवशी संध्याकाळी साईटसिईंग वरून रुमवर परतत असतानाच अवंतीचा.. राधाच्या बॉसचा फोन आला..

“हॅल्लो मॅम…”, राधा..

“ए.. मॅम काय.. अवंतीच म्हण.. इतकी मोठी आहे का मी?”

“ओके.. अवंती..”, हसत राधा म्हणाली..

“कशी काय चालली आहे टुर? टीम कडून सहकार्य मिळतयं ना व्यवस्थीत..”

“खूप मस्त.. सगळी टीम छान आहे.. मी नविन आहे तर मस्त सांभाळून घेतात.. खूप शिकायला मिळतंय..”

“आणि नेपल्स? आवडलं का?”

“म्हणजे काय? ऑसम्मच आहे.. ४ दिवसांनी ही टुर संपतेय, पण असं वाटतंय, इथून परतुच नये कधी..”

“नेकी ऑर पुछ पुछ.. वेल.. थोड्या काळासाठी मी तुझा तिथला स्टे वाढवु शकते अजून.. दोन महीन्यांसाठी..”

“वॉव.. रिअली? कसं काय?”

“अगं.. नेपल्सला खुप मस्त एन्कॉयरी मिळत आहेत.. एक लेडीज-स्पेशल टुर करायची म्हणतेय.. थोडी मोठी बॅच असेल साधारण ५० जणांची.. तर तू आणि पूनम.. दोघी तिथेच थांबा.. आणि थोडं अजून हॉटेल्स शोधा.. इतकं लार्ज बुकींग आहे.. थोडं डिस्काऊंट वगैरे बोलून घ्या आणि आयटेनिअरी प्लॅन करा लेडीज-स्पेशलसाठी नेहमीच्या टुरपेक्षा वेगळं काय देता येईल वगैरे..”

“मस्तच.. साऊंड्स इंटरेस्टींग आणि पूनम सारखी सिनीअर ऑपरेटर असेल बरोबर तर काहीच प्रश्न नाही..”

“गुड गुड… मी पूनमशी बोलते तसं.. ही टुर संपली की आपण तिघी एक स्काईप-कॉल घेऊ मग, आणि बाकीचं प्लॅन करु.. ओके?”

“ओके.. अवंती.. अॅन्ड थॅंक्यु सोssss मच.. धिस मिन्स अ लॉट टु मी...”

“बाय राधा.. टेक केअर...” असं म्हणून अवंतीने फोन ठेवून दिला..

फोन ठेवल्यावर राधाने एक उंच उडी मारून झालेला आनंद व्यक्त केला आणि पूनमशी बोलायला ती तिच्या रुमकडे गेली.

कबीरने ठरल्याप्रमाणे व्हॉट्स-अॅपवर चौघांचा ग्रुप बनवला होता. त्यामुळे प्रत्यक्ष नसली तरीही, अप्रत्यक्ष का होईना, रतीची इतरांशी ओळख झालेली होती. शुक्रवारच्या संध्याकाळी ‘प्रोव्होक’ हॉटेलमध्ये डिनरला भेटायचं चौघांचं.. कबीर, रती, रोहन आणि मोनिकाचं.. ठरलं. हॉटेल शहरापासून थोडं लांब असल्याने सगळ्यांनी कबीरच्या कारमधून जायचा प्लॅन केला.

कबीरने सगळ्यांना पिक-अप केले आणि साधारण नऊच्या सुमारास सर्वजण रेस्तॉरंटमध्ये पोहोचले.

“तू मेरीयटमध्ये आहेस कामाला तर कित्येक सेलेब्रेटी दिसत असतील नै”, मोनिकाने रतीला विचारले..

“हो..भरपुर.. खूप लोकांची ये जा असते तेथे..”

“आणि आय.पी.एलच्या टीम्स पण तेथेच असतात ना?”, रोहन

“हो.. माझा विराट बरोबर सेल्फ़ी आहे..”, असं म्हणून रतीने आपल्या सेल मधला तिचा फ़ोटो सगळ्यांना दाखवला..

“सो लकी यार...”, मोनिका

“आणि वरती तो म-या-मी लाऊंज.. तेथे पण बऱ्याच पेज-थ्री पार्टीज असतील नै?”, रोहनने मुद्दाम म-या-मीचा विषय काढला तसा त्याची आणि कबीरची नजरानजर झाली.

“हो.. पण म्हणजे तो पब जरा टीन-एज किंवा थोड्या यंग लोकांसाठी आहे.. सो सेलेब्स पेक्षा त्यांची पोरं दिसतात जास्ती…”

“आणि मग फुल्ल दंगा होत असेल.. कसं आवरतात ह्या लोकांना..?”, रोहन जाणून बुजून बाऊंन्सर्स आणि त्या योगाने पिटरचा विषय निघतोय का हे पहात होता, पण तेवढ्यात स्टार्टर्स आले आणि तो विषय तेथेच थांबला.

चौघांचं खाणं-गप्पा चालु होत्या तेंव्हा कोपऱ्यातल्या टेबलवर बसलेला एक तरुण मुलगा सारखं त्यांच्याकडे बघत होता. शेवटी बऱ्याच वेळानंतर तो उठला, कबीरपाशी आला आणि म्हणाला.. “सर.. तुम्ही ‘इश्क’ पुस्तकाचे लेखक कबीर का?”

“हो..”, कबीर इतरांकडे बघत म्हणाला..

“सर.. तुमचं ते पुस्तक मला खूपच्च आवडलं.. मी कॉलेजमध्ये सगळयांना दिलं माझं वाचून झाल्यावर.. सगळयांना खुप्पच आवडलं…”

“वेल.. थॅंक्यु..” आपल्या आवाजातली एस्काईटमेंट दाबुन ठेवत कबीर म्हणाला…

“सर.. पुढे काय होतं मिराचं? पुस्तकाचा पुढचा भाग येणार आहे ना? कधी येईल?”

“काम चालु आहे.. लवकरच मी अनाऊंन्समेंट करेन…”

“प्लिज सर.. लवकर येउ द्या त्याचा पुढचा भाग.. आम्ही सगळे वाट पहातोय..”

“नक्कीच नक्कीच..” कबीरला रतीसमोर त्याला मिळणारे प्रेम, प्रसिध्दी फ़ार फ़ार मोठ्ठे वाटत होते..

“सर.. एक सेल्फ़ी मिळेल?”

“शुअर.. व्हाय नॉट?”

कबीरने आपले स्पोर्ट्स जॅकेट निट केले आणि केसांमधून एक हात फ़िरवला. कबीरबरोबर एक सेल्फ़ी घेऊन तो तरुण निघून गेला…

“माय माय.. आपल्याबरोबर पण एक सेलेब आहे बरं का..” रती हसत हसत म्हणाली..

“प्रश्न आहे का?”, शर्टची कॉलर निट करत कबीर म्हणाला..

“ए पण खरंच.. काय झालं पुढे मला पण खूप उत्सुकता आहे.. कुठे आहे सध्या राधा?”

राधाचा उल्लेख झाला तसा कबीर काही क्षण खायचं थांबला.. आणि मग म्हणाला.. “माहीत नाही..”

“माहीत नाही? अरे पण मग तुझं पुस्तक पुढे कसं जाणार? का पुढची सगळी गोष्ट काल्पनिकच…”, रती

“हो रे कबीर.. खरंच बरेच दिवस झाले, तुझ्याकडून राधाबद्दल काही ऐकलं नाही.. आहे कुठे ती?”, रोहन

“अरे खरंच माहीत नाही, तिने फोन नाही केला आणि मी पण…”, कबीरने राधाचा येऊन गेलेल्या फोनबद्दल कुणालाच काही सांगीतले नव्हते..

“मला राधाला बघायचंय.. कुणाकडे आहे तिचा फोटो?”, रती

सगळ्यांनीच नकारार्थी माना डोलावल्या..

“ए काय रे तुम्ही लोकं.. कबीरने इतकं मस्त वर्णन लिहीलंय मिराचं पुस्तकात.. मला बघायचीय खऱ्या आयुष्यात मिरा दिसते कशी…”

“आम्ही भेटलोय सगळे तिला.. पण फोटो असा नाहीए कुणाकडे…”, रोहन

"पण व्हॉट्स-अॅपवर असेल ना ती.. डीपी तरी असेलच की तिचा…", रती सोडायलाच तयार नव्हती

कबीरने नाईलाजाने फोन काढला आणि राधाचा डीपी उघडला..

"वेलकम टू नेपल्स, इटली", अश्या साईनबोर्डसमोर राधाचा फोटो होता…

"आई-शप्पथ.. ही इटलीला कधी गेली?", आश्चर्याने कबीर उद्गारला..

"बघु बघु…", असं म्हणून रतीने फोन कबीरच्या हातातून काढुनच घेतला.."वॉव्व.. शी इज प्रिटी यार.. लकी यु..", कबीरच्या खांद्याला आपल्या खांद्याने ढकलत रती म्हणाली..

"ए, आपला ग्रुप फोटो काढुन पाठवं ना तिला.." अचानक मोनिका म्हणाली.. तिच्या मनात अजूनही राधाबद्दल थोडी जेलसी, थोडा राग होता. समहाऊ आपण अजूनही कबीरच्या आजुबाजुला आहे हे तिला राधाला दाखवायचं होतं..

"कश्याला उगाच.. माझा काही कॉन्टॅक्ट नाहीए तिच्याशी..", कबीर

"असं कसं.. पुस्तकाची हिरॉईनना ती.. आणि रिअल-लाईफ़ मध्ये पण…"

"मोना प्लिज…", तिचं वाक्य तोडत कबीर म्हणाला.. रतीसमोर त्याला राधा आणि त्याच्या लाईफ़-बद्दलचा उल्लेख टाळायचा होता. जे काही घडलं होतं तो भूतकाळ होता.. आणि तो आता मागे सारून कबीर नविन मार्ग शोधत होता

"बरं बरं ठिके.. पण फोटो पाठवायला काय हरकत आहे.. तुझा संपर्क नसेल तिच्याशी तर निदान ह्यामुळे होईल तरी..", रती.

दोघीही ऐकायला तयार नव्हत्या.. त्यामुळे शेवटी नाईलाजाने त्याने सगळयांचा एक हॅप्पी फोटो काढुन राधाला व्हॉट्स-अॅप केला..

दहा वाजून गेले तसे डीजे ने धांगडधींगा गाणी बंद केली आणि सॉफ़्ट, रोमॅन्टीक गाणी चालु केली..

“वॉव.. काय मस्त गाणी लागली आहेत..लेट्स डान्स..”, मोनिका म्हणाली..

“ए.. नाही .. निघुयात.. घरी आई-बाबा वाट पहात असतील.. साडे अकरा वाजतील घरी जाईस्तोवर..”, रती

रोहन, मोनिका आणि कबीरला हे अभिप्रेत होते. त्यांनी प्लॅनच त्याप्रमाणे बनवला होता..

“ओह.. बरं मग मी आणि मोनिका थांबतो.. कबीर तू सोड तिला घरी..”, रोहन आधी ठरल्याप्रमाणे म्हणाला..

“अरे पण.. तुम्ही येणार कसे घरी मग?”, कबीर

“त्यात काय एव्हढं.. ओला-कॅब बोलावतो ना आम्ही.. काहीच प्रॉब्लेम नाहीए.. खरंच जा तुम्ही, आम्ही थांबतो अजून थोड्यावेळ..”, रोहन

रती आणि कबीरला थोडा एकांत मिळावा ह्या दृष्टीने त्यांनी आधीच हे प्लॅन करून ठेवले होते. मला बाराच्या आत घरी परतायचे आहे हे रतीने त्यांना सांगीतले होते, त्यावरूनच त्यांनी मुद्दाम लांबचे हॉटेल निवडले होते.

“ओके देन.. बाय.. एन्जॉय…”, कबीर..

“बाय गाईज…”, रतीने पण दोघांना बाय केले आणि ती कबीरबरोबर बाहेर पडली.

आधीच शहराबाहेरचे हॉटेल.. त्यात शेजारून वाहणारी नदी.. त्यामुळे हवेत चांगलाच गारठा पसरला होता.

“आय एम सॉरी.. माझ्यामुळे तुला लवकर निघावं लागलं…”, रती
“इट्स ओके.. तसेही मी थांबुन काय केले असते तेथे..”, कबीर

चालता चालता रती अचानक थांबली.

“तुझ्यात आणि राधात खरंच काही नाही?”, रती

“नो.. खरंच काही नाही.. आमच्या संपर्क पण काहीच नाही नंतर..”

“पण का कबीर.. मला माहीतीए तू वेडा आहेस तिच्यासाठी.. तिचे हसणे, बोलणे, तिचे कानामागे केस अडकवताना हळुच तुझ्याकडे बघणे..तिचा तो बासरीचा टॅट्टू.. सगळ्यासाठी.. तुझ्या लेखनातून ते जाणवते कबीर. तू तिला कध्धीच विसरु शकणार नाहीस.. गो फ़ॉर हर.. खरंच सांगतेय..”, रती कबीरच्या डोळ्यात डोळे घालून पहात म्हणाली..

कबीर गाडीत बसेपर्यंत काहीच बोलला नाही.

“रती.. आर यु हॅप्पी?”, गाडी सुरु केल्यावर तो म्हणाला..

“म्हणजे? ऑफ़कोर्स आय एम हॅप्पी..”

“नाही म्हणजे.. असं सॅटीसफ़ाईड अबाऊट लाईफ़.. आयुष्याकडून आपल्याला जे जे हवंय ते सगळं मिळालय.. किंवा मिळतंय.. त्या टाईप्स हॅप्पी?”

“कबीर.. आय एम नॉट इव्हन थर्टी.. हे असं आयुष्याबद्दल मी आत्ताच कसं बोलु..? मी अजून आयुष्य बघीतलंच कुठे आहे…? बट एनीवेज.. विषय चांगला बदललास..”, हसत हसत रती म्हणाली

कबीर हलकेच हसला आणि गाडी पार्कींगमधून बाहेर काढुन घराकडे वळवली..

काय असेल रतीच्या मनात.. हा जो कोण तिचा बॉयफ्रेंड आहे म्हणतीय पिटर.. तो खरंच असेल? का फ़क्त तिने रोहन म्हणतो तशी थाप मारली असेल? कबीरबरोबर फोटोमधली ही नविन मुलगी बघून राधा कशी रिॲक्ट होईल? कबीरच्या मनात काय चालु असेल?

एकमेकांत गुंफ़लेली ही पात्र आणि त्यांची नात्यांची गुंतागुंत सुटेल का अजूनच वाढत जाईल..?

वाचत रहा..

नेपल्सच्या आकाशातली निळाई कमी होऊन गडद लाल, गुलाबी, केशरी रंगांची मुक्तहस्ते उधळण झाली होती. दिवसभर मवाळपणे तळपणारा सुर्य़ मावळतीकडे झुकला होता. समुद्रकिनारी जाणाऱ्या रस्त्याच्या काही किलोमीटर आधी असलेल्या अरुंद रस्त्यांच्या कडेने उभारलेल्या कॅफेमध्ये बाहेर रस्त्याच्या कडेला लावलेल्या खुर्च्यांवर बसून राधा पुनमबरोबर ग्रिल्ड सॅन्डविच आणि कॉफी घेत होती. बरोबरची ट्रिप आदल्या रात्रीच परतली होती आणि ती आणि पुनम, अवंतीकाने सांगीतल्याप्रमाणे महीना दोन महीने तेथे थांबुन रेकी करणार होत्या.

“राधा.. तो शेफ़ बघ नं.. कसला हॉट आहे ना?”, पुनम आतल्या काऊंटरकडे बोट दाखवत म्हणाली..

“हो ना अगं.. नाही तर आपल्या इथले.. दोन-चार सन्माननीय अपवाद सोडले तर…”

“तो बघतोय मगाच पासून तुझ्याकडे…”, राधाला चिडवत पुनम म्हणाली..”चल बोलुयात त्याच्याशी..”

“गप गं.. उगाच काय बोलायचं..”

“चल तर.. त्यात काय होतंय.. मे बी.. एखादी वाईनची बॉटल देईल तो..कॉम्लमेंटरी..”, पुनम राधाला ओढत म्हणाली..

“नको.. जा तुच.., मला खुप भूक लागलीय… मला एक पास्ता घेऊन ये येताना…”

शेवटी पुनम एकटीच निघून गेली.

राधाने मोबाईल उचलला आणि मेसेज बघत असतानाच तिला कबीरने पाठवलेला फोटो दिसला. रोहन आणि मोनिकाला ती चेहऱ्याने ओळखत होती, पण कबीरच्या शेजारी बसलेली ती मुलगी, रती, कोण हे काही तिला उमजेना.

कबीरच्या ऑफ़ीसमध्ये कोणी मुलगी असल्याचे तिच्या ऐकीवात नव्हते. कबीरला बहीण असल्याचेही तो कधी काही बोलला नव्हता.

“राधा.. तुझं नाव विचारत होता तो…”, टेबलावर पास्ताची डिश ठेवत पुनम म्हणाली..

“हम्म..”

“अगं हम्म काय? फ़िदा आहे बहुतेक तुझ्यावर तो.. संध्याकाळी बिचवरच्या शॅक्समध्ये डिनरला भेटायचं का विचारत होता..”

“ओके..”

“बरं, तुला विचारायचं राहीलं, तुला पास्ता रेड सॉस मधला हवा होता का व्हाईट?”, राधासमोर पास्ताची डीश ठेवत पुनमने विचारलं

“हम्म..”

“एssssss.. मी वेडी आहे का एकटीच बडबडायला? काय ते फोन मध्ये डोकं खूपसून बसली आहेस.. आण तो फोन इकडे…” असं म्हणून पुनमने राधाच्या हातातला फोन काढुन घेतला.

राधाच्या मोबाईलवरचा तो फोटो पाहून पुनमने विचारलं, “कुणाचा फोटो आहे हा?” राधाने काहीच न बोलता पास्ताची डीश पुढे ओढली, पण तिचं खाण्यात लक्षच नव्हतं, चमच्याने ती पास्ता नुसताच इकडे तिकडे करत बसली होती.

“राधा.. काय झालंय? का डिस्टर्ब झालीस एकदम? ह्या फोटोशी काही संबंध आहे का त्याचा?”

“अगदीच असं काही नाही.. सोड ना, खूप मोठ्ठी कहाणी आहे ती..”, राधा..

“मग आपल्याला आता उद्या सकाळपर्यंत तरी काय काम आहे?.. आय एम ऑल ईअर्स..”

“ठिक आहे.. आधी हा पास्ता संपवु, मस्त कॉफ़ी ऑर्डर करु आणि मग तुला सगळं सांगते..”

“बरं.. ह्या शेफ़चं काय करायचं? त्याला आजच्या ऐवजी उद्या संध्याकाळी भेटू म्हणून सांगते.. ओके?”

“हम्म ओके...”

पुनम त्या शेफ़शी बोलायला निघून गेली

राधाने कबीरचा मेसेज उघडला.. तिला काय रिप्लाय करावा काहीच सुचत नव्हतं.. उघड उघड “ही मुलगी कोण?”, असं विचारणंही तिला बरोबर वाटेना..

तिने फ़क्त “थंब्स अप.. मस्त दिसताय तुम्ही सगळे..”, एव्हढाच मेसेज पाठवून दिला

राधा आणि पुनमच्या गप्पा संपल्या तेंव्हा संध्याछाया जाऊन अंधार पडला होता. त्या गल्लीचं तर रुपडंच पालटून गेलं होतं. सर्व रेस्तॉरंट्स रंगेबीरंगी दिव्यांच्या माळा आणि मंद दिव्याच्या प्रकाशाने उजळली होती. काही ठिकाणी सिस्टीमवर तर काही ठिकाणी चक्क लाईव्ह बॅंड्स संगीत वाजवत होते.. बिकीनी मध्ये फ़िरणाऱ्या ललना आता रात्रीच्या वन-पिस पार्टीवेअर्समध्ये आपापल्या बॉय-फ़्रेंड्स, नवऱ्यांबरोबर फ़िरत होत्या.

“हम्म.. तर असं आहे सगळं...” थोडा वेळ शांततेत गेल्यावर पुनम म्हणाली.. “बट यार.. ग्रेट आहेस तु.. खरंच मानलं तुला.. स्वप्नांचा पाठलाग कसा करावा हे तुझ्याकडून कुणी शिकावं...”

“जिंदगी बडी होनी चाहीए, लंबी नही.. हो ना? मला त्या त्या वेळेला जे वाटलं ते केलं.. त्याचे भविष्यात काय परीणाम होतील ह्याचा विचार सुध्दा केला नाही..”, राधा

"पण मग हा जो कोणी कबीर आहे, त्याचं काय? तुला तो आवडतो? का नाही?, नाही म्हणजे त्याचा दुसऱ्या मुलीबरोबरचा फोटो बघून तू डिस्टर्ब झालीस म्हणून विचारतेय..", पुनम

"मी स्वतःच खूप कन्फ़्युस्ड आहे त्याच्या बाबतीत.. म्हणजे.. तसा तो चांगला आहे.. मला कधी कधी त्याच्याबद्दल फ़िलिंग्स वाटल्याही.. पण कदाचित माझं ध्येय स्पष्ट होतं..मला रिलेशन्सच्या भानगडीतच पडायचं नव्हतं.. त्यामुळे त्याच्याबद्दल इतका.. आणि त्या दृष्टीने कधी विचारच केला नाही.."

"पण त्याला तू आवडतेस.. ना?"

"दोनशे टक्के..", हसत हसत राधा म्हणाली..

"तुझ्याजागी मी असते ना, तर कदाचित मी निदान विचार करायला वेळ तरी घेतला असता.. लगेच नक्कीच नाही नसते म्हणले.. म्हणजे तुझ्याकडून जे ऐकले त्यावरून तरी साधा-भोळा वाटतोय.. दिसायला ही क्युट आहे.. आणि मुख्य म्हणजे तुझ्यावर प्रेम करतोय.. त्या प्रेमाखातर त्याने अख्खं एक पुस्तक लिहीलंय..", पुनम

"अगं पण आम्ही दोघं दोन वेगवेगळे ध्रुव आहोत. तो अगदीच साधं, निरस आयुष्य जगणारा.. मला असं सतत काहीतरी नविन, रोमांचक लागतं. कधी मला अस् वेड्यासारखं भटकावंस वाटतं.. कधी वाटतं एखादा रॉक बॅंड जॉईन करावा.. कधी वाटतं दूर कुठेतरी निर्जन ठिकाणी तंबु ठोकून रहावं.. तो ह्यातलं कध्धीच काही करणार नाही.."

"बरोबर आहे तुझं.. पण मला वाटतं तू फ़क्त वर्तमानकाळाचाच विचार करतेस.. भविष्याच्या दृष्टीने कधी विचार केलाएस..म्हणजे.. आज तुला जे करावंस वाटतंय ते तू करु शकतेस कारण तुझं शरीर तुला साथ देतंय.. तुझं मन खंबीर आहे.. तुझ्यात पोटा-पाण्यासाठी काय वाट्टेल ते करण्याची धमक आहे.. पण.."

"कुठ्लं भविष्य पुनम.. उद्या कुणी बघीतलाय.. त्या उद्यासाठी आजचं आयुष्य निरस.. बोअरींग करायचं.. आणि तो उद्या आलाच नाही तर? कुणी सांगावं मी प्रवास करणारं एखाद्या

प्लेन-क्रॅश होईल, रस्त्याने जाताना एखादा ट्रक उडवेल.. हार्ट-अॅटॅक येईल.. काहीही होऊ शकतं ना..", पुनमचं वाक्य तोडत राधा म्हणाली..

"पण तो उद्या येणारंच नाही.. असंही नाही ना.. समजा तो उद्या आला तर? तर काय करशील?", पुनम..

"एनीवेज.. हे कोंबडी आधी की अंड असं झालं.. जाऊ देत.. आपण ह्या सुंदर संध्याकाळी कश्याला उगाच फिलॉसॉफीकल गप्पा मारतोय.. चलं.. सोड.. ह्या फोटोचं काय करु ते सांग.."

"हे बघ.. मला वाटतंय, त्याने हा फोटो तुला मुद्दाम पाठवलाय.. तू त्याला तिच्याबद्दल आत्ता काहीच विचारु नकोस.. बघु काय करतोय..", पुनम म्हणाली..

"बरं..आता काय करायचं? जेवायला तर मला आत्ता आज्जीबात भूक नाहीए..", राधा

"चल.. नाईट-आऊट्स साठी रेकी करु अजून..", पुनम

"नको प्लिज.. खूप झालंय आज काम.. त्यापेक्षा ड्राईव्ह-इन ला जाऊयात का.. ओपन स्क्रिन थिएटर्स आहेत.. मस्त कार मध्ये बसून पिक्चर टाकु एखादा..", राधा

"नको गं.. तिकडे सगळे कपल्स असतात.. आपण दोघी.."

"मग काय झालं.. विचारलं तर सांगु लेस्बो आहोत.. चल.. निर्लज्जं सदा सुखं..", पुनमला उठवत राधा म्हणाली...

दोघींनी बिल भरले आणि कारमध्ये बसून डाऊनटाऊनच्या रस्त्याला वळल्या..

राधाचा रिप्लाय बघून कबीरचं मन खट्टू झालं.. त्याची अपेक्षा होती की राधा रतीबद्दल विचारेल.. पण तिने तसं काहीचं केलं नव्हतं. कबीरने तो विषय तेथेच सोडून दिला. राधानेही नंतर तो विषय मनातून काढुन टाकायचं ठरवलं.

एके दिवशी रोहन आणि कबीर ऑफ़ीसमध्ये गप्पा मारत बसले होते.

“सो.. काय म्हणतीय रती.. आजकाल जोरदार भेटताय तुम्ही एकमेकांना.. हम्मं?”, रोहन

“रती.. खूपच मस्त आहे ती ह्यात वादच नाही. तिच्याशी गप्पा मारायला लागलं की वेळेचं भानंच रहात नाही. विषय कुठलाही चालतो अरे आम्हाला.. आणि आम्ही कश्यावरही तासंतास बोलु शकतो..”, कबीर

“हात्तीच्या.. म्हणजे अजून तुमचं गप्पांमध्येच अडकलं आहे.. मला वाटलं.. पुढे काही तरी घडलं असेल..”, रोहन

“अरे खरंच आहे तिचा बॉयफ़्रेंड तो कोण पिटर का कोण.. मध्ये बोलताना मध्येच कधीतरी त्याचा विषय निघाला होता.. तिच्या बोलण्यावरून तरी वाटत नाही, ती खोटं बोलत असेल असं…”

“बरं.. एक काम करु चलं.. खरंच एक पिक्चरचा प्लॅन करु.. आपण चौघं.. आणि त्या पिटरलापण बोलावु.. बघु तरी तो खरंच कोणी असेल तर येईल.. नसेलच कोणी तर रती काहीतरी कारण सांगेल.. काय बोलतोस?”, रोहनने शक्कल लढवली.

“ठिक आहे चल.. तू म्हणतोएस तर.. पण आपल्याला एकदम शेवटच्या शो ला वगैरे जावं लागेल, ११.३० वाजता वगैरे.. पिटरची ड्युटी असते ना बाऊंसरची…”
“आय एम ओक विथ इट.. तू बोल रतीशी आणि तिकीटं काढुन टाक…”

ठरल्याप्रमाणे सिनेमाचा प्लॅन ठरला. पिटरला बोलावण्याबाबत रती म्हणाली, “तो वेळेवर सुटला ड्युटीवरून तर येईल.. त्याला लेट हो असेल तर नाही जमायचं.. सो तिकिट्स आधी नको काढुस..ऐन वेळी काढु…”

कबीर मनोमन खुश झाला होता. मनात कुठेतरी त्याला रोहनचं बोलणं खरं वाटु लागलं होतं. रती नक्कीच फ़ेकतेय.. कोणी पिटर वगैरे नाहीए.. ऐनवेळी सांगेल त्याला उशीर होतोय निघायला म्हणून… अशी आशा मनात धरून तो थिएटरमध्ये पोहोचला होता.

रोहन आणि मोनिका आधीच पोहोचले होते.

थोड्याच वेळात रती पण पोहोचली. ह्यावेळी फ़क्त कबीरच नाही, तर रोहनसुध्दा तिच्याकडे पहात राहीला.. आणि रोहनच का.. थिएटरमधले बरेच तरुण तिच्याकडे बघत होते.

ऑलीव्ह रंगाचा.. आणि त्यावर रंगीत मोठ्या फुलांचा पॅटर्न असलेला स्लिव्हलेस फ्रॉक तिने घातला होता. केस मोकळे सोडले होते आणि केसांची एक बाजु छोट्या पिन्स लावून घट्ट बसवली होती. चंदेरी रंगाचे कानातले छोटेसे झुमके तिच्या गोऱ्या वर्णावर चमकून दिसत होते. पायातल्या ग्लॅडीएटर स्टाईल्सच्या सॅन्डल्स तिच्या नाजुक पायांभोवती नक्षी करून बसल्या होत्या. रती जवळ येताच एक मंद परफ़्युमचा सुगंध कबीरच्या नाकात शिरला.

“लुकींग ब्युटीफ़ुल..”, नकळत कबीर म्हणाला..
“थॅंक्स..”, रती..

“पिटर येणार आहे ना?”, रोहनने विचारलं.

"काय माहीती आता काय करतोय.. मी मगाशी फोन केला होता तर त्याने उचलला नाही.. बघु थोड्यावेळ वाट नाहीतर आपलं आपण जाऊ..", वैतागून रती म्हणाली

१०-१५ मिनीटं शांततेतच गेली.. कबीर मनोमन प्रार्थना करत होता की हा कोण जो पिटर आहे तो येउच नये.. तो अस्तीत्वातच असु नये… पण कबीरची प्रार्थना व्यर्थ ठरली कारण तेव्हढ्यात रतीचा फोन वाजला…

"हुश्श.. बरं झालं वेळेवर आलास.. कित्ती वेळ अरे…", रती फ़ोनवर बोलत होती..

"हो मला माहीते.. तू कामावर होतास.. ..बरं सॉरी.. आता आपण फोनवर भांडत बसणारे का?… हम्म ये.. आम्ही फ़र्स्ट लेवलवर आहोत…", रती

"आला बाबा एकदाचा..", फोन ठेवल्यावर रती म्हणाली.

कबीरच्या हृदयातली धडधड वाढत होती. प्रत्येक सेकंदागणीक त्याची अस्वस्थता वाढत होती.

थोड्याच वेळात एक बलदंड शरीरयश्टीचा तरुण त्यांच्यात येऊन मिसळला. साधारण ६ फुटाच्या जवळपास असलेली उंची.. गोरापान.. आखुन रेखुन केलेली दाढी, जेल लावून घट्ट बसवलेले स्पाईक्स.. कानात चमचमणारा डायमंड स्टड.. एकुणच आकर्षक व्यक्तीमत्व होतं. रती त्याच्यासमोर एखाद्या बाहुलीसारखी भासत होती.

"गाईज.. धिस इज पिटर..", रतीने सर्वांशी ओळख करून दिली.. रोहनची आणि कबीरची नजरानजर झाली…

"सो कुठला मुव्ही बघतोय आपण?", पिटरने विचारलं…

"लास्ट विकला तो एक रोम-कॉम लागलाय.. फ़ार मस्त आहे म्हणे तो…", रती म्हणाली..

“ए प्लिज.. उगाच सेंन्टी वगैरे नको हा.. त्यापेक्षा आज रिलीज झालेला तो झोंबी मुव्ही बघुयात…”, पिटर..

“ए नको रे.. फ़ार ब्लड-शेड असते झोंबी मुव्हीज मध्ये.. ह्या दोघी घाबरतील उगाच…”, कबीर म्हणाला..

“घाबरायला काय लहान आहेत का? दर वेळी आपणच का ॲडजस्ट करायचं त्यांच्या आवडीचे मुव्ही बघुन…?”, पिटर..

कबीरने सगळयांवरून नजर फ़िरवली.. कुणीच काही बोलले नाही.. शेवटी त्याने नाईलाजाने तिकीटं काढली..

सिनेमा त्याच दिवशी रिलिज झाल्याने बऱ्यापैकी गर्दी होती.. त्यामुळे सर्वांना एकाच रांगेत तिकीट्स मिळाली नाहीत. चार तिकिटं एका रांगेत.. आणि दोन समोरच्या रांगेतली होती…

कबीरने ती दोन तिकीट्स रती-पिटरला दिली, आणि तो, रोहन आणि मोनिका त्यांच्याच मागच्या रांगेत बसले.

सिनेमा अपेक्षेप्रमाणे फ़ालतु… किळसवाणाच होता.. थिएटर किंकाळया, गोळयांचे आवाज.. हाणामाऱ्या.. टेंन्शन.. ब्लड-शेड्सने भरून गेले होते. कबीरचे तर सिनेमाकडे लक्षच नव्हते. तो सतत समोर बसलेल्या रती-पिटरकडेच बघत होता.. अर्थात रतीलाही तो सिनेमा आवडलेला नव्हताच. पिटर मात्र सिनेमाचा मनसोक्त आनंद घेत होता. काही भयाण प्रसंगांमध्ये रती डोळे झाकून पिटरला बिलगत होती ते पाहून तर कबीरचा अधीकच जळफ़ळाट होत होता.

सिनेमामध्ये झोंबिंची एक मोठ्ठी लाट शहरावर आक्रमण करून जाते तो सिन सुरु होता आणि सिनेमाचा हिरो तलवार, बंदुक जे सापडेल त्याने सपासप झोंबिंना मारत होता. कुणाचं डोकं फुटत होतं.. कुणाचं पोट फुटून आतून आतडी बाहेर येत होत्या.. रतीला तो सिन असह्य झाला आणि ती उठून बाहेर पडली.. पण जाताना तिने कबीरकडे एक कटाक्ष टाकला.

कबीरने काही सेकंद थांबुन पिटरचा अंदाज घेतला.. तो सिनेमात पुर्णपणे रममाण झाला होता. शेजारून रती निघून गेल्याचेही त्याला भान नव्हते ते पाहून कबीरही हळुच बाहेर पडला.

रती बाहेर कॉफ़ी काऊंटरपाशी कॉफ़ी घेत होती.. कबीरला येताना पाहून तिने अजून एक कॉफ़ी ऑर्डर केली..

“हॉरीबल मुव्ही ना..?”, रती

“हम्म..”

“आय एम सॉरी.. उगाच आमच्यामुळे संध्याकाळची वाट लागली तुमच्या.. उगाच आलो आम्ही.. त्यापेक्षा तुम्ही दुसरा एखादा सिनेमा बघीतला असतात..”

“ए प्लिज.. इट्स ओके... एक वेगळा अनुभव..”, हसत हसत कबीर म्हणाला..

“माझ्या आणि पिटरच्या आवडी-निवडी खुप वेगळया आहेत.. त्यामुळे आमच्या बहुतेक डेट्सचे रुपांतर भांडणातच होते..”, कसंनुस हसत रती म्हणाली.. “पण तो चांगला आहे.. मुडमध्ये असतो तेंव्हा खुप काळजी घेतो माझी.. त्याच्याबरोबर खुप सेफ़ वाटते मला..”

कबीरला अचानक राधाची आठवण झाली. त्यालाही जाणवलं की आपलं आणि राधाचं पण अस्संच आहे.. दोघांच्याही आवडी निवडी दोन टोकांच्या. जर कधी राधा-कबीर दोघं एकत्र आलोच तर आपलं पण अस्संच होईल का? भांडणंच जास्ती?

दोघं बाहेरच गप्पा मारत बसले होते.. दहा मिनिटं झाली असतील तोच पिटर बाहेर आला..

“ए.. तू इथं काय करतीएस..”, काहीसा चिडून आणि मग कबीरकडे संशयाने बघत पिटर म्हणाला..

“पिटर..प्लिज.. अरे कसला बोअरींग आहे मुव्ही तो… मी नाही बघु शकत अजून..”

“मग काय झालं.. मी नाही तुझे रडके मुव्हीज बघत?”

“कुठे बघतोस.. लास्ट टाईम आपण नटसम्राटला गेलो होतो तर अर्ध्यातच निघून गेलासच की मला एकटीला सोडून तिथे..”

“मग काय… म्हातार्‍यांचे सिनेमे बघायचं वय ए का आपलं… बरं एनिवेज.. चल जाऊ यात आपण..”

“कुठे?”

“अगं, रॉनीचा फ़ोन आला होता.. ‘हार्ड-रॉक-कॅफ़े’ मध्ये पार्टी आहे.. तिकडे जायचंय..”, पिटर

“आणि सिनेमा?”

“जाऊ देत.. मी नंतर डाऊनलोड करून बघेन.. चल..”

“अरे पण इतरांच काय.. तुझ्यासाठी ते तो सिनेमा बघताएत ना..?”

एव्हाना रोहन आणि मोनिका पण बाहेर आले होते..

“कुठे कोण बघतंय.. सगळेच तर बाहेर आहेत…”, पिटर..

“प्लिज रे.. मला बोअर होतो तुमचा तो ग्रुप.. तुम्ही नुसते पित बसता…”

“मग तू घे ना कोल्ड्रींक.. तेथे मसाला दुध मिळत नाही..नाही तर तेच दिले असते तुला..”, मोठ-मोठ्यांदा हसत पिटर म्हणाला.. पण रती हर्ट झाल्याचं त्याच्या लक्षात आलं..

ओके ओके.. सॉरी.. चल जाऊ यात? बाय गाईज..”

“बरं निदान घरी जाऊन चेंज तरी करते.. हे असे छोटे कपडे घालून येऊ का तिकडे..?”

“त्यात काय झालं..? इथं आली होतीसंच की..”

“अरे पण थिएटर आणि हार्ड-रॉक मध्ये काही फ़रक ए की नाही.. त्यात तेथे सगळे तुझे मित्र असे बघतात की..”

“चल गं..मी आहे ना.. बघतो मी कोण काय म्हणतंय..”

“रती.. तुला पाहीजे तर.. माझं स्पोर्ट्स जॅकेट घेऊन जा बरोबर..”, आपलं जॅकेट काढुन रतीला देत कबीर म्हणाला..

“थॅंक्स..”, असं म्हणून रती नाईलाजाने सगळ्यांना बाय करून पिटरसोबत बाहेर पडली.

“आता काय करायचं?”, दोघं निघून गेल्यावर कबीर म्हणाला..

“हो ना.. आम्हाला काही तो उरलेला सिनेमा बघण्यात उत्साह नाहीए.”, मोनिकाकडे बघत रोहन म्हणाला..

“हो.. त्यापेक्षा जेवायला जाऊया कुठेतरी..”, मोनिका

“एक काम करा.. तुम्ही दोघं जा जेवायला.. मी उगाच कश्याला मध्ये.. आधीच आपली संध्याकाळ बोंबललीए..”, कबीर

“ए.. मध्ये काय त्यात.. तू काय नविन आहेस् का आम्हाला?”, रोहन

“तसं नाही रे.. पण खरंच जा तुम्ही दोघं.. मला तशीही फ़ारशी भूक् नाहीए”, कबीर..

“नक्की? नाही तर खरंच आम्हाला काही प्रॉब्लेम नाहीए तू आलास तर..”, मोनिका

मोनिकाची मनोमन इच्छा होती की कबीरने बरोबर यावं.. कबीर तिच्या मनातले भाव तिच्या डोळ्यात वाचु शकत होता..आणि म्हणूनच त्याला जायचं नव्हतं.. मोनिका आता रोहनची होती.. आणि कबीर त्यांच्याबरोबर असता तर कदाचित मोनिका पुर्णपणे रोहनकडे लक्ष देऊ शकली नसती असा काहीसा विचार त्याच्या मनात आला.

“खरंच नक्की.. जा तुम्ही..”, कबीर

एकमेकांचा निरोप घेऊन तिघेही बाहेर पडले.

कबीर घरी आला, बुट कोपऱ्यात भिरकावले आणि तो बेडवर सुन्नपणे बसून राहीला.. साधारण १० मिनिटंच झाली असतील तो त्याचा मोबाईल नविन मेसेज-साठी किणकिणला.

रतीचा मेसेज होता.

“कॅन यु पिक-मी अप फ़्रॉम कोरेगांव पार्क.. सिनेमा हॉलमध्ये नसशील आणि बिझी नसशील तर प्लिज कॉल..”

कबीरने लगेच फ़ोन लावला..

“कुठेस कबीर..?”, काहीशी मुसमुसत रती म्हणाली..

“घरीच आहे.. का? काय झालं..?”, कबीर..

“प्लिज मला पिक-अप करतोस का? मी कोरेगाव-पार्कला आहे..”

“हो करतो.. पण पिटर कुठे आहे?”

“तो मला सोडून गेला इथेच रस्त्यात.. ते नंतर बोलते.. पण प्लिज पटकन ये.. मी

कटीच आहे इथे..”, रती

कबीरने घड्याळात नजर टाकली.. १२.३० होऊन गेले होते. कोरेगाव-पार्क, शहराबाहेरचा तसा निर्जन भाग होता.. ह्यावेळ रती अशी एकटीच रस्त्यावर.. ते पण अश्या कपड्यात… त्याच्या काळजात धस्स झालं..

“रती.. हे बघ.. अशी रस्त्यावर एकटी नको थांबुस.. आजुबाजुला काही आडोसा आहे का?”

“नाहीए.. काहीच नाहीए इकडे.. मोकळा रस्ता आहे..”, रती.. “थांब एक मिनीट.. तिकडे पुढे.. श्शी.. सुलभ शौचालय आहे..”, कसंसं हसत रती म्हणाली..

“व्हेरी गुड.. तेथे आत जाऊन थांब.. मी लग्गेच येतोय..”, कबीर

“श्शी.. वेडा आहेस का.. अरे पब्लिक टॉयलेट आहे ते.. काही तरी काय.. किती घाण असेल तेथे..”, रती

“हे बघ रती.. मी लगेच पोहोचतोय.. अशी रस्त्यावर एकटी नक्को थांबुस प्लिज ऐक.. मला व्हॉट्स-अॅपवर तुझं लोकेशन पाठवं.. तू आत थांब. मी निघालोय...” असं म्हणून कबीर लगेच बाहेर पडला.. जाताना दोन-तिन पर्फ़्युमच्या बाटल्या बरोबर घेतल्या आणि त्याने गाडी वेगाने रतीच्या दिशेने वळवली..

रात्रीची वेळ असल्याने रहदारी तुरळक होती. २० मिनिटांत कबीर तेथे पोहोचला.. कबीरला बघताच रती धावत धावत आली आणि त्याला बिलगली..

“मी.. मी.. आतमध्ये उलटी केलीय..”, रती रडत रडत म्हणाली..

“ईट्स ओके.. इट्स पर्फ़ेक्टली ओके..”, तिची पाठ थोपटत कबीर म्हणाला..

त्याने गाडीतून पाण्याची बाटली आणि पर्फ़्युम्स तिला दिले.. रडून रतीच्या आयलायनर्सची वाट लागली होती.. गालांवर काळे ओघळ पसरले होते. केस विस्कटले होते.

रती जरा नॉर्मल झाल्यावर कबीरने तिला गाडीत बसवले आणि त्याने गाडी माघारी वळवली.

“काय झालं?”, कबीर..

“नेहमीप्रमाणे आमची भांडणं झाली.. मला नव्हतं जायचं कबीर त्याच्या त्या मित्रांच्या ग्रुपमध्ये.. त्यात तो तुमच्याशी जे वागला त्याचा मला राग आला होता... आमचं दोघांचही

भान सुटलं.. मी म्हणलं चिडून त्याला.. सोड मला इथंच.. तर त्याने खरंच मला गाडीतून उतरवलं आणि निघून गेला…”, रती..

“काय मुर्खपणा आहे हा… मग? काय केलंस तु?”, कबीर..

रतीने आपला मोबाइल चालु केला आणि त्यातला सेंन्ट फ़ोल्डरमधला एक मेसेज उघडून कबीरसमोर धरला..

“पिटर.. आय एम ब्रेकींग-अप विथ यु.. प्लिज उद्यापासून माझ्या समोर येऊ नकोस..”

तो मेसेज पाहून कबीरचे डोळे चमकले तसं रती म्हणाली.. “मी तुझ्यामुळे त्याच्याशी ब्रेक-अप केलंय असं समजु नकोसं हा…”

“छे.. मी कुठं तसं म्हणालो..”, कबीर..

रतीने कबीरच्या गाडीतल्या डॅशबोर्ड्सवरील पॅनलकडे नजर टाकली.

“काय झालं?”, कबीर

“पेट्रोल किती आहे बघतेय..”, रती

“आहे बरंच.. का?”, कबीर…

“जिकडे फ़िरवायची आहे गाडी तिकडे फ़िरव.. मला आत्ता आज्जिब्बात घरी जाण्याचा मुड नाहीए..”, असं म्हणून रतीने गाण्यांचा आवाज वाढवला, सिट-बेल्ट लावला आणि सिट थोडं मागे करून ती डोळे झाकून आरामशीर बसली..

“युअर विश.. माय कमांड मॅम..ड्रायव्हर कबीर अॅट युअर सर्व्हीस..”, असं म्हणून कबीरने गाडी सिटी-एक्झिटला वळवली.

“अशक्य आहे अरे हे सगळं.. असं कसं कोण करु शकतं..”, कबीरने आदल्या रात्रीचा किस्सा ऐकवल्यावर रोहन म्हणाला..

“हो ना अरे.. रात्रीचं असं निर्जन रस्त्यावर सोडून गेला निघून सरळ, काही वेडं वाकडं झालं असतं तर?”, कबीर

“नंतर काय केलंत मग? कुठे फ़िरलात?”, रोहन

“खोपोलीपर्यंत जाऊन आलो न मग.. सॉल्लीड भुक लागली होती, खरं तर मस्त धाब्यावर जाऊन जेवायचा विचार होता, पण एक तर रात्रीची वेळ, त्यात हिचे असे तोकडे कपडे.. एकट्याने ढाब्यावर जायची हिम्मत होईना.. मग फ़ुड-मॉलला हादडलं…”

“बरं केलं तिने ब्रेक-अप केला पिटरशी..तू तर खुशचं असशील..”, रोहन

“हो.. पण अरे.. मला थोडं असं इम्मॅच्युअर बिहेव्हिअर वाटलं तिचं.. आय मीन.. पिटरने जे केलं ते चुकीचंच होतं.. पण असं तडका-फ़डकी ब्रेक-अप म्हणजे..”, कबीर थोडा विचार करून म्हणाला.

“म्हणजे काय अरे? कोण सहन करेल असला फ़ालतुपणा.. आणि तुला काय माहीत ह्या एका गोष्टीमुळेच तिने ब्रेक-अप केले असेल.. कदाचित आधीपासूनच्या अनेक गोष्टी असतील साठलेल्या मनात.. हे एक कारण झालं.. एव्हढंच..”, रोहन

“असेलही.. पण ती थोडी अल्लड, इम्मॅच्युअर वाटते मला..”,कबीर

“आणि तू काय फ़ार मॅच्युअर वगैरे समजतोस का स्वतःला.. स्वतःचच बघ काय चाललंय.. आधी मोनिकाला सोडलंस..”

“एक मिनिटं, मी नाही मोनिकाला सोडलं.. तिनेच सोडलं होतं मला..” रोहनचं वाक्य तोडत कबीर म्हणाला..

“बर नंतर राधा…”

“ते ही मी नाही.. आधीच क्लिअर करतो.. ती नाही म्हणाली..”, कबीर..

“अरे हो.. मी कुठे म्हणालो तू ब्रेक-अप केलेस.. पण राधा मनात असतानाच..आता तुला रती पण आवडतेय..”

“मग? तुझं म्हणणं आहे.. एकदा राधा आवडली.. की मला कुणीच आवडु नये.. आणि राधा तर नाही म्हणालीय मला..मग काय मी तिची वाट बघत.. आयुष्यभर एकट्याने बसायचं का? माझ्याकडे का बोटं दाखवता..? तुम्हा कुणाला एक असताना दुसरी आवडत नाही का? नॅचरल आहे ते..”

“बर.. बरं.. ओके.. चिडु नकोस..जाऊ दे तो विषय.. आज संध्याकाळी एका पब्लीशरबरोबर मिटींग आहे.. ४.३० ला वगैरे.. कन्फ़र्म करु ना?”

“हम्म.. कर फ़ायनल..”, लॅपटॉपमध्ये डोकं खुपसत कबीर म्हणाला..

चार-पाच दिवसांनी, साधारणपणे बुधवारी रतीचा कबीरला फोन आला..

“शनिवारी सकाळी काय करतोएस?”, रती

“काही विशेष नाही..का?”

“घरी येतोस?”

“तुझ्या?”

“हो.. मग कुणाच्या?”

“का?”

“अरे सहज.. आपण एकमेकांना इतके दिवस ओळखतोय.. मी जनरली बोलवते माझ्या मित्र-मैत्रीणींना घरी…”

“ओके.. येतो.. ११.३० ठिक आहे?”

“चालेल, मी वाट बघते…”

ठरल्यावेळेप्रमाणे कबीर रतीच्या घरी पोहोचला. डेनिमची शॉर्ट आणि फ़िक्कट गुलाबी रंगाचा टी-शर्ट अश्या साध्या घरातल्या ड्रेसमध्येच रतीने दार उघडले. “गुड मॉर्नींग..” चेहऱ्यावर गोड हास्य पसरवत रती म्हणाली.. “वेल-कम..”

कबीरने हातातल्या पिवळया फुलांचा बुके रतीच्या हातात दिला.

हॉलमध्ये रतीचे आई-बाबा सुध्दा बसलेले होते. “वेल-कम यंग मॅन..”, रतीचे बाबा सोफ़्यावरून उठून कबीरशी हास्तांदोलन करत म्हणाले.

कबीर खुर्चीवर बसेपर्यंत रती पाणी घेऊन आली.

“कबीर .. तुझी ओळख करून देते.. हे माझे आई-बाबा.. आणि आई-बाबा.. हा कबीर..”, रतीने एका वाक्यात दोघांची एकमेकांशी ओळख करून दिली.

“सॉरी कबीर.. आम्ही काही तुझी पुस्तकं वाचलेली नाहीत.. पण रतीकडून खूप ऐकालंय त्याबद्दल.. खुप काही काही सांगत असते.. सिम्स लाईक यु आर अ गुड ऑथर..”, रतीचे बाबा म्हणाले.

“थॅंक्यु सर..”, कबीर कसंबसं म्हणाला…

“कबीर, रतीने त्या रात्रीबद्दल सांगीतलं.. थॅंक्स टु यु.. तू तेथे पोहोचलास…”

“ओह नॉट अ बिग डील, माझ्या जागी दुसरं कोणी असतं तरी ही तेच केलं असतं..” “एनीवेज.. रती.. जा तुझी रुम दाखवं कबीरला…”

“काय ओ बाबा.. रुम काय दाखवं.. तो काय मला लग्नासाठी बघायला आलेला मुलगा आहे का?”

“नाही का? मग बघ आता…”, रतीचे बाबा हसत हसत कबीरला म्हणाले.. तसं रतीने सोफ़्यावरची उशी बाबांना फ़ेकून मारली आणि कबीरला घेऊन तिच्या वरच्या मजल्यावरच्या खोलीत घेऊन गेली.

रतीची खोली अगदी तिच्यासारखीच होती, एकदम कलरफ़ुल. गडद निळया रंगांच्या भिंती, पुर्व-दिशेकडे उघडणारी मोठ्या काचेच्या तावदानांची खिडकी, त्यावर लटकलेले गुलाबी, पर्पल रंगाचे ड्रिम-कॅचर.. पानं,फुलं, पक्ष्यांच्या स्टिकर्सने रंगलेल्या भिंती, एका बाजुला पुस्तकांची मोठ्ठीच्या मोठ्ठी रॅक, रंगीत-फ़्रेश फुलदाणी, पिसांची रंगीत पेनं, टेडी-बेअर्सने सजलेला रायटींग-डेस्क, एका भिंतीवर एल.ई.डी.लाईट्सची माळ आणि मधोमध चिकटवलेले अनेकविवीध फोटो.. पायाखाली मऊ-मऊ कार्पेट.. एखाद्या स्वप्नील जगात गेल्यासारखा कबीर त्या खोलीत हरखुन गेला.

“मस्त सजवली आहेस खोली..”, कबीर रॅकमधील पुस्तकं न्हाहाळत म्हणाला.. “थॅंक्स.. बसं ना..”, खिडकीशेजारील खुर्चीकडे हात करत रती म्हणाली..

“गाणी लाऊ? कुठली आवडतात तुला?”, रती

“माझं असं काही विशेष आवड-निवड नाहीए.. काहीही चालतं.. अगदी मेटॅलीका-हार्ड-रॉक पासून.. मराठी शास्त्रीय संगीतापर्यंत…तुला?”, कबीर..

"अं.. मी खूप चुझी आहे गाण्यांच्या बाबतीत.. पण त्यातल्या त्यात जगजीतची गझल्स.. मराठी नाट्य/शास्त्रीय संगीत, हिंदीमध्ये शक्यतो अरजीत सिंगच.. बाकी पार्टीजमधला धांगडधिंगा तेव्हढ्यापुरता बरा वाटतो.. कट्यारची लावु गाणी?", रती..

"व्वा.. का नाही.. घेई छंद लाव.. फ़ार भारी ए.."

"रतीने ड्रॉवरमधून कट्यारची सिडी काढली आणि प्लेअरमध्ये ढकलली.."

गाणं सुरु होईस्तोवर रतीच्या आईने सरबंत आणि खाण्याचे पदार्थ आणून ठेवले..

"रती.. मी आणि बाबा.. मार्केटमध्ये जातोय.. आणि मग बाहेरच जेऊन नाटकाला जाऊ म्हणतोय.. चालेल ना तुला?", रतीच्या आईने विचारलं..

"हो आई.. चालेल...", रती..

"कबीर... जेऊनच जा.. रती चांगला स्वयंपाक बनवते.. सकाळपासून स्वयंपाक-घरातच होती बघ..." असं म्हणून, खोलीचं दार लावून तीची आई निघून गेली...

शंकर-महादेवनच्या स्वर्गीय सुरांनी खोलीचा कोपरां-कोपरा मधुर होऊन गेला होता. गाणी संपेस्तोवर अर्धा-पाऊण तास कसा निघून गेला कळालेच नाही. कबीर वेळ-काळ-स्थळ सगळं विसरून गेला होता. डोळे मिटून तो ती गाणी ऐकण्यात रममाण होऊन गेला होता. इतकं शांत त्याला गेल्या कित्येक महीन्यांत.. वाटले नव्हते. हा केवळ गाण्यांचा प्रभाव होता? की रतीची त्या खोलीतली त्याला लाभलेली साथ ह्याच्या त्याला पत्ता लागेना..

त्याने डोळे उघडले तेंव्हा तळहातावर हनुवटी टेकवून रती त्याच्याकडेच हसत बघत होती.

"काय झालं?", भानावर आल्यावर कबीर म्हणाला..

"काही नाही.. कुठेतरी हरवला होतास तु...", रती

“खरंय गं.. काय गाणी आहेत मस्त… खरंच मी हरवलो होतो कुठेतरी…”, कबीर..

“आई-बाबा गेले?”, काही वेळ शांततेत गेल्यावर कबीर म्हणाला..

“केंव्हाच…”, रती अजूनही कबीरकडेच बघत होती…

काय होतं् तिच्या नजरेत? काय म्हणायचं होतं तिला? तिचे ते टप्पोरे डोळे कबीरला खुणावत होते.. पण काय? कश्यासाठी?

“कबीर.. एक विचारु?”, रती

“हो.. विचार की…”, कबीर..

“पण त्यातून काही अर्थ काढु नकोस हं.. सहजचा प्रश्न आहे.. सहजच, पण खरं खरं उत्तर दे..”

“बापरे.. काय विचारणार आहेस असं?”

“..तू मोनिकाबरोबर लिव्ह-ईन मध्ये रहात होतास?”

“हम्म..”

“कधी तिच्याबरोबर सेक्स..”

“हो.. पण खरं तर मला नाही वाटत त्यात रोमांन्स असा काही होता.. इट वॉज वन ऑफ़ दोज क्रेझी नाईट्स.. रोमॅन्सची माझी व्याख्या खुप वेगळी आहे..”, कबीर

“म्हणजे कशी..”

“म्हणजे असं मुसळधार कोसळणाऱ्या पावसात हातात हात धरून फ़िरणं… कडाडणाऱ्या विजा.. सोसाट्याच्या वाऱ्यात एकमेकांना किस्स करणं मला जास्ती पॅशनेट वाटतं..”, कबीर..

"मग मोनिकाबरोबर रहाताना असा कोसळणारा वारा.. कडाडणाऱ्या विजा आल्या नाहीत का कधी?", हसत हसत रतीने विचारलं..

कबीर नुसताच हसला...

"आणि राधाबरोबर?", अचानक गंभीर होत रती म्हणाली...

"नाही..", क्षणाचाही विलंब न करता कबीर म्हणाला.

"पण कधी तसं वाटलं तरी असेल ना?", रती..

"पण तू हे का विचारते आहेस..?", कबीर..

"आधी उत्तर दे..."

"नाही वाटलं.. पण तेंव्हा मुसळधार पाऊस.. कडाडणाऱ्या विजा असत्या तर...".. कबीर अचानक थांबला..

"तर काय कबीर?"

"एनिवेज.. जाऊ देत तिचा विषय...", कबीर थोडासा अनकंफर्टेबल होतं म्हणाला..

"बरं, चल, जेऊयात? तुला न जेवता सोडलं तर आई रागावेल मला..", तोंड फ़ुगवून रती म्हणाली..

"आई रागावेल का?", कबीर गालातल्या गालात हसत म्हणाला..

"हो.."

"आणि तु? तू नाही रागावणार?", रतीच्या नजरेला नजर देत कबीर म्हणाला..

"बघं बरं.. मी रागावले ना.. तर मला मनवताना तुला ब्रम्हांड आठवेल.."

कबीरने खिडकीतून बाहेर बघीतलं.. मे महीना संपत आला होता आणि आकाशात काळया ढगांचे पुंजके अधून-मधून डोकावत होते. अश्याच एका ढगाने आग ओकणाऱ्या सुर्याला झाकून बाहेर मळभ आणला होता…

“मुसळधार पाऊस येणार बहुतेक…”, काही मिनिटांपुर्वीच्याच मुसळधार-पावसाचा संदर्भ घेत कबीर म्हणाला..

रतीला त्याच्या बोलण्यातला अर्थ कळाला आणि ती खळखळून हसली..

“मग काय होतं कबीर.. मुसळधार पाऊस आला तर?”, रती अजूनही खोलीच्या दारातच थांबली होती..

“धरणं भरतात.. सगळीकडे हिरवं गार होतं..”, कबीर

“आणि..”

“आणि.. उन्हाळ्याची गर्मी जाऊन सगळीकडे सुखद गारवा होतो..”

“ते जाऊ देत.. तुला काय होतं कबीर?”

रतीच्या आवाजातला कंप कबीरला जाणवत होता..

कबीर रतीच्या जवळ जाऊन थांबला. त्याच्या शरीराचा स्नायुं-स्नायु रतीला बाहुपाशात समावून घेण्यासाठी आसुसलेला होता. त्याने एक पाऊल पुढे टाकले असते तरी रतीने त्याला थांबवले नसते. पण ह्यावेळी त्याला रतीबद्दल शंभर-टक्के स्वतःकडून खात्री हवी होती. त्याला रती आवडत होती हे शंभर टक्के खरं होतं.. पण त्याच्या मनातून राधा गेलेली नव्हती हे ही तितकेच खरं होतं आणि तो रतीला कुठल्याही प्रकारे फ़सवु इच्छीत नव्हता.

मोठ्या कष्टाने त्याने स्वतःला सावरले..

“एनिवेज.. चल जेऊयात.. खुप भुक लागली आहे..”, कबीर..

रतीने अविश्वासाने वळून एकवार कबीरकडे पाहीले आणि मग ती जेवायचं वाढायला स्वयंपाक-घरात निघून गेली.

कबीर घरी परतला तेंव्हा त्यच्या मनामध्ये विचारांचे काहुर उठले होते.

“आपण केलं ते बरोबर केलं का?”

“रतीला काय वाटलं असेल?”

“आपण एक चांगली संधी गमावली का?”

“पण रती काय संधी नाहीए.. आत्ता भावनेच्या भरात काही करून तिला भविष्यात दुखावायची आज्जीबात इच्छा नव्हती.”

“आपण असं स्वतःला थांबवले ह्याचे एकमेव कारण राधा आहे का? आपण अजूनही तिच्यावर प्रेम करतोय? अजूनही तिच्या परत येण्याची वाट बघतोय? का? कश्यासाठी?”

एक ना अनेक प्रश्न त्याच्या मनात थैमान घालत होते. त्याची तंद्री भंगली ती फ़ोन वाजण्याचा आवाजाने.

कबीरच्या बाबांचा फोन होता..

“हा बाबा.. बोला..”, कबीर..

“कबीर.. ह्या मंथ-एंडला मी आणि तुझी आई येतोय तिकडे..”

“अरे व्वा.. का? सहज?”

“नाही अरे.. श्रेयाचं (कबीरच्या चुलत बहीणीचं) लग्न ठरलंय”

“ऑं? कधी? आणि इतक्या लगेच?”

“हो अरे.. तिचा होणारा नवरा संगणक क्षेत्रातला आहे.. अमेरीकेत असतो तो.. त्याला जास्तं सुट्टी नाहीए, अनायसे इथेच होता.. भेटीगाठी झाल्या.. दोघंही एकमेकांना पसंद पडले आणि असं तडकाफ़डकी लग्न करायचं ठरलंय..”

“पण मग बाकीचे…?”

“सगळेच येतोय.. बसेस केल्यात दोन-तिन.. आम्ही तुझ्या घरीच येऊ…”

“ओ्के…”

“कबीर!!”

“हां बाबा..”

“एव्हरीथींग ऑलराईट..?”, कबीरच्या आवाजात लग्नाचा किंवा सगळया नातेवाईकांना भेटण्याचा कसलाच उत्साह नव्हता..

“हम्म.. एव्हरीथींग ऑलराईट..”

“कबीर.. मी बाप आहे तुझा… काय झालंय..एखादी मुलगी वगैरे…”

“हम्म.. पण एक नाही दोन..”, कबीर कसंनुसं हसत म्हणाला..

“अरे बापरे… मला वेळ आहे आत्ता.. बोलायचंय?”

पुढच्या दहा-पंधरा मिनिटांत कबीरने बाबांना राधा आणि रतीबद्दल सगळं सांगून टाकलं..

“मलाच कळत नाहीए.. मला कोण जास्ती आवडतं.. राधा? का रती? आणि राधा आवडत असेल.. तरीही.. तिच्या मनात काय आहे काही कळत नाहीए.. ती परत येईल.. नाही

येणार.. ह्याचाही काही भरवसा नाही.. आणि समजा, ती येणार नाही म्हणून रतीला आपलंसं केलं..आणि राधा समोर आली तर.. तर काय होईल हे सुध्दा मला ठाऊक नाही..", कबीर…

"हे बघ कबीर.. माझं तरी असं मत आहे की आपण पळत्याच्या मागे न लागता.. जे हातात आहे तेच गोड मानुन घ्यावं.. राधाची न्युज आम्हीपण टी.व्ही. वर पाहीली होती.. अर्थात शेवटचा निर्णय सर्वस्वी तुझा आहे…"

…

"एक काम कर.. लग्नात रतीला पण घेऊन ये.. जमेल?"

"हो.. येतो घेऊन.. ठेवु फोन मग?"

"हम्म.. चल बाय.. आणि उगाच देवदास होऊन बसु नकोस.. पुस्तकाच्या पुढच्या भागावर काम चालु करं, इथे सगळे विचारायला लागलेत पुढचा भाग कधी येणार म्हणून..", बीरला चिअर-अप करत त्याचे बाबा म्हणाले…

"मी लाख लिहीन हो पुढचा भाग.. पण शेवट मलाच सापडत नाहिए त्याचं कायं?..", कबीर स्वतःशीच म्हणाला आणि त्याने फोन ठेवून दिला.

नेपल्समध्ये काढलेले अनेक सुंदर सुंदर फोटो पोस्ट करण्यासाठी राधाने बऱ्याच दिवसांनी फ़ेसबुक उघडलं..

पहील्या काही पोस्ट स्क्रोल केल्यानंतर एका फोटोपाशी राधा घुटमळली. रतीने तिचा कबीरबरोबर काढलेला एक सेल्फ़ी फ़ेसबुकवर कबीरला टॅग करून पोस्ट केला होता.

“कोण आहे ही रती? आणि कबीर तिच्या बेडरुममध्ये काय करतोय..?”, तो फ़ोटो एन्लार्ज करून बघत राधा स्वतःशीच म्हणाली..

“दाल मै कुछ काला है..” मागून लॅपटॉपवरचा तो फोटो बघत पुनम म्हणाली..

“चुप गं चुडैल.. काही काला वगैरे नाहीए..”, राधा

“कमऑन राधा.. यु आर अ वुमन.. रतीच्या चेहऱ्यावरचे.. डोळयातले भाव बघुनच तू सांगु शकतीस.. कश्याला फ़सवतेस स्वतःला..”, पुनम

“एनिवेज.. आपण चाललोच आहे इंडीयात मंथएंडपर्यंत… गेल्यावर कळेलच खरं काय आणि खोटं काय…”, राधा..

“आणि समजा हे खरं असेल.. तर काय? आणि खोटं असेल.. तर काय?”, पुनम “माहीत नाही..”, राधा..

“अ‍ॅक्सेप्ट इट राधा.. तुला कबीर आवडतो.. आणि तू चक्क जळती आहेस.. त्याला दुसऱ्या मुलीबरोबर बघुन.. हो ना?”

“असेल.. पण पुनम, माझ्या स्वप्नांचं काय? माझ्या आयुष्याकडून ज्या अपेक्षा आहेत त्याचं काय? मी कबीरला ‘हो’ म्हणून एक तर त्याच्या.. किंवा माझ्या आयुष्याला न्याय देऊ शकणार नाही हे खरं आहे ना? आणि कॉम्प्रमाईज करून त्यावर बेतलेली रिलेशनशीप मला नकोय..”

“विचार कर राधा.. निट विचार कर.. अजून दोन आठवडे आहेत तुझ्या हातात.. इंडीयात आपण परत जाऊ तेंव्हा एकदाचा काय तो सोक्ष-मोक्ष लावून टाक.. इस्स पार.. या उस्स पार.. तू स्वतःही त्यात अडकली आहेस.. आणि कदाचित कबीरही..”

राधाने लॅपटॉप बंद केला आणि डोळे मिटून टेबलावर डोकं ठेवून राधा विचारात गढुन गेली…..

कबीरची झोप मोडली ते केंव्हापासून वाजणाऱ्या फोनच्या आवाजाने. आदल्या दिवशी रात्री नातेवाईकांचा सगळा गोतावळा लग्नासाठी येऊन थडकला होता. सगळ्यांना भेटून, गप्पा-टप्प्पांमध्ये कबीरला झोपायला मध्यरात्र उलटून गेली होती. त्याने घड्याळात बघीतले, ८च वाजत होते.

काही सेकंदांनी पुन्हा फोन वाजु लागला.

वैतागून त्याने फोन उचलला...

“कबीर.. ए कबीर.. अरे झोपलाएस का?”, पलीकडून राधा फोनवर ओरडत होती..

“राधा? हा कुठला नंबर आहे तुझा...?”, कबीर राधाचा आवाज ऐकताच खडबडून जागा झाला..

“काय करतो आहेस?”, त्याच्या प्रश्नाकडे दुर्लक्ष करून राधा म्हणाली..

“झोपलोए.. सकाळी झोपेतच असतात बहुतेक लोकं..”

“पेपर बघीतलास आजचा?”, राधा

“मी झोपलोय म्हणलं तर! झोपेत वाचेन का पेपर...”

“बरं बरं.. व्हेरी गुड.. एक काम कर, पट्कन एम.जी.रोड वर ये.. तुला काही तरी दाखवायचंय..”

“राधा.. अगं मी अजून बेडमध्येच आहे.. वेळ लागेल मला.. काय काम आहे बोल नं..”

“ते तू इथे आल्याशिवाय कसं सांगू? ये पट्कन, मी वाट बघतेय.. मार्झोरीन समोर थांब..”, असं म्हणून कबीरला बोलायची संधी न देता राधाने फोन बंद करून टाकला..

“काय मुलगी आहे ही.. अशी एकदम गायब होते.. एकदम कुठून तरी अवतरते.. काही कॉन्टेक्स्ट नाही.. एम.जी.रोडला ये म्हणे…”, चरफडत आणि स्वतःशीच बडबड करत कबीर अंथरुणातून उठला आणि फ्रेश व्हायला बाथरुममध्ये गेला..

कबीरने एम.जी.रोडच्या कॉर्नरला पोहोचताच राधाला फोन केला. काही वेळातच राधा कुठुनतरी धावत धावत येऊन कबीरच्या समोर येऊन थांबली..

“पाहीलंस?”, राधा

“काय?”, गोंधळून कबीर म्हणाला..

“च्च्.. अरे ते बघ ना समोर…”, समोरच्या एका जाहीरातीच्या फलकाकडे बोट दाखवत राधा म्हणाली..

समोर ‘स्ट्रॉबेरी ट्रॅव्हल्स’च्या जाहीरातीचा फ़लक होता.. आणि जाहीरातीत राधाचा मोठ्ठा फोटो.. “कम व्हिजीट युरोप” वगैरे म्हणत..

“ऐल्ला.. तू मॉडेलींग वगैरे चालु केलेस की काय?” कबीर डोक्याला हात लावत म्हणाला..

“अरे नाही.. मी मागच्या आठवड्यात इटलीवरून परत आले.. ऑफ़ीसमध्ये गेले तेंव्हा अवंतिका.. माझी बॉस आणि ॲड एजंसीची हेड समीरा.. दोघींचा काहीतरी वाद सुरु होता.. टुरीझमचा सिझन सुरु होतोय आणि आम्हाला युरोप मार्केट करायचं होत.. त्यासाठी आधीच खूप उशीर झाला होता आणि त्या दिवशी फोटो-शुट होतं आणि ती मॉडेल कुठे तरी गायब

झाली होती.. तिचं म्हणे ब्रेक-अप झालं आणि ती डिप्रेशन मध्ये गेलीय वगैरे वगैरे काहीतरी चालु होतं..", राधा सांगत होती..

"मग?", कबीर..

"समीराने अजून दोन-तिन मॉडेल्सचे फोटो आणलेले.. पण अवंतीला एकतर कुठले आवडले नाहीत.. आणि त्या लगेच अव्हेलेबल पण नव्हत्या.. अजून १-२ दिवस शुट पुढे जात होतं.. मी कॉलेजच्या दिवसांत काही असेच फोटो काढले होते..गुगल-ड्राईव्हवर होतेच ते अपलोड केलेले.. ते दाखवले अवंतीला.. तर तिला आवडले.. कदाचित अगदीच मनाप्रमाणे नसतील.. पण दुसरा पर्याय पण नव्हता.. समीराने पण मान्यता दिली मग काय.. लगेच त्याच दिवशी दुपारी शुट-इ्न.. थोडं फोटो-शॉप एडीटींग, प्रिंटींग करून एका आठवड्यात.. हिअर आय एम..", समोरच्या फलकाकडे हात दाखवत राधा म्हणाली..

"धन्य आहेस तु.. कधी कुठे काय करशील तुलाच माहीत…", कबीर

"अरे इथेच काय.. अजून बऱ्याच ठिकाणी लागतील हे बोर्ड्स.. आज सगळया लिडींग पेपर मध्ये पण ॲड आहे आमची..", राधा अभिमानाने बोलत होती..आणि कबीर डोळ्याची पापणीही न हलवता तिच्यातला तो खळाळता उत्साहाचा झरा न्हाहाळत होता.

"कबीर..", अचानक गंभीर होत राधा म्हणाली.. "त्या दिवशी तू प्रसंगावधान राखुन गोकर्णमध्ये मला वाचवलं नसतंस तर कदाचित मी आजही कोर्टाच्या फ़ेऱ्यांमध्येच अडकले असते.. माझं हे नविन आयुष्य केवळ तुझ्यामुळे.. थॅंक्स अ लॉट वन्स अगेन.."

बोलता बोलता राधाने कबीरच्या हातावर हात ठेवला..

"..आणि म्हणूनच मी तुझ्यासाठी काही तरी करायचं ठरवंलय.."

"आता काय करते आहेस…", कबीर

"मी ना.. ह्या ॲड चे पैसे नाही घेतले.."

“माझ्यासाठी?”

“ऐक तर.... ते पैसे मी घेतले नाहीत.. त्या ऐवजी.. ह्या महीना अखेरीस आम्ही स्विझरलॅंडला चाललो आहोत.. ८ दिवसांसाठी.. आणि तू येतो आहेस आमच्याबरोबर..”

“म्हणजे?”

“अरे म्हणजे.. त्या पैश्यांऐवजी मी तुझ्यासाठी स्विसची टुर बुक केलीय…”

“व्हॉट??? आणि म्हणजे तुला एव्हढे पैसे मिळत होते त्या ॲडचे..”

“नाही रे.. पण हे बघ.. टुरची कॉस्ट जी आम्ही जाहीरात करतो ती अर्थात मार्जीन धरून असते.. खरी कॉस्ट कमीच असते.. शिवाय मी एम्प्लॉई.. थोडा डिस्काऊंट मिळवला.. ते केलंय मी ॲडजस्ट.. पुढच्या आठवड्यात मी सांगेन ते डॉक्युमेंट्स दे.. तुझा व्हिसा टाकु लगेच प्रोसेसिंगला…ओके?”

“हम्म ठिक आहे..”

“बरं चल.. ब्रेक-फ़ास्ट केला आहेस?”

“नाही.. कार्यालयातच करेन..”

“कार्यालयात?”

अचानक कबीरला आठवले आज लग्न आहे.. त्याने घड्याळात नजर टाकली.. ९ वाजून गेले होते.. १०.३० ला त्याला रतीला घेऊन कार्यालयात पोहोचायचे होते..

“ओह डॅम्न.., राधा मला जायला हवं..”, कबीर

“का? काय झालं?”

"अगं.. लग्न आहे श्रेयाचं.. माझ्या चुलत बहीणीचं.. मी अजून तयार पण नाही... मला आवरायचंय.. रतीला पिक-अप करायचंय..मेलो मी..", कबीर

"रती? रती कोण?", रतीच नाव ऐकताच राधा सावध झाली..

कबीरला काय बोलावं सुचेना..

"रती.. अं फ्रेंड आहे माझी..."

"ओह तीच का ती.. तू फोटो पाठवला होतास त्यात तुझ्या शेजारी होती ती?"

"हम्म तिच..चल पळतो मी.."

"एssss उर्मट.. तुझ्या बहीणीचं लग्न आहे आणि मला इन्व्हाईट पण नाही?"

"अगं तू नव्हतीस इथे.. मग मी काय करणार..?"

"पण आता आहे ना?"

"ओह येस.. ये ना मग..."

"*ये ना मग*?? हे असं इन्व्हाईट.. नको त्यापेक्षा.. जाऊ देत.. असं बळंच नको..स्वतःहून म्हणाला असतास तर विचार केला असता.."

"ए आता उगाच नाटकं नको करुस.. खरंच ये.. उशीर झाला ना.. गडबडीत सुचलं नाही.. ये नक्की वाट बघतोय.. पत्ता पाठवतो व्हॉट्स-ॲपवर..", असं म्हणून कबीर निघून गेला..

कबीर रतीकडे पोहोचला तेंव्हा ११ वाजून गेले होते.. एव्हढ्या वेळात दहा वेळा रतीचा फोन येउन गेला होता.. आणि कबीर फ़क्त आल्यावर बोलु एव्हढंच बोलत होता.. कबीर रतीच्या घरी पोहोचला तेंव्हा रती पार्कींगमध्ये येऊन थांबली होती.

गुलाबी रंगाचा त्यावर सोनेरी रंगाची नक्षी केलेला घागरा-चोली तिने घातला होता, पायात किंचीत हाय-हिल्स असलेले चंदेरी रंगाचे चमचमते सॅन्डल्स, ड्रेसला साजेसा गालावर फ़िक्कट गुलाबी रंगाची छटा असलेला मेक-अप तिने केला होता. डोळयात हलकेसे काजळ आणि आयलायनरने डोळयांच्या रंगवलेल्या कडांमुळे आधीच सुंदर असलेले तिचे डोळे अधीकच सुंदर भासत होते.

हातातल्या डझनभर बांगड्या आणि खांद्यावरून पाठीमागून हातांवर गुंडाळलेली ओढणी सांभाळत रती गाडीमध्ये बसली..

“कशी दिसतेय?”, रती..

“सिंड्रेला…”, कबीर नकळत बोलून गेला…

“अं?”

“खूप मस्त दिसतेस..”

“च्च्.. काय रे.. लेखक आहेस ना तु..? काही तरी मस्त कॉम्लीमेंट दे की.. काय आपलं तें तेच नेहमीची वाक्य..”, हसत हसत रती म्हणाली..

“बरं.. मग लिहुनच पाठवीन रात्री व्हॉट्स-अ‍ॅप वर.. आत्ता निघुया?”

“हो चला.. आधीच उशीर झालाय… ए.. पण का उशीर झाला एव्हढा?”

कबीरने गाडी सुरु केली आणि तो स्विझरलॅंड-ट्रिप चा भाग वगळून राधाच्या भेटीबद्दल रतीला सांगीतले..

“ती पण येतीय लग्नाला..”, शेवटी कबीर म्हणाला

रती काहीच बोलली नाही, पण तिला राधाचं लग्नाला येणं समहाऊ आवडलं नसावं असं कबीरने ताडलं..

कबीर कार्यालयात पोहोचला तेंव्हा बराच उशीर झाला होता, पार्कींग केंव्हाच भरून गेले होते. कबीरने रस्त्यावरच गाडी लावली आणि रतीला घेऊन तो आतमध्ये गेला.

“अहो काय शेठ.. किती उशीर?”

“कबीर अरे काय? किती वाजले..सकाळी ब्रेकफ़ास्टला येणार होतास…”

“काय रे ब्रो? कित्ती वाट पहात होते सगळे तुझी?”

एक ना अनेक.. कबीरवर उशीरा आल्याबद्दल प्रश्नांचा भडीमार चालु होता. कबीर मात्र तडक रतीला घेऊन आई-बाबांकडे गेला.

“आई- बाबा.. ही रती.. रती.. हे माझे आई-बाबा..”, कबीरने एकमेकांशी ओळख करून दिली..

रतीने खाली वाकून दोघांना नमस्कार केला..

“गोड आहेस गं..”, रतीच्या हनुवटीला धरत कबीरची आई म्हणाली. कबीरने हळुच बाबांकडे प्रश्नार्थक नजरेने बघीतले आणि बाबांनीही हसत हसत हळुच छान आहे अशी खुण केली.

आई आणि रतीला थोड्यावेळ गप्पा मारायला सोडून कबीर बाहेर खुर्च्यांवर येऊन बसला.

थोड्यावेळाने रतीपण त्याच्या शेजारी येउन बसली.

अधून मधून कबीरच्या नात्यातले कोण-ना-कोण येऊन जात होते. कबीर त्यांची आणि रतीची ओळख करून देत होता.. पण त्याचे लक्ष मात्र घड्याळाकडे आणि कार्यालयाच्या दाराकडे लागून राहीले होते. मनातून कुठेतरी त्याला राधा यायला हवी होती, तर दुसरे मन राधा नाही आली तर बरेच होईल असेही म्हणत होते.

नवरा मुलगा आणि नवरी मुलगी शेवटचे विधी संपवून कपडे बदलायला गेले होते. "तुम्हा मुलींची खरंच कमाल असते हां.. बघ ना.. श्रेयाचंच.. एक-दोनदा काय भेटले, एकमेकांना पसंद केलं आणि लगेच लग्न? बरं तर बरं.. असा एकदम देश सोडून त्याच्या घरी जाणार रहायला..", कबीर म्हणत होता..

"मला नाही वाटत ह्यामध्ये दिवसांनी काही फ़रक पडतो. कधी कधी एका भेटीतही समोरचा आपल्याला अगदी जवळचा वाटतो.. कधी कधी कित्येक महीन्यांच्या भेटीतही नाळ जुळत नाही..", रती

"हो बरोबर आहे.. पण आता माझं आणि मोनाचं बघ.. दोघं एकमेकांना इतकं चांगलं ओळखत होतो, एकमेकांच्या प्रेमात होतो.. एकत्रही रहायला लागलो होतो.. पण अचानक सगळं बिघडलं.. इतक्या टोकाला गेलं की.."

"कबीर.. आपण शेवटी माणसं आहोत.. रोबोट्स नाही, एकदा प्रोग्रॅम केले की लाईफ़-लॉग ठरवल्याप्रमाणे वागतील. कितीही, काहीही झालं तरी परीस्थीतीनुसार लोकं थोडीफ़ार बदलतातच.. स्वाभावीक आहे ते.."

"म्हणजे.. तुला म्हणायचंय मोना बरोबर होती, मी चुक?"

“नाही, तसं मला म्हणायचं नाहीये. माझा मुद्दा हा आहे की लग्न, नाती जमणं हा जसा नशीबाचा एक भाग आहे तसा एकमेकांशी जुळवून घेण्याचाही. त्यामध्ये एकमेकांना किती दिवसांपासून ओळखतो हा मुद्दा दुय्यम आहे..”

कबीरने बोलता बोलता सहज समोर बघीतले, दाराआडून त्याचे आई-बाबा कबीर-रतीकडे बघत होते. कबीरची नजरानजर होताच दोघंही पट्कन आत निघून गेले..

“म्हणजे तुझा लग्न-संस्थेवर विश्वास आहे तर…”, कबीर

“अर्थात. मला लग्न करायला.. आपलं घर सोडून दुसऱ्याच्या घरी जाऊन नवीन सुरुवात करायला, नवीन नाती जोडायला खूप आवडेल..”, रती

कबीर पुढे काही बोलणार इतक्यात त्याचा फोन वाजला.

राधाचा फोन होता..

“कबीर.. बाहेर ये ना.. मी गेटपाशी आहे…”

“हो आल्लोच..”, असं म्हणून कबीर राधाला रिसीव्ह करायला बाहेर गेला.

रतीने नकळत आपला ड्रेस निट केला, मोबाईलच्या कॅमेरात पाहून केस निट केले आणि उगाचच मोबाईलवरचे मेसेजेस बघण्यात मग्न होऊन गेली.

थोड्याच वेळात कबीर राधाला घेऊन रती बसली होती तेथे आला.

“रती.. मिट राधा… राधा .. ही रती..”, कबीरने दोघींची एकमेकांशी ओळख करून दिली..

“हाय राधा…”, रती म्हणाली..

“हाय रती.. यु आर ब्युटीफुल..”, शेजारची खुर्ची ओढुन त्यावर बसत राधा म्हणाली..

“थॅंक्स.. बट यु आर गॉर्जीयस..”, रती

दोघीही हसल्या..

“सो.. सकाळी गडबडीत बोलता आले नाही.. हाऊ वॉज इटली..”, कबीर..

“इटली.. वॉव.. ऑस्समच आहे एकदम.. आम्ही खुप फ़िरलो.. आर्ट फ़ेअर्स, म्युझीअम्स..फ़ोटोग्राफ़ी एक्झीबिशन्स.. रेस्तॉरंट्स.. नेपल्सचे समुद्र किनारे तर अमेझींग आहेत.. यु शुड डेफ़ीनेटली व्हिजीट…”, राधा बोलत होती

“वॉव.. मस्त राधा.. सही लाईफ़ आहे तुझी.. मज्जा नै मस्त मस्त ठिकाणं फ़िरायला मिळतात..”, रती म्हणाली..

“हम्म..पण मी स्ट्रगल करून ही लाईफ़ मिळवली आहे.. त्यासाठी कित्येक गोष्टी सोडल्या आहेत, कित्येक लोकांची मनं दुखावली आहेत.. कबीर नोज बेटर.. ना कबीर..”, राधा कबीरकडे बघत म्हणाली..

तिघं जण बोलत असताना तिकडून कबीरची आई चालली होती.. राधाला बघून ती परत आतमध्ये गेली आणि तिने कबीरच्या वडीलांना बाहेर बोलावलं..

“अहो, एक मिनीटं बाहेर या..”

“का? काय झालं..?”

“अहो..ती रती-कबीरबरोबर बसलीए ती.. ती राधा आहे का?”

कबीरच्या वडीलांनी त्याच्या आईला कबीरशी फोनवर झालेलं बोलणं सांगीतलं होतं.. कबीरच्या वडीलांनी हळुच डोकावून बघीतलं..

त्यांनी राधाला टीव्हीवर बघीतलं होतं तेंव्हा ती खूप वेगळीच दिसत होती. पण साधारण चेहरा ओळखीचा वाटला तसे ते म्हणाले..

“हो बहुतेक.. तिच आहे ती..”

“अहो पण.. मग ती इथे कश्याला आलीय? कबीर आणि रती कित्ती छान दिसत आहेत एकत्र.. ही कश्याला उगाच मध्ये तिथे?”

“आता मला काय माहीत.. कबीरनेच बोलावले असेल तिला..”

“काय करावं ह्या मुलाचं..”, डोक्याला हात लावून त्याची आई निघून गेली.

इकडे तिघांच्या गप्पा चालु होत्या तेव्हढ्यात एक आज्जीबाई डुलत-डुलत राधापाशी आल्या आणि म्हणाल्या.. “अगं.. पेपरात ती जाहीरात आलीय त्यातली ती मुलगी तुच का?”

राधा हसली आणि म्हणाली.. “हो आज्जी मीच ती..”

“एक.. सेल्फ़ी काढू का तुझ्याबरोबर..” असं म्हणून त्या आज्ज्जीबाईंनी राधाबरोबर एक-दोन फ़ोटो काढुन घेतले आणि त्या निघून गेल्या.

आणि थोड्याच वेळात ती बातमी इतरत्र पसरली.. काही क्षणातच राधा सेलेब्रेटी झाली.. कोण ना कोण येऊन तिच्याबरोबर फ़ोटो काढुन घेत होते. शेवटी राधाच एका ग्रुपबरोबर फोटो काढायला तेथून निघून गेली..

“कबीर.. अरे तुझी गाडी कुठेय?”, कबीरचे बाबा एव्हाना तेथे आले होते..”

“बाहेरच आहे.. आत पार्कींग नाही मिळालं..”, कबीर..

“व्हेरी गुड.. एक काम कर ना श्रेया आणि तिच्या नवऱ्याला देवदर्शनाला घेऊन जायचंय.. जवळंच आहे इथे.. पण त्यांच्या गाडीच्या मागे कोणतरी गाडी पार्क करून गेलंय.. जातोस?”

“हो.. जातो की.. त्यात काय एव्हढं..” असं म्हणून रतीला दोन मिनिटांत येतो सांगून कबीर बाहेर पडला.

कबीर गेल्यावर रती एकटीच राहीली होती. मोनिकाचं महत्वाच फोटोशुट असल्याने ती आली नव्हती तर रोहन त्याच्या आज्जीची तब्येत बिघडल्याने दोन दिवसांपुर्वीच गावी गेला होता. त्यामुळे ते दोघंही नव्हते.

थोड्यावेळाने राधा रती शेजारी येऊन बसली..

“कबीर कुठे गेला?”, राधा..

“अं तो बाहेर गेलाय ते देवदर्शन करायला गाडी घेऊन गेलाय, येईलच १५ मिनीटांत”.. रती

“ओह ओके..”

एक विचित्र संवादाची पोकळी दोघींमध्ये निर्माण झाली होती. काय बोलावं कुणालाच सुचेना.. अचानक दोघीही एकदमच म्हणाल्या..

“तू आणि कबीर…”

मग दोघीही हसल्या.. अर्थात त्यामुळे दोघींमध्ये निर्माण झालेलं टेंन्शन थोडं कमी झालं..

“नाही.. तसं काही नाहीए आमच्या दोघांत.. मी आणि कबीर एकमेकांचे खूप चांगले मित्र आहोत..”, राधा म्हणत होती..”कबीर माझ्याबरोबर माझ्या प्रत्येक कठीण प्रसंगात होता.. तो तेंव्हा नसता.. तर आज मी इथे नसते.. आय ओ हीम ए बिग थिंग.. पण खरंच आमच्या दोघांत तसं काही नाहीए.. इन्फॅक्ट माझं तसं कुणाबरोबरंच काही नाहीए…”, हसत हसत राधा म्हणाली..

“का?”,रती

“म्हणजे मला माझं आयुष्य असं मोकळेपणाने जगायचंय.. मला असा कोणीतरी हवाय जो मला रिस्ट्रिक्ट करणार नाही.. तर मला मोकळीक देईल.. मला माझं आयुष्य जसं मला हवंय तसं जगु देईल..”, राधा

“माझ्या बाबतीत अगदी उलटं आहे..”,रती म्हणाली.. “उलट मला असा कोणीतरी हवाय जो सतत माझ्या आजुबाजुला असेल..जो मला दिवसांतून पन्नास वेळा फोन करेल.. मी कुठे आहे, काय करतीएस विचारेल.. मला ना, अश्या सुखद बंधनात कायमंच अडकून रहायला नक्कीच आवडेल..”

“मग तुझं आणि कबीरचं नक्की जमेल.. तो अगदी तुझ्यासारखाचं आहे..”, राधा

“खरंच?”, रती एकदम आनंदाने बोलून गेली.

काही क्षण दोघी एकमेकांकडे पहात होत्या. शब्द नसले तरीही तो मुक संवाद खुप काही बोलून गेला. रतीच्या डोळयांमध्ये कबीरसाठी असलेलं प्रेम राधा स्पष्ट पाहु शकत होती.

“बरं चलं, मला निघायला हवं..”, अचानक राधा म्हणाली

“अं? अग आत्ता तर आलीएस ना.. अजून लग्न पण नाही लागलंय..”, रती

“हो गं, पण खरंच थोडं महत्वाचं काम आहे..”

“पण कबीर येईपर्यंत तरी थांब.. त्याला भेटून जा नं..”, रती

“नाही नको.. त्याला सवय आहे माझ्या अश्या अचानक निघून जाण्याची.. तो नाही काही बोलणार.. चल.. भेटु परत कधी..”, असं म्हणून राधा तेथून निघून गेली.

पाचंच मिनिटांत कबीर आला..

“हे काय.. राधा कुठेय?”, कबीर ची नजर राधाला शोधत होती..

“जस्ट गेली ती..”, रती म्हणाली..

“म्हणजे?”

“तिला काही तरी महत्वाचं काम होतं म्हणून गेली ती..”, रती

“अरे अशी कशी गेली.. थांबवायचं नाहीस का तू तिला..”, कबीरचा आवाज अचानक वाढला.. इतका की आजुबाजुला बसलेली लोकं त्यांच बोलणं थांबवून कबीर आणि रतीकडे पाहु लागली

“कबीर.. मी म्हणले तिला.. कबीरला भेटून जा.. तिने ऐकलं नाही, यात मी काय करणार..”, कबीरच्या अचानक वाढलेल्या आवाजाने रती भांबावून गेली.. “मला फोन तरी करायचास ना..”

“मी का तुला फोन करु.. राधा तुझी मैत्रीण आहे, माझी नाही. तिने तुला फोन करायला हवा होता.. तिला वाटलं नाही करावासा.. तू मला का सांगतोएस हे..”

“किती वेळ झाला जाऊन…”

“पाचच मिनीटं…”, रती दुसरीकडे बघत म्हणाली..

कबीर धावत धावत राधा दिसतेय का बघायला बाहेर पळाला.. कबीर दिसेनासा होईपर्यंत रती त्याच्या पाठमोऱ्या आकृतीकडे पहात राहीली, मग तिने आपली पर्स उचलली, कार्यालयाच्या बाहेर आली, आणि रिक्षात बसून निघून गेली.

राधा पुनमच्या आलिशान फ्लॅटमधील प्रशस्त टेरेसमध्ये डोकं धरून बसली होती.

“काय घेणार? थंड बिअर आणु?”, पुनमने विचारलं

“श्शी नको.. कडवट होईल तोंड.. स्मर्नऑफ़ चालेल आणि ऑन-द-रॉक्स प्लिज…”, राधा

“ओके..”, पुनम हसून परत आत गेली आणि येताना दोघींसाठी दोन लार्ज पेग्स आणि चिप्स घेऊन परतली

“सो अ‍ॅज आय अंडरस्टॅंड.. तुला कबीर आवडतो.. कबीरला तू आवडतेस.. पण रतीला पण कबीर आवडतो.. मग.. मग तुला रती आवडते का?”, पुनम गोंधळून म्हणाली..

“ओह कमऑन पुनम.. मला कश्याला रती आवडेल…”, राधा वैतागून म्हणाली..

“सॉरी.. सॉरी.., पण मग तुम्ही दोघं एकमेकांना आवडताय, तर प्रॉब्लेम कुठे आहे? तुला कबीर हवाय? का नकोय?” पुनम

“मला कबीर हवाय पुनम.. पण माझ्या टर्म्स वर.. म्हणजे त्याला जशी मी हवीय तशी मी होऊ शकत नाही हे नक्की.. तो अ‍ॅडजस्ट करायला तयार असेल तर.. आय मीन लुक.. दर वेळेस मुलींनीच का अ‍ॅडजस्टमेंट करायची? त्यांच्यासाठी आपण आपली लाईफ़-स्टाईल.. आपलं करीअर त्यांच्या सोईने करायचं का? कबीर तसाही लेखकच आहे.. तो घर सांभाळायला तयार असेल तर..”

“खरं आहे तुझं.. पण आपली भारतीय मेंटालीटी बदलायला वेळ लागेल राधा.. आणि तो तयार असला तरीही त्याच्या घरच्यांच्याही काही अपेक्षा असतीलच ना एक सून म्हणून..”, थोडा विचार करून पुनम म्हणाली..

“तेच तर.. कबीर ने ते ठरवावं पहीलं.. त्याला बायको हवीए का आई-वडीलांसाठी सून..”, राधा

“तू कबीरशी बोलली आहेस ह्या विषयावर? आय मीन त्याला कधी क्लिअरली सांगीतलं आहेस की तुला पण तो आवडतो.. तू त्याच्याबरोबर एकत्र राहु शकतेस.. पण तुझ्या ह्या काही अटी आहेत वगैरे..”, पुनम

“नाही..”

“मग मला वाटतं तू त्याच्याशी हे सर्व बोलावंस.. पण हे बघ, हे असं एकदम अंगावर नको जाऊ त्याच्या तुझ्या अटी वगैरे घेऊन.. त्याला तुझ्याबाजुने करून घे..त्याला इन्व्हॉल्व्ह कर तुझ्यात आणि मग बोल..”

“म्हणजे नक्की काय करु?”, राधा..

“इमोशन्स राधा इमोशन्स.. त्याला इमोशनल कर.. त्याच्यासमोर तू गरीब-बिचारी.. अबला..एकटी वगैरे आहेस हे भासव.. तुला त्याची गरज आहे हे त्याला इंडायरेक्टली जाणवून दे.. मग बघ.. तो स्वतःहून त्याचा खांदा तुला रडायला पुढे करेल..”, पुनम..

“पुनम्.. यु बिच..कसली आहेस अगं तु..”, राधा हसत हसत म्हणाली..

“सगळे पुरुष एकसारखेच असतात अगं.. दिसली दुःखी स्त्री.. की कर खांदा पुढे.. ट्राय इट.. आणि ऑल-द-बेस्ट..”

राधाने ग्लास बॉटम्स-अप केला आणि ती तेथून बाहेर पडली..

“रोहन.. मी जरा रतीच्या घरी चाललो आहे..”, टेबलावरून कारची किल्ली उचलत कबीर म्हणाला

“घरी? का रे? काय झालं?”, रोहन

“अरे दोन दिवस झाले.. तिचा फोन बंद येतोय, व्हॉट्स-ॲपपण लास्ट-सीन दिन दिवसांपूर्वीचेच आहे..”, कबीर

“कबीर..”, कबीरला थांबवत रोहन म्हणाला.. “मला वाटतं ती अपसेट असेल.. त्या दिवशी तू तिला एकटीला सोडून राधाच्या मागे निघून गेलास…”

“अरे पण मी आलो ना परत.. आलो तेंव्हा निघून गेली होती ती.. मी काय करणार मग?”, रोहनचं वाक्य तोडत कबीर म्हणाला..

“हम्म.. पण मला वाटतं..”

पण कबीर त्याच्या बोलण्याची वाट न बघता निघून गेला होता.

रतीच्या घराचं दार रतीच्या आईनेच उघडलं..

“काकु.. रती आहे घरी?”, कबीर

“नाहीए..”

“अं.. कुठे गेलीए.. तिचा फोन पण बंद येतोय दोन दिवसांपासून..”, कबीर

“विपश्यनेला…”

“विपश्यनेला?? कधी येईल..”, अचंबीत होत कबीर म्हणाला…

“दहा दिवसांनी येईल..”

“काय संन्यास वगैरे घेतीय की काय?”, हसत हसत कबीर म्हणाला खरा, पण रतीच्या आईच्या चेहऱ्यावरचे गंभीर भाव बघून तो गप्प बसला..

“पण मग फोन?”

“फोन बंदच असतो दहा दिवस... ती आली की सांगेन तू येऊन गेलास ते..”, जवळ जवळ दार लावतच तिची आई म्हणाली..

“बरं.. ठिके.. येतो काकु..”.. पण त्याचे शेवटचे शब्द बंद दारावर आपटून परत आले..

कबीरने कार चालु केली आणि रोहनला फोन लावला..

“बोल रे.. काय झालं? भेटली रती?”, रोहन

“नाही रे.. च्यायला ती दहा दिवस कुठे तरी विपश्यनेला गेली आहे..”, कबीर

“असं अचानक? काही बोलली पण नाही..”

“हो ना.. फोन पण बंद असेल म्हणे दहा दिवस...आणि तिची आई.. तिची आई तर माझ्याशी असं बोलत होती जणू मी कोणी दारावर आलेला सेल्समन आहे.. आतमध्ये सुध्दा नाही घेतलं.. काय झालं असेल रे?”

कबीर बोलत होता तेंव्हा त्याच्या फोनवर दुसरा फोन येत होता...

“रोहन एक मिनीटं हं.. कुणाचा तरी फोन येतोय...”, कबीरने रोहनला होल्डवर ठेवून मोबाईल-स्क्रिनवर कुणाचा फोन आहे ते बघीतला.

दुसरा फोन राधाचा होता..

“रोहन.. मी तुला नंतर फोन करतो.. राधाचा फोन आहे..” असं म्हणून कबीरने लगेच रोहनचा फोन कट केला आणि राधाचा फोन घेतला

पलीकडून राधाचा मुसमुसण्याचा आवाज येत होता..

“हॅल्लो कबीर.. दोन मिनीटं वेळ आहे का?”, पलीकडून राधाचा हलका आवाज येत होता..

“राधा? काय झालं? आवाज का तुझा असा येतोय??”, कबीर

“अनुरागने डिव्होर्स पेपर्स पाठवलेत..”, राधा मुसमुसत म्हणाली..

“अरे व्वा.. मस्तच की.. हेच तर तुला हवं होतं ना? मग रडायला काय झालं?”, कबीर

“हो रे.. पण त्याने डिव्होर्सची कारण फारच घाणेरडी दिली आहेत.. म्हणे मी तिकडे गोकर्णला…”, राधाने बोलता बोलता पॉज घेतला..

“हे बघ राधा… सोड ना.. डिव्होर्स हा नेहमीच ब्लेम-गेम असतो.. लिव्ह-इट…तुला जे पाहीजे ते मिळालंय ना?.. सो टेक इट अ‍ॅन्ड मुव्ह ऑन..”, कबीर

“हम्म.. फ़िलींग सो लोनली यार…इफ़ पॉसीबल, घरी येऊ शकतोस का? जस्ट कपल ऑफ़ ड्रिंक्स आणि मग गेलास तरी चालेल..”, राधा

“शुअर, व्हाय नॉट.. येतोच अर्ध्या तासात..”, असं म्हणून कबीरने फोन ठेवून दिला..

गाडी गेअर मध्ये टाकून मुख्य रस्त्यावर येतो नं येतो तोच रोहनचा पुन्हा फोन आला. कबीरने फोन ब्ल्यु-टूथला टाकला आणि गाडीला गती दिली..

“काय म्हणत होती राधा?”, रोहन

“अरे गोची झालीए.. मी तिच्याकडेच चाललोय..”, रोहन

“का? काय झालं?”

“अरे त्या अनुरागने डिव्होर्सचे पेपर्स पाठवलेत तिला आणि कारणं काही भलती सलती दिलीत म्हणून रडत होती बिचारी…”

“बिचारी?”

“हो मग.. एकटीच ए ती घरी.. मी येतो पट्कन जाऊन..”

“हे बघ कबीर.. माझं ऐकशील तर नको जाऊस आत्ता तिच्याकडे..”, रोहन समजावणीच्या सुरात म्हणाला.

“का?”

“अरे का काय? एकतर ती एकटी आहे घरी.. बिचारी.. त्यात दुःखी.. त्यात तू पण रती भेटली नाही म्हणून अपसेट आहेस..”, रोहन

“तुला म्हणायचंय काय नक्की..”

“मला काय म्हणायचंय हे तुला नक्की कळतंय कबीर.. भावनेच्या भरात काही तरी होऊन बसेल.. तिला फोन करून सांग नंतर येतो म्हणून..”

“अरे काय? लहान ए का मी.. चल नंतर बोलतो तुझ्याशी..”, असं म्हणून कबीरने फोन बंद केला..

रोहनने चिडून दोन क्षण फोनकडे बघीतले आणि मग रतीचा नंबर फिरवला, परंतू जसं कबीर म्हणाला होता त्याप्रमाणे फोन स्विच्ड-ऑफ़ येत होता. पुन्हा एकदा प्रयत्न करून त्याने फोन बंद केला.

त्याला काय करावं सुचत नव्हतं.. मग त्याने मोनिकाला फोन लावला..

“बोल शोनु.. काय करतोएस..”, मोनिका नेहमीच्याच मिस्कील टोन मध्ये म्हणाली..

“अरे सोड ते शोनु बिनु.. त्या कबीरला आधी फोन लाव आणि थांबव त्याला..”, रोहन

“का? काय झालं?”, मोनिका

रोहनने जेव्हढं भर-भर सांगता येईल तेव्हढं सांगीतलं आणि मग म्हणाला.. “मोना, कबीरला तू ओळखतेस आणि मी ही.. त्याला राधा अजूनही आवडते.. आणि कदाचित राधाला पण तो.. आत्ता दोघंही एकटे आहेत.. अपसेट आहेत.. मला वाटतं..त्या दोघांनी असं घरी एकटं भेटणं योग्य नाही.. आय मीन.. मला तरी वाटतंय की कबीर आणि रती एकत्र यावेत.. असं असताना…”

“हम्म.. आलं लक्षात.. तू म्हणतोस ते बरोबर आहे.. मी बघते बोलून कबीरशी..”, असं म्हणून मोनिकाने फोन बंद केला आणि कबीरचा नंबर फिरवला..

“कबीर.. कुठे आहेस?”, मोनिका

“अं.. बाहेर आहे जरा…”

“बाहेर? बाहेर म्हणजे कुठे?”

“ड्राईव्ह करतोय.. बोल ना..”

“कामात आहेस का?”

“हं.. मी राधाकडे चाललोय.. नंतर बोलुयात का?”

“अं.. नको..ऐक ना.. जरा महत्वाचं बोलायचं होतं…”

"..."

"कबीर.. ऐकतोएस.. का?"

"मोनिका हे बघ.. आपण जरा नंतर बोलुयात ओके..?" असं म्हणून कबीरने फोन बंद केला आणि स्विच्ड ऑफ़ करून टाकला.

कबीरचा फोन बंद बघून मोनिकाने रोहनला फोन केला..

"रोहन्या.. अरे तो ऐकतचं नाहीए, बंद करून टाकलाय फोन त्याने.."

"च्यायला ह्या कबीरच्या.. बरं तू कुठे आहेस आत्ता?"

"मी स्टुडीओमध्येच आहे.."

"शूट चालु ए का?"

"नाही.. जस्ट एडीटींग करतेय पिक्सचं.."

"बरं ऐक.. मी निघतोय इथनं.. तुझ्या इथे येतो.. तुला पिक-अप करतो आणि आपण थेट राधाच्या घरी जाऊ.. ओके?"

"हम्म.. ओके.. मी स्टूडीओ लॉक करून खाली थांबते.."

"ओके.. बाय देन.."

"बाय..."

रोहन ऑफ़ीस बंद करून मोनिकाकडे जायला निघाला तेंव्हा कबीर राधाच्या बिल्डींगच्या पार्कींगमध्ये गाडी लावत होता.

राधाने कबीरसाठी दार उघडले तेंव्हा ती अगदीच अवतारात होती. केस मोकळेच आणि अस्ताव्यस्त होते, डोळे आणि नाकाचा शेंडा रडून लाल झालेला दिसत होता. हातामध्ये दोन-तिन टिश्यु पेपर्स चुरगळलेले धरलेले होते.

“यु ओके?”, कबीरने आत येत विचारले

“हम्म… सॉरी.. घरात जरा पसारा आहे..” सोफ़्यावरचे कपडे, पुस्तकं उचलत राधा म्हणाली..

“इट्स ओके.. बोल काय झालं..?”

राधाने काही न बोलता चॉकलेटी इन्व्हलोपमधील डिव्होर्सची नोटीस कबीरच्या हातात दिली.

कबीर सोफ़्यावर बसला आणि त्याने सुरुवातीपासून शेवटापर्यंत ती नोटीस वाचून काढली..

“खूप सॅड आहे हे राधा.. अनुरागसारख्या रिस्पॉन्सीबल आणि रिस्पेक्टेड माणसाकडून तरी हे अपेक्षीत नव्हतं..”, नोटीस वाचून झाल्यावर कबीर म्हणाला..

“बघ की..डिव्होर्ससाठी तर आम्ही दोघंही तयार होतो.. मग असे खोटे, खालच्या पातळीला जाऊन आरोप कश्याला करायचे?”, राधाचे पुन्हा डोळे भरून आले होते.. “आणि सॅड पार्ट म्हणजे ही नोटीस त्याने माझ्या घरच्या पत्यावर पाठवली होती.. हे.. हे सगळं वाचून माझ्या आई-वडीलांना काय वाटलं असेल कबीर??”

“हे बघ राधा.. तू आधी शांत हो.. मी पेग बनवतो.. काय बनवु?”, कबीर सोफ़्यावरून उठत म्हणाला..

“ॲन्टीक्वेटी ९०.. ऑन द रॉक्स..”, राधा म्हणाली..

कबीरने कपाटातून व्हिस्कीची बॉटल काढली आणि दोघांसाठी दोन पेग बनवले..

“अनुराग आणि मी दोन वर्ष एकत्र होतो कबीर.. इतकं तर त्याला कळायला हवं ना की मी इतक्या खालच्या पातळीला जाईन का? तिकडे गोकर्णमध्ये मी काय त्या हिप्पी लोकांबरोबर झोपायला रहात होते का? एम आय अ बिच कबीर??”, राधा मुसमुसत म्हणाली..

“राधा.. मी म्हणालो ना तुला.. इट्स ऑल ए ब्लेम गेम.. त्याला फ़क्त हे सिध्द करायचंय की तो सही आहे.. तू चुक आणि म्हणून हा डीव्होर्स होतोय..”, कबीर राधाला समजावणीच्या सुरात म्हणाला..

राधाने आपला पेग संपवला आणि दुसरा बनवला..

“मान्य आहे कबीर.. पण हे सगळं मी मुकपणे मान्य करु का? तेथे सेशन्स-कोर्टात डिव्होर्सच्या आधी माझे आई-बाब पण बरोबर असणार.. त्यांच्यासमोर मी म्हणु की हे खरं आहे? आणि जर का हे अमान्य केलं.. तर त्या केसला पुन्हा फाटे फुटतील.. खऱ्या-खोट्याची शहानीशा करण्यासाठी वकील आपल्या बाह्या सरसावून पुढे सरकतील.. आणि न जाणो पुढचे कित्येक महीने हेच चालु राहील…”

राधाने आपला दुसरा पेगही एव्हाना संपवला आणि तिसरा भरला..

“राधा.. सांभाळून.. डोन्ट ओव्हरड्रिंक ओके?”, कबीर

पण राधाचं त्याच्याकडे लक्षचं नव्हतं.. ती स्वतःशीच जणु बोलत होती.. तिने तिसरा पेगही बॉटम्स-अप केला. व्हिस्कीचा तो गरम पेग तिच्या घश्याला जाळत गेला. तिच्या कपाळावर आठ्यांच एक जाळं पसरलं.. तिने ग्लास टेबलावर आपटला आणि चेहऱ्यावर कोसळणारे केस सांभाळत ती खुर्चीकडे सरकली आणि तिचा तोल गेला.

“राधा.. सांभाळ..”, कबीर पट्कन सोफ्यातून उठला, त्याने राधाला खांद्याला धरून सोफ़्यावर बसवले..

राधाने दुःखाने आपले डोळे बंद केले होते..

“कबीर.. खरंच आयुष्याचे निर्णय घेताना मी चुकलीए का रे?”

“नाही राधा.. आपण आपल्या आयुष्याचे मालक असतो ना? मग आपले निर्णय आपण सार्थ ठरवायचे असतात.. ते चुकले तर मार्ग बदलायचा, पण जे आपल्याला हवंय ते साध्य करून घ्यायचंच..”

“कित्ती छान बोलतोस तू कबीर.. हम्म.. लेखक आहेस नं म्हणून असं बोलु शकतोस.. पण माझं काय? माझे विचार म्हणजे फ़क्त कचराच असतो सगळा..”

राधा सोफ़्यावर थोडीशी कलंडून कबीरच्या खांद्याला टेकून बसली.. कबीरच्या ह्लदयाची धडधड कमलीची वाढली होती..

“मी नेहमीच फ़क्त आणि फ़क्त माझाच विचार केला कबीर.. मला काय हवंय, इतरांसाठी कधीच वागले नाही.. पण आता वाटतंय.. ह्यामुळेच मी आज एकटी आहे.. मन मोकळं करावं..कुणाचा सल्ला घ्यावा असं कोणीच नाही रे माझ्या आयुष्यात.. असं वाटतंय कंटाळा आलाय ह्या एकटेपणाचा.. आज तिशीत असतानाच ही परीस्थीती.. पुढे जाऊन तर काय होईल मग?.. असं वाटतं.. असं वाटतं की कोणी तरी हवं सोबतीला..”

तिने अचानक डोळे उघडून कबीरकडे बघीतलं…

“आठवतंय.. त्या दिवशी बिचवर मी तुला काय म्हणाले होते?”

“काय?”

“आय.. लव्ह.. यु.. कबीर.. असंच म्हणाले होते ना…”

“हम्म..”

“आय स्टील लव्ह यु कबीर.. आय वॉंट यु इन माय लाईफ़... नॉट जस्ट फ़ॉर सम टाईम.. बट फ़ॉर लाईफ़-टाईम.... होशील तू माझा???”

कबीर ह्या अनपेक्षीत धक्याने बधीर होऊन गेला..

“किस मी डीप कबीर... आय वॉन्ट टु लिव्ह इन धीस मोमेंट.. प्लिज कीस मी..”,

राधाने डोळे बंद केले....

कबीरला आपल्या शरीरातल्या नसां-नसा फुट्तील की काय असं वाटत होतं...

“राधा.. मला वाटतं तू शुध्दीत नाहीएस.. आपण नंतर बोलुयात का?”

“कमऑन कबीर.. इट्स जस्ट ३ पेग्स.. मी इतकी पण कमकुवत नाहीए.. पुर्ण शुध्दीत आहे मी.. हे बघ..” असं म्हणून राधा सोफ़्यावरून उतरून कबीरसमोर उभी राहीली.. “बघ.. मी सरळ उभी आहे नं..”

“हम्म...”

अचानक राधा आपल्या गुडघ्यावर वाकली आणि कबीरचा हात हातात घेऊन म्हणाली.. “लेट्स गेट मॅरीड?”

रोहन आणि मोनिका संध्याकाळच्या ट्रॅफीकमधून धरपडत राधाच्या घरापाशी पोहोचले...

“शिट्ट रोहन.. एक तास लागला आपल्याला...”

“हम्म.. नॉट टु वरी.. कबीर आहे बघ अजून..”, पार्कींगमध्ये उभ्या असलेल्या कबीरच्या गाडीकडे बोट दाखवत रोहन म्हणाला.

“हो रे.. चल पट्कन..”

लिफ़्टसाठी न थांबता दोघंही चारमजले चढुन राधाच्या घरापाशी पोहोचले आणि त्यांनी बेल वाजवली..

बऱ्याच वेळानंतर राधाने दार उघडले..

“ओह हाय रोहन.. हा मोनिका..”, दोघांना दारात बघून आश्चर्यचकीत होत राधा म्हणाली..

“कबीर आहे?”, रोहन

“हो.. आहे नं.. का? काय झालं?”

रोहनचा आवाज ऐकून कबीरही आतमधून बाहेर आला..

रोहन आणि मोनिका दोघंही कबीरचा चेहरा वाचण्याचा प्रयत्न करत होते..

“रोहन? काय झालं.. ये नं आतमध्ये ये…”, दोघांना आतमध्ये घेत कबीर म्हणाला..

दोघंही आतमध्ये आले..

“कॉफ़ी घेणार?”, राधाने विचारलं..

“अं.. नाही नको…”, मोनिका

“अगं घे.. मी टाकतंच होते.. बसा मी येतेच दोन मिनिटांत..”, असं म्हणून राधा आतमध्ये गेली..

“इकडे कसे काय आलात दोघं?”, कबीरने रोहन आणि मोनिकाला विचारलं..

“कबीर.. एव्हरीथींग ऑलराईट?”, रोहनने विचारले..

“हो.. अ‍ॅबस्युलेटली? का?”, कबीर

“नाही तू म्हणालास ना मगाशी.. गोची झालीए.. राधा रडतीए वगैरे…”, रोहन

“हम्म. मगाशी ती डिस्टर्ब्ड होती.. पण एव्हरीथींग इज ऑलराईट नाऊ..”, कबीर हसत हसत म्हणाला..

रोहन पुढे काही बोलणार एव्हढ्यात राधा कॉफ़ीचे कप घेऊन बाहेर आली.

कॉफ़ी पिताना रोहन आणि मोनिका दोघांनीही एक गोष्ट नोटीस केली की कबीर आणि राधा एकमेकांकडे बघून मधूनच हसत होते.. तर दोघांच्या काहीतरी खाणाखूणा चालल्या होता..

शेवटी न रहावून रोहनने विचारले… “तुमच्या कानगोष्टी चालणार असतील.. तर आम्ही जाउ का?”

“नाही रे.. सॉरी.. प्लिज बस..”, कबीर रोहनला थांबवत म्हणाला..

“अ‍ॅक्युचली.. इट्स टु अर्ली.. पण आम्हाला तुम्हा-दोघांना काहीतरी सांगायचंय..”, राधा कबीरकडे बघत म्हणाली..

“काय झालंय..”, रोहन आणि मोनिकाने एकमेकांकडे चिंतीत नजरेने बघीतले आणि विचारले..

एक मोठ्ठा पॉज घेऊन राधा म्हणाली.. “वुई आर गेटींग मॅरीड…”

“वुई-आर गेटींग मॅरीड…”, फुल्ल एनर्जीने राधा पुन्हा एकदा म्हणाली, पण रोहन आणि मोनिका शॉक लागल्यासारखे आधी एकमेकांकडे तर एकदा कबीर-राधाकडे बघत होते. “आर यु नॉट हॅप्पी?”, राधा काहीसे चिडून रोहनला म्हणाली..

“येस.. येस.. वुई आर.. पण हे कधी ठरलं?”, रोहन..

“आत्ता.. जस्ट.. काही मिनीटांपुर्वी…”, कबीर..

“पण राधा.. तुच लग्नाला तयार नव्हतीस ना.. तुला तुझं करीअर.. तुझं स्वातंत्र्य.. तुझ्या टर्म्स अ‍ॅन्ड कंडीशन्स…!”, रोहन

“वुई विल वर्क इट आऊट.. कॉम्प्रमाईज तर करावं लागेलचं ना.. थोडं मला.. थोडं कबीरला.. पण आम्ही दोघंही त्यासाठी तयार आहोत..”, कबीरचा हात हातात घेत राधा म्हणाली..

“पण.. तू आधी तर पुर्ण विरोधातच होतीस ना?”, मोनिका..

“होते.. आता नाही.. सो?”,खांदे वाकडे करत राधा म्हणाली.. “थिंग्स चेंज.. पिपल चेंज.. प्रायोरीटी चेंज..”

“तू आई-बाबांशी बोललास कबीर?”, रोहन..

“नाही..अजून तरी नाही.. बोलेन मी..लवकरच..”, कबीर

“आणि ते तयार नाही झाले तर..”, मोनिका..

"हॅंग ऑन… आम्हाला आमच्या लग्नात काही प्रॉब्लेम दिसत नाहीत.. मग तुम्हीच का एव्हढे हायपर होताय..?", काहीसं त्रासीक होत राधा म्हणाली..

मोनिकाने काही तरी बोलण्यासाठी तोंड उघडलं.. पण रोहनने हळुच तिचा हात दाबुन तिला गप्प केलं..

"हो.. ते ही खरं आहे म्हणा.. गुड.. वुई आर हॅप्पी फ़ॉर यु..", रोहन खुर्चीतून उठत म्हणाला.. "एनीवेज.. कॅरी ऑन.. आम्ही निघतो…"

"अरे पण तुम्ही एव्हढं घाई-गडबडीने आलात कश्याला होतात..", कबीरने विचारलं..

"अं.. हं… आम्ही पिक्चरला जायचं का विचारायला आलो होतो.. पण जाऊ देत आता.. ऑलरेडी उशीर झालाय.. अन ट्रॅफ़ीकमधून जाईपर्यंत शो सुरु होऊन जाईल…", रोहनने हळुच मोनिकाला निघायची खुण केली..

दोघंही जायला निघाले तसं कबीरही उठला आणि त्याने रोहनला मिठी मारली..

"आय होप यु नो व्हॉट यु आर डुईंग..", रोहन हळुच म्हणाला आणि मग राधाला बाय करून तो आणि मोनिका बाहेर पडले..

**********************

"सो?", रोहन आणि मोनिका गेल्यावर राधा कबीरच्या मिठीमध्ये समावत म्हणाली.. "शेवट मिळाला तर तुला तुझ्या पुस्तकाचा…"

"फायनली…", कबीर हसत हसत म्हणाला..

“आपलं आयुष्य कित्ती डायनामीक असतं नै? सकाळी उठलो तेंव्हा विचार तरी केला होता का की आजचा दिवस असा संपेल..”, कबीर म्हणाला..

“एक्झाक्टली.. मला असंच आयुष्य आवडतं कबीर.. अनप्लॅन्ड.. असं आयुष्यातल्या प्रत्येक वळणावर आपल्याला वाटलं पाहीजे पुढे काय असेल.. आणि आयुष्याने पण आपल्याला असं प्रत्येक वेळी नविन नविन सर्प्राईज दिलं पाहीजे. असं चार चौघांसारखं प्लॅन करून.. कणाकणाने झिजत मला नै जगायचंय कबीर.. होप तू समजून घेशील मला..घेशील ना?”, राधा

“आता ठरलंय न आपलं.. दोघांनीही कॉम्प्रमाईज करायचं.. मग झालं तर.. जमेल आपल्याला पण..”, कबीर

“कबीर..”, अचानक काही तरी आठवल्यावर राधा कबीरच्या मिठीतून बाजुला झाली आणि म्हणाली.. “मला तुझी ती मैत्रीण आहे नं.. रती.. तिला भेटायचंय..”

“रतीला? का?”

“कबीर.. तिला आवडतोस तु.. आय जस्ट वॉन्ट टु मेक शुअर की आवर डिसिजन इज नॉट हर्टींग हर..”

“काहीही.. अगं आम्ही दोघं मित्रं आहोत चांगले..”

“असेल.. तुझ्या दृष्टीने असेल.. पण तिच्या नाही.. एक स्त्री दुसऱ्या स्त्रीच्या डोळ्यात बघून तिच्या मनात काय चाललय ते ओळखु शकते. ती जेंव्हा तुझ्याकडे बघते ना.. तिची नजरंच सगळं बोलून जाते..शी लव्हज यु…”

“हो गं.. काय डोळे आहेत यार तिचे…”

“एय… माझ्यासमोर दुसऱ्या मुलीची तारीफ़ काय करतोस..? शर्म कर शर्म..”, कबीरला फटके मारत राधा म्हणाली

कबीरच्या मेंदुने.. त्याच्या डोक्याने राधाचं ते वाक्य सहज धुडकावून लावलं होतं.. पण त्याच्या हृदयाचा हळुच.. नकळत.. एक ठोका चुकून गेला होता..

“बरं.. ते सोड.. मी आई-बाबांना फोन करून सांगू आपल्याबद्दल..?”, कबीर

“ए.. नको इतक्यात?”

“का? त्यात काय झालं.. उद्या सांगायचं ते आज.. ते खूप खुश होतील..”

“नको ना कबीर.. मला भिती वाटते..”

“भिती? कसली?”

“त्यांना आपला हा निर्णय नाही आवडला तर..”

“वेडी आहेस का? असं काहीच होणार नाही.. आणि बाबांनी तर माझं पुस्तक सगळं वाचलंच आहे नं.. त्यांना माहीते सगळं आपल्याबद्दल..”,असं म्हणून कबीरने बाबांना फोन लावला..

**********************

“रोहन.. आपण आता काय करायचं रे...”, बाहेर गाडीत बसल्यावर मोनिका म्हणाली..

“हो ना.. पण काही तरी केलंच पाहीजे.. कारणं हे लग्न झालं तर कबीर.. राधा आणि रती कुणीच खुश रहाणार नाही हे नक्की..”, रोहन

“पण काय? काय करायचं?”

“मला वाटतं आपल्याला रतीला भेटायला हवं.. तिच्यासाठी दहा दिवस वाट बघत थांबणं मुर्खपणाचं ठरेल..”

“पण अरे.. तिथून सोडत नाहीत बाहेर..माहीते ना..”

“माहीती आहे.. पण प्रयत्न तर करायला हवा.. तू एक काम कर ना.. कसंही करून तिच्या घरून.. त्या विपश्यना केंद्राचा पत्ता घे.. उद्या दोघंही आपणं जाऊ तिथे..ओके?”

“ठिक आहे.. पण आत्ता काही तरी खाऊया का..? मला सॉल्लीड टेंन्शन आलंय, अन म्हणून भुक पण लागलीए..”, मोनिका पोटावरून हात फ़िरवत म्हणाली..

“मला पण..”, असं म्हणून रोहनने गाडी रेस्तॉरंटकडे वळवली..

“सर.. सर.. प्लिज लिसन..खरंच खूप्पच अर्जेन्सी आहे, म्हणून तर आलो नं आम्ही.. आम्हाला पुर्ण कल्पना आहे.. दहा दिवस कुणालाही भेटू नाही शकत.. पण आम्हाला रतीला भेटणं खूप्पच महत्वाचं आहे..” रोहन रिसेप्शनवरच्या एका टकलू, हडकुळया माणसाला सांगत होता..

“मला माफ़ करा.. पण ते शक्य नाहीए.. ह्याची पुर्ण कल्पना आम्ही आधी दिलेली असते. आत्ताशीक दोनच दिवस झालेत आणि दिक्षार्थी आत्ता कुठे स्वतःशी समरुप होऊ पहात आहेत.. तुमच्या भेटण्याने त्यांचे…”

“सर.. मला माहीत आहे.. पण इतकी अर्जेन्सी असल्याशिवाय इथे येऊ का आम्ही? फ़ॅमीली एमर्जेन्सी आहे..तुम्ही..रतीला विचारून बघा..ती नाही म्हणाली भेटायचं तर आम्ही निघून जातो…”, रोहन

“तुम्ही कोण त्यांचे? आणि फ़ॅमीली एमर्जेन्सी आहे तर तिचे आई-वडील का नाही आले मग?”

“नाही येऊ शकले ते.. नाही येऊ शकत आहेत.. तीच तर एमर्जेन्सी आहे.. प्लिज..”

शेवटी काहीसं अनीच्छेनेच तो गृहस्थ आतमध्ये गेला.

साधारणपणे १५ मिनिटांनंतर रती बाहेर आली. रोहन आणि मोनिकाने प्रथम तिला ओळखलेच नाही. पांढरा रंगाचा पायघोळ झगा, मोकळे सोडलेले केस, कपाळाला चंदनाचा टिळा.. पण त्याहीपेक्षा महत्वाचे म्हणजे तिच्या चेहऱ्यावर पसरलेले कमालीचे शांत भाव.

रोहन आणि मोनिकाला पाहून ती किंचीत हसली आणि काही नं बोलता दोघांना बाहेर बागेत चलायची खुण केली.

बागेत गेल्या-गेल्या रोहनने सरळ मुद्यालाच हात घातला.. “रती.. कबीर आणि राधा..लग्न करताएत..”

पण रतीच्या चेहऱ्यावरची रेषाही हालली नाही, जणु तिला ह्याची कल्पना होती.. किंवा हे असे काहीतरी होणार हे तिला अपेक्षीतच होते.

रती काहीच बोलली नाही..

“तुला शॉक नाही बसला?”, मोनिकाने आश्चर्याने विचारले..

रतीने मानेनेच नाही अशी खुण केली..

“तुला काहीच विचारायचे नाहीए? हे कधी झालं? कसं झालं? वगैरे?”

“ही ईमर्जेन्सी होती तुमची?”, किंचीत हसत, विषयाला बगल देत, रती हळु आवाजात म्हणाली..

“हो.. आणि तुला आत्ताच्या आत्ता हे सोडून आमच्याबरोबर यावं लागेल..”, रोहन

“का?”

“का काय? वुई हॅव टु स्टॉप देम गेटींग मॅरीड.. डोंन्ट यु लव्ह कबीर?”

“आय डु..”, दोन क्षण शांततेत गेल्यावर रती म्हणाली...

“मग? तू इथे बसून काही होणार नाहीए..”, मोनिका

“मला जायला हवं.. मी आठ दिवसांनी आले की बोलु.. तुम्ही निघा आता..”, असं म्हणून रती माघारी वळली.

रोहनने निराशेने हात हवेत उचलले आणि तो म्हणाला.. “रती.. प्लिज आल्यावर मला फोन कर...”

रतीने मागे न बघताच हाताने थम्ब्स-अपची खुण केली आणि ती आतमध्ये निघून गेली.

**********************

“आय एम सो हॅप्पी रोहन...”, टेबलावर हाताची बोटं वाजवत कबीर म्हणत होता.. “आज पहील्यांदा मी राधाला घरी घेऊन गेलो होतो आई-बाबांची भेट घालून द्यायला..”

“हम्म..”

“आई फ़ारसं काही बोलली नाही, पण बाबा छान बोलले. आई पण बोलेल हळु हळु..”

“रती पाहीजे होती आत्ता…”

“का?”

“का काय? राधाशी तिची भेट घालून दिली असती ना..”

“का?”

“तू असा तुसड्यासारखा का वागतो आहेस रोहन..? गेले काही दिवस बघतोय मी..”, कपाळाला आठ्या घालत कबीर म्हणाला..

“हम्म.. जाऊ देत ना.. कश्याला उगाच आपल्यात वितुष्ट तुझ्या पर्सनल गोष्टींमुळे.. मी ठरवलंय..लेट्स बी प्रोफ़ेशनल..”

“पण का? झालंय तरी काय?”

“कबीर.. तुला काहीच वाटत नाही? इतका बेजबाबदार कसं वागु शकतोस तु? आधी मोनिकाला सोडलंस..”

“एक मिनीट.. मी मोनिकाला सोडलं नाही.. आणि पुढे काही बोलायच्या आधीच सांगतो.. मी राधालाही सोडलं नव्हतं.. इन्फ़ॅक्ट आम्ही एकमेकांना ऑफ़ीशली कधी ॲक्सेप्टच केलं नव्हतं..”

“आणि रती? तिच्याबरोबर डेटींग करत नव्हतास तु? आणि आता राधा काय परत आली…”

“हम्म.. मान्य आहे.. मान्य आहे मी रती बरोबर डेटींग केलं.. बट इट वॉज जस्ट अ प्लेन, सिंपल, फ़्रेंडली डेटींग.. मी कधीच तिला मिस-युज नाही केलं.. कधी आम्ही दोघांनी एकमेकांना शारीरीक दृष्ट्या जवळ नाही केलं..”

“आणि मानसीक दृष्ट्या? तू कधीच तिच्यात मनाने गुंतला नव्हतास?. बरं तुझं सोड, ती.. ती गुंतली असेल तुझ्यात तर?”

“हे बघ रोहन.. मी तिला कधी तशी हिंट दिली नव्हती.. मला ती आवडली होती.. कुणालाही आवडेल.. मला वाटतं ते एक तात्पुर्त आकर्षण होतं.. प्रेम नाही..”

“मग आता कशाला तुला रती हवीय? कश्याला तुला तिची आणि राधाची भेट घालून द्यायचीय? काय प्रुव्ह करायचंय तुला?”

“ठिक आहे..तुला वाटत असेल मी भेटू नये.. तर तसंच.. नाही भेटणार मी तिला.. खुश?”, असं म्हणून कबीर तेथून रागाने निघून गेला..

**********************

कबीर, राधा, रोहन आणि मोनिका एका संध्याकाळी कॅफ़े मध्ये बसले होते.

“बोल कबीर.. कश्याला बोलावलंस आम्हाला इथे?”, कॉफ़ीचा सिप घेता घेता रोहन म्हणाला..

“पुढच्या २६ तारखेला आम्ही लग्न करतोय..”, कबीरला थांबवत राधा म्हणाली..

“२६? वॉव्व.. अलमोस्ट महीनाच राहीला की..”, रोहन..

“कॉन्ग्राट्स.. कार्यालय वगैरे पण मिळालं?”, मोनिका

“अं.. नाही.. आम्ही साधंच करणारे लग्न.. रजीस्टर्ड.. म्हणजे.. ह्याला साग्रसंगीत.. मोठ्ठं लग्न करायची इच्छा आहे..”, राधा

“असणारच, पहीलंच लग्न आहे नं त्याचं..”, राधाचं वाक्य मध्येच तोडत मोनिका म्हणाली..

राधाला त्या वाक्यातली खोचं लक्षात आली तशी ती काही क्षण गप्प झाली..

“सॉरी.. रिअल्ली सॉरी.. आय डिडंन्ट मिन्ट इट.. मी आपलं सहज बोलून गेले..”, मोनिका

“नो.. इट्स ओके.. फ़ॅक्ट आहे.. की माझं लग्न झालंय आधी.. सो नो हार्ड् फ़िलिंग्स.. एनिवेज.. तर पुढच्या शनीवारी आम्ही एक पार्टी थ्रो करतोय सगळ्या फ्रेंड्ससाठी.. यु बोथ आर इन्व्हायटेड.. संध्याकाळी ८.३० ला आहे.. एरीआ-५१मध्ये.. बुझ.. फ़ुड.. डान्स.. सगळं आहे..”, राधा नॉर्मल होत म्हणाली..

“मस्त.. येऊ आम्ही नक्की..”, मोनिका

“कबीर.. तू रतीला सांगीतलंस का?”, राधा

“अरे हो.. रोहन.. रती आली का परत? कधी येणार होती?”, कबीर

“आली असावी.. परवाच येणार होती खरं.. मी फोन पण केला होता तिला.. पण तिचा फोन बंदच येतोय…”, रोहन

“थांब आपण मेरीएटला लावु फोन.. डेस्कवर असेल ती…”, असं म्हणून कबीरने तिचा डेस्कचा नंबर फ़िरवला..

दोन रिंग वाजल्या आणि पलीकडून तोच ओळखीचा.. मधुर.. मनावर शहारे आणणारा आवाज कबीरच्या कानावर पडला…

“गुड इव्हनींग .. मेरीएट.. मे आय हेल्प यु?”

कबीर काहीच बोलला नाही..

“हेल्लो.. मे आय हेल्प यु?”, पलीकडून रतीने परत विचारले..

“येस.. येस, यु कॅन हेल्प मी..”, राधा आपल्याकडेच बघते आहे हे लक्षात येताच कबीर सावरून म्हणाला..

रतीने बहुदा कबीरचा आवाज ओळखला होता.. ती काहीच बोलली नाही..

“रती.. कुठे आहेस तु? केंव्हापासून तुला भेटण्याचा प्रयत्न करतोय…कबीर बोलतोय..”, कबीर..

“ओ हाय कबीर..कबीर.. वर्क-लाईनवर नको बोलुयात? मी नंतर फोन करते…”, रती

“ओके ओके.. नो प्रॉब्लेम.. हे बघ.. रोहन नंतर तुला फोन करून काय ते सांगेल.. भेटुच आपण लवकर.. पण प्लिज तुझा फोन चालु कर.. बाय देन..”, असं म्हणून कबीरने फोन बंद केला…

“काय रे? काय झालं?”, राधाने अधीरतेने विचारलं

“अगं ती कामात आहे.. नंतर बोलते म्हणाली…”

“पण मग रोहनचं काय म्हणालास…”, राधा

“मी म्हणलो.. रोहन सांगेल मग सगळं पार्टीचा व्हेन्यु वगैरे.. रोहन तू कर तिला फोन आणि नक्की यायला सांग..”

“अरे पण तुच का नाही करत आहेस फोन नंतर.. रोहनला कश्याला..”

कबीर जागेवरच जरा इंपेशंटली इकडून तिकडे हालला..

“अरे बोल ना?”

“अगं काही नाही.. समहाऊ मला वाटलं तिला माझ्याशी बोलायचं नाहीए.. म्हणून म्हणालो.. सोड ना, रोहन तू सांग रे तिला नक्की..” असं म्हणून कबीरने तो विषय तिथेच संपवला…

**********************

पार्टीला राधाच्या ऑफ़ीसमधले काही तर कबीरच्या ओळखीतले काही लोक हजर होते. कबीर नेव्ही-ब्ल्यु रंगाचा पार्टी-वेअर शर्ट-ट्राऊझर घालून होता, तर राधाने स्ट्रॅपलेस, काळया रंगाचा वन-पिस घातला होता.

काही लोकं ड्रिंक्स घेण्यात मग्न होते तर काही जणं डी.जे.च्या तालावर थिरकत होते.

कबीर स्कॉचचा ग्लास घेऊन गार्डनमध्ये उभा होता.

“कबीर.. आत चल ना.. सगळे आपल्याला डान्सला बोलावताएत..”, राधा बाहेर येऊन कबीरला म्हणाली..

“येस्स.. आलोच.. अजून रोहन आला नाहीए.. तो आला की येतोच मी..”

“अरे येईल तो.. तू बाहेर थांबल्याने लवकर येणारे का? फोन करून विचार कुठे आहे…”

“अर्ध्या-तासापुर्वी केला होता फोन.. जस्ट रतीच्या घराजवळ पोहोचतच होता तो तिला पिक-अप करायला..”

“म्हणजे ऑन-द-वे आहे.. येईल मग तो चल तू आत..”, असं म्हणून राधा त्याला हाताला धरून आतमध्ये घेऊन गेली.

दोघांना आत आलेले बघताच सगळयांनी टाळयांचा कडकडाट केला..

“हिअर कम्स द लव्ह-कपल…”

“डिजे.. मस्त रोमॅन्टीक सॉंग लाव एखादं..”

“कम-ऑन राधा.. वुई वॉन्ट बोथ ऑफ़ यु ऑन द फ़्लोअर…”

डिजे ने पेप्पी सॉंग बदलून शांत गाणं चालु केलं तस कबीरने राधाचा हात धरला आणि दोघं जण डिस्कवर नाचण्यासाठी उतरले. मंद संगीताला साजेशी लाईट्ची योजना मंद करण्यात आली. ए/सीचे तापमान आणखी खाली उतरवले गेले.

कबीरने राधाच्या कमरेखाली हात धरून तिला जवळ घेतले आणि दोघंही जण त्या मदहोश करणाऱ्या संगीताच्या चालावर नृत्य करण्यात मशगुल झाले. हळु हळु बाकीची लोकं ही त्यांच्या जोडीदाराला घेऊन नृत्यात सामील झाली.

राधाचं लक्ष विचलीत झालं ते कबीरची तिच्याभोवतीची पकड किंचीतशी सैल झाली ते जाणवुन. तिने कबीरकडे बघीतलं.. कबीरचं तिच्याकडे लक्ष नव्हते, तो दाराकडे बघत होता. राधाने वळून मागे बघीतलं.. दारात रोहन आणि मोनिकाबरोबर रती उभी होती.

कबीरने तिघांना बघून हात केला आणि मग तो आणि राधा त्या तिघांजवळ गेले.

“तुमच्या दोघांचं खूप खूप अभिनंदन..”, रती चेहऱ्यावर नेहमीचं हास्य आणत म्हणाली..

“थँक्स रती फ़ॉर कमींग..”, कबीर

“माय प्लेझर... यु गाईज कॅरी ऑन.. आम्ही बसतो इकडे..”, रती कोपऱ्यातल्या सोफ़्याकडे हात करत म्हणाली..

“व्हॉट बसतो.. चला .. डान्स करु..”, राधा रतीला ओढत म्हणाली..

“अं. नको.. सगळे कपल्संच आहेत.. मी एकटी काय करु..”, रती डान्स-फ़्लोअरकडे बघत म्हणाली...

“ओह.. मग मोनिका-रोहन.. तुम्ही तरी चला...”, राधा

“नको.. आम्ही थांबतो रती जवळ.. यु कॅरी ऑन..”, रोहन म्हणाला

“अरे. इट्स ओके.. खरंच.. आय् एम फ़ाईन.. जा तुम्ही..”, रोहन आणि मोनिकाला ढकलंत रती म्हणाली..

रतीला एकटीला सोडून जायला कबीरही काहीसा अनत्सुकच होता, पण त्याला राधाबरोबर काही बोलता येईना. शेवटी काहीश्या जबरदस्तीनेच रोहन आणि मोनिका, राधा आणि कबीर बरोबर डान्स करायला गेले आणि रती कोपऱ्यातल्या सोफ़्यावर बसली.

पाच एक मिनिटांचाच डान्स झाला असेल तोच राधाची बॉस, अवंतिका आली, तसं राधाने कबीरची तिच्याशी ओळख करून दिली आणि तिला ड्रिंक्स वगैरे सर्व्ह करायला तिच्याबरोबर बार-काऊंटरला निघून गेली.

कबीरने रती बसली होती तिकडे नजर टाकली.. रतीच्या शेजारच्या खुर्चीवर एक काळा ब्लेझर घातलेला सहा फुट उंच तरुण बसला होता.

कबीरने राधाकडे बघीतले.. ती अजूनही अवंतिकाबरोबर कोपऱ्यात गप्पा मारण्यात मग्न होती.

कबीर तडक रती बसली होती तिकडे गेला..

“मी डिस्टर्ब तर नाही ना करत आहे?”, कबीर त्या तरुणाला उद्देशुन म्हणाला.

“ओह... नॉट ॲट ऑल..”, कबीरकडे बघून तो तरुण म्हणाला आणि मग रतीला म्हणाला..”हे माझं कार्ड... कॉल मी समटाईम...”

“कोण होता तो?”, तो तरुण गेल्यावर कबीर म्हणाला..

“माहीत नाही..”, सहजतेनेच रती म्हणाली.. “मला एकटीला बसलेलं पाहून डान्सला विचारायला आला होता..”

कबीरने पहील्यांदाच रतीला जवळून पाहीले.

गडद लाल रंगाचा स्लिम-फ़िट वनपिस तिने घातला होता, टेबलावर सफ़ेद-पांढऱ्या रंगाची महागडी टोट्ट बॅग ठेवली होती. केस, पिना लावून एकाबाजुने मोकळे सोडले होते.

“वेगळीच दिसते आहेस तू खूप...”, रतीचा चेहरा निरखत कबीर म्हणाला..

“वेगळी म्हणजे?”

“म्हणजे तसं सांगता येणार नाही.. पण.. असा एक ग्लो आहे चेहऱ्यावर तुझ्या.. मे बी.. तुझ्या त्या विपश्यनेचा इफ़ेक्ट असेल..”

“असेलही..”

“बाकी.. कशी आहेस?”

“मी मस्त एकदम... आल्या आल्या कामाला जुंपलं.. दहा दिवसांच राहीलं होतं न काम..”

“आय होप.. वुई आर स्टिल फ्रेंड्स..”, काही क्षण शांततेत गेल्यावर हात पुढे करत कबीर म्हणाला..

“ऑफ़कोर्स..”, रतीने कबीरशी हात मिळवला.. तसा पुर्वीचाच तो करंट कबीरच्या नसा-नसांतून वहावत गेला..

रतीचा धरलेला हात सोडुच नये असं त्याला वाटत होतं, पण राधा त्याला शोधत येताना दिसली तसा त्याने हात सोडून दिला..

“मला खुप बोलायचंय तुझ्याशी.. का? आणि काय? माहीत नाही.. पण तू अशी दहा दिवस गायब होतीस ना, तेंव्हा मी खूप मिस्स केलं तुला..”, कबीर गडबडीत म्हणाला आणि मग मागे सोफ़्याला टेकून बसला. थोड्याच वेळात राधा पण तेथे येऊन बसली..

“तू इथे आहेस होय.. तुला तिकडे शोधतेय मी..” असं म्हणून तिने वेटरला खूण केली तसा वेटर टकीला शॉट्सने भरलेला एक ट्रे घेऊन आला..

राधाने तो ट्रे टेबलाच्या मध्यावर ठेवला आणि एक शॉट गटकून टाकला...

“हम्म.. चालु करा.. कुणाची वाट बघताय...”, असं म्हणून राधाने दुसराही शॉट उचलला..

“नो.. इट्स ओके.. आय डोंन्ट वॉन्ट”, रती म्हणाली..

“का? घेत नाहीस?”

“नाही घेते ना.. आज नकोय...”

“ए.. चल नाटकं नको करुस.. घे....”, राधा हातातला शॉट पुढे करत रतीला म्हणाली..

“अगं नकोस असेल तिला.. दे मी घेतो..”, असं म्हणून कबीरने तो शॉट घेतला...

थोड्याच वेळात रोहन आणि मोनिका सुध्दा त्यांच्याबरोबर येऊन बसले.. तो पर्यंत राधाने ५-६ शॉट्स संपवले होते..

“काय प्लॅन मग लग्नाचा..?”,रतीने विचारले..

“विशेष काही नाही.. साधंच करायचं असं मी तरी म्हणतेय.. रजीस्टर्ड.. आणि मग स्विझर्लंडला हनीमुन.. माझ्यातर्फ़े कबीरला गिफ़्ट..”, कबीरच्या मांडीवर थोपटत राधा म्हणाली..

“वॉव.. दॅट्स ग्रेट...”, रती

राधाला एव्हाना दारु चढायला लागली होती..

“रती.. तसं कबीरला विचारलं आहे मी.. बट जस्ट वॉन्ट्स टु चेक विथ यु अलसो.. मी आणि कबीर लग्न करतोय.. यु आर ओके विथ इट ना...?”

रतीने कबीरकडे बघीतलं आणि म्हणाली...”नाही.. आमच्यात तसं काही नाहीए.. हो ना कबीर?”

कबीरने तिची नजर चुकवली आणि आपलं लक्ष नाही असं दाखवलं..

“आणि तसंही.. कबीर तुझ्याशी लग्नाला तयार झालाय.. ह्याचाच अर्थ त्याचं तुझ्यावरच प्रेम आहे माझ्यावर नाहीए.. नाही का?”

“येस्स.. कबीर लव्हज मी.. आय लव्ह हिम..” अडखळत राधा म्हणाली..

चौघांच्या तासभर गप्पा चालु होत्या. ह्या काळात रतीने अनेकदा कबीरला तिच्याकडे बघताना बघीतलं. दोघांची नजरानजर होताच कबीर नजर चुकवून दुसरीकडे बघायचा, पण थोड्यावेळाने परत रती त्याला तिच्याकडे बघताना पकडायची.

एव्हाना.. बरीचशी लोकं पांगली होती.

अवंतिका.. राधाची बॉस तिला बाय करायला आली तेंव्हा राधाला धड उभं ही रहाता येत नव्हते..

कबीरचा हात धरून ती कशीबशी उभी राहीली..

“थॅंक्स अवी फ़ॉर कमींग…”, अवंतिकाला मिठी मारत राधा म्हणाली..

“कबीर.. आय थिंक यु शुड ड्रॉप हर होम.. जास्तं झालंय तिला.. शी विल पास आऊट..”, हळुच अवंतिका कबीरला म्हणाली आणि मग राधाला ‘बाय’ करून निघून गेली.

“कबीर.. प्लिज वॉशरुमपर्यंत चल.. मला.. मला उलटी होतेय..” घश्यावरून हात फ़िरवत राधा म्हणाली..

कबीरने तिला हाताला धरून उभं केलं आणि तो तिला वॉशरुममध्ये घेऊन गेला..

“मला कळत नाही, कबीर ने काय बघीतलं हिच्यात.. गॉड ब्लेस देम..”, रोहन निराशेने डोकं हलवत म्हणाला..

“एनिवेज.. चला आपण खाऊन नि्घुयात का?”, रती सोफ़्यावरून उठत म्हणाली…

तिच्या म्हणण्याला संमती देत रोहन आणि मोनिका सुध्दा उठले आणि बफ़ेमध्ये प्लेट घेऊन गेले.

थोड्यावेळाने कबीर आला आणि म्हणाला.. “हे गाईज.. मी राधाला घरी सोडून परत येतो ओके..?”

“का रे? काय झालं?”, रोहन

“अरे.. तिला चक्कर करतेय.. मळमळतय खुप.. मी येतो पट्कन सोडून ओके..वेट फ़ॉर मी..”, कबीर

“आणि तुझं जेवण? काही खाल्लंस का?”, रतीने विचारलं..

“अं.. नाही.. पण एनिवेज.. तुम्ही आहात ना?”, कबीर

“कबीर.. इट्स ऑलरेडी ११.. १२ पर्यंत आलास तर ठिके.. नाही तर नंतर भेटु .. खुप्पच लेट होईल रे..”, मोनिका म्हणाली..

“ओके नो वरीज.. बाय देन..”, असं म्हणून कबीर निघून गेला..

“वेडी आहे का ही राधा? म्हणजे आपण पण ड्रींक करतो, पण इतकं?”, मोनिका वैतागून म्हणाली..

“तरी नशीब कबीरचे आई-बाबा नव्हते इथे..”, रोहन म्हणाला..

तिघांनी थोडं फ़ार खाल्लं आणि बाहेर पडले.

“काय करायचं? थांबायचं का कबीरसाठी? ११.४५ झालेत..”, रोहनने घड्याळात बघत विचारलं

“आय थिंक लेट्स गो.. मला नाही वाटत तो येईल इतक्यात तिला सोडून..”, मोनिका म्हणाली.. “तू कशी आली आहेस रती?”

“ओला कॅब.. मी करते बुक.. येईल ५ मिनीटांत..”, रतीने आपला मोबाईल काढला आणि ओला-कॅबचे अ‍ॅप उघडले..

“मोना, तू थांब हिच्याबरोबर, मी कार घेऊन येतो पार्कींगमधून”, असं म्हणून रोहन कार आणायला गेला..

“आहे कॅब?”, मोनिकाने विचारलं..

“२० मिनिट्स .. बट इट्स ओके.. मी आत थांबते..”, रती म्हणाली.. इतक्यात समोरून कबीरची कार येऊन थांबली..

“सॉरी.. सॉरी.. मला उशीर झाला..”, गाडीतून घाई-घाईने उतरत कबीर म्हणाला.. “चला आत चला.. निवांत बसु आता..”

तोच रोहनही पार्कींगमधून कार घेऊन आला

“आम्ही निघतोय अ‍ॅक्च्युअली..”, मोनिका म्हणाली.. “का? थांबाकी थोड्यावेळ..”, कबीर

“नाही जातो अरे..थोडं कामाचा पण बॅकलॉग आहे.. रात्री बसावं लागणार आहे..”, मोनिका म्हणाली..

“व्हॉट अबाऊट यु?”, रतीला कबीर म्हणाला..

“मी ओला-कॅब केलीए बुक.. येईलच ५-१० मिनिटांत..”, रती

“चलो बाय देन..”, मोनिका कारमध्ये बसत म्हणाली.. रोहननेही गाडीतूनच बाय केलं आणि दोघं निघून गेले..

नक्की काय बोलायचं दोघांनाही सुचेना त्यामुळे, दोन मिनीटं कबीर आणि रती इकडे-तिकडे बघत उभे राहीले.

“कॅब येईपर्यंत एक-एक ड्रिंक्सचा राऊंड?”, कबीरने रतीला विचारलं..

“ड्रिंक्स.. नको.. डोकं भणभणलंय खरं ती गाणी, थंड ए/सी ने..”, रती म्हणाली…

“ओके.. मग कॉफ़ी घे, बरं वाटेल थोडं..”, कबीर..

“कॉफ़ी? इथे बारमध्ये?”, रती हसत हसत म्हणाली..

“हो.. तेही आहेच म्हणा.. स्टार-बक्सला जाऊ.. येतेस..”, कबीर आशेने रतीकडे बघत म्हणाला

“मी कॅब केलीए बुक अरे.. नंतर जाऊ कधीतरी..”, रती

“ए.. कॅबचं काय कौतुक आहे.. ती कॅन्सलही करता येते..”, कबीर

रती काहीच बोलली नाही..

“मी सोडतो तुला घरी..उशीर होणार असेल तर..”, कबीर

“नाही उशीरचा काही प्रॉब्लेम नाही.. आई-बाबा इंदोरलाच गेलेत लग्नाला, घरी कुणीच नाहीए..”, रती

“मग झालं तर.. कर कॅन्सल कर कॅब ..” कबीर

“ओके..पण मग कारने नाही.. चालत जाऊ स्टार-बक्सला ओके?”, रती

“अगं? ५ कि.मी. तरी असेल..”, कबीर..

रतीने डोळे मोठ्ठे करून कबीरकडे बघीतलं..

“ओके.. ओके.. डन..”, कबीरने गाडी रस्त्याच्या कडेला निट लावली आणि तो रतीबरोबर चा्लत निघाला..

“रात्रीचा रस्ता कित्ती वेगळा वाटतो नै? दिवसभर नुसता गोंधळ, गाड्या.. पोल्युशन, माणसांची गर्दी.. आणि आत्ता बघ ना.. सगळं शांत, निर्जन..”, रती म्हणाली

“हो, खरंय…”, कबीर..

“आठवतं.. त्या दिवशी पिटर मला रस्त्यात सोडून गेला होता.. मग तू आलास आणि नंतर आपण लॉंग-ड्राईव्हला गेलो होतो.. तेंव्हा पण असंच मस्त वाटत होतं नै..”, रती म्हणाली..

पण मग तिला अचानक लक्षात आलं तेंव्हाचा कबीर आणि आत्ताचा कबीर वेगळा आहे.. आता तो दुसरा कुणाचातरी झाला होता..

तिने विषय बदलला..

“सो.. शेवट मिळाला ना पुस्तकाचा? घे आता लिहायला पुढचा भाग.. माझ्यासारखे वाचक वाट बघत आहेत पुढच्या भागाची”, रती

कबीर अचानक हसायला लागला..

“का? काय झालं हसायला..?”, रतीने गोंधळून विचारले

“यु वोन्ट बिलीव्ह.. राधा पण हेच म्हणाली होती..शेवट मिळाला ना पुस्तकाचा..”

“हो मग, बरोबरच आहे..”

“हम्म खरं आहे.. पण असा पुस्तकासाठी पर्फ़ेक्ट एन्डींग नाही वाटते”, कबीर

“का? ‘पर्फ़ेक्ट एन्डींग’च तर आहे की.. तुला जी आवडली.. जिच्यासाठी तू दर-दर भटकलास.. तिच्यासाठी वेडा-पिसा झालास.. ती तुला मिळाली.. अजून वेगळा शेवट काय पाहीजे?”, रती

“हो पण बघ ना.. असं नाहीए की मीराला नायक आवडत नव्हता.. पण तरीही ती त्याला एकट्याला सोडून निघून जाते. का? कारण तिला स्वतःचं असं आयुष्य हवं असतं, आयुष्याकडून तिच्या काही वेगळ्या अपेक्षा असतात.. आणि म्हणूनच तर पहीलं घर सोडून ती आलेली असते नं. पुढे जेंव्हा त्यांची भेट होते.. तेंव्हा पण ती कन्फ़ेस करते की तिचं सुध्दा प्रेम आहे म्हणून.. पण तेवढ्यापुरतंच.. तिला जायचंच नाहीए ह्या रिलेशनशीपध्ये पुढे.. मग अचानकच तिला साक्षात्कार होतो की तिला आयुष्यात कोणीतरी हवंय बरोबर.. आता ती तयार आहे ॲडजस्टमेंट्स करायला.. पण कश्यावरून तिचा निर्णय पुन्हा बदलणार नाही? कश्यावरून ती पुन्हा निघून जाणार नाही? कश्यावरून दोघांच्या आयुष्यात अपेक्षीत असलेली ॲडजस्टमेंट् फ़क्त नायकाच्याच वाट्याला येईल?” कबीर एकावर एक प्रश्न निर्माण करत होता..

“कबीर..”, रतीने कबीरला चालता चालता थांबवले.. “हे प्रश्न तुझ्या पुस्तकातल्या नायकाला पडलेत की पर्सनली तुला पडलेत?”

“कदाचित दोघांनाही…”, रतीकडे बघत कबीर म्हणाला..

“कबीर.. आयुष्यात कुणीच पर्फ़ेक्ट नसतं.. हे तर पटतय नं तुला?”

“हम्म..”

“नात्यामध्ये ॲडजस्टमेंट् असतेच.. असायलाच हवी.. मग ती त्याने करायची? का तिने करायची हा प्रश्न जर उपस्थीत होत असेल तर तो इगो आहे.. आणि इगो कुठल्याही रिलेशनला घातकच असतो..”

“मान्य.. पुर्ण मान्य.. पण म्हणून फ़क्त एकच जण ॲडजस्टमेंट् करत राहीला आणि दुसरा त्याचा गैरफ़ायदा घेत राहीला तर?”

“मग तू हे सगळं लग्न व्हायच्या आधीच का नाही क्लिअर करून घेत? एकमेकांकडून असलेल्या अपेक्षा जर आधीच समजून घेतल्या तर ते बरं नाही होणार? हे जे काही प्रश्न तुला पडलेत तेच तू राधाला का नाही विचारलेस?”

“मला.. मला भिती वाटते?”

“काय?”, रती पुन्हा चालता चालता थांबली

“हो.. मला भिती वाटते..”, कबीर पुन्हा.. पण जरा स्पष्टपणे म्हणाला..

“कसली?”

“राधाची..”

“कमॉन कबीर.. अरे भिती काय वाटायची?”, डोळे मोठ्ठे करत रती म्हणाली..

“हो म्हणजे.. ह्यावरून आमच्यात भांडणं झाली आणि ती मला सोडून गेली तर?”

“कबीर.. अरे…”, रतीला पुढे काय बोलावं हेच सुचेना.. “अरे.. अश्या छोट्या छोट्या गोष्टींवरून कोणी सोडून जातं का कुणाला? आपलं सहजीवन आहे, एकमेकांमधले गैरसमज आधीच दूर करून घ्यायला हवेत नं? का ते असे कुठेतरी अडगळीत दडवून ठेवायचे.. न सोडवता..”

“बरोबर.. असं कुणी कुणाला सोडून जाणार नाही .. पण राधा? तिची काही गॅरेंन्टीच नाही गं.. राधा म्हणजे ना अशी एक सुबक, नाजुक वस्तुसारखी आहे.. जी दुरूनच बरी वाटते.. हातात घेतली आणि तुटून गेली तर अशी भिती वाटावी अशी..”

“अशक्य आहेस तु.. कसं व्हायचं तुझं..”, मान हलवत रती म्हणाली..

मान हलवताना, तिचे मोकळे सोडलेले केस एका खांद्यावरून दुसऱ्या खांद्यावर मोकळेपणाने हिंदकाळात होते.. तिच्या हातातले चंदेरी रंगाचे ब्रेसलेट केस सावरताना त्या

काळ्याभोर केसांवर उठून दिसत होते. तिचे गोरे गोरे पाय, नाजुक कंबर.. तिने लावलेल्या पर्फ़्युमचा सुगंध कबीरला मदहोश करत होता.

स्टार-बक्सचं दार उघडताच स्ट्रॉंग कॉफ़ीचा सुगध दोघांच्या नाकात शिरला.. दोघांनीही एकाचवेळी दीर्घ श्वास घेऊन तो सुगंध श्वासामध्ये भरून घेतला.

दोघांनीही ऑर्डर दिली आणि मग बाहेरचा रस्ता दिसेल अश्या मोठ्या काचेपाशी कप घेऊन दोघंही बसले.

“रती…”, बराच वेळ शांततेत गेल्यावर कबीर म्हणाला.. “हम्म..”, कॉफ़ीचे घोट घेताघेता रती म्हणाली..

“एक विचारु?”

“विचार की..”

“डोंन्ट गेट मी रॉंग..ओके..”

“बापरे.. काय विचारणार आहेस असं?”

“त्या दिवशी.. तुझ्या घरी.. तुझ्या खोलीत.. तो एक मोमेंट होता.. तुला असं वाटत होतं की आपण दोघं…”

“हम्म..”, कबीरकडे न बघता रती म्हणाली..

“मग बोलली का नाहीस काही?”

“तू का नाही मला जवळ घेतलंस?”, रती कबीरच्या डोळ्यात बघत म्हणाली..

“मी.. मी कन्फ़्युज्ड होतो.. मलाच कळत नव्हतं मला कोण हवंय.. तु? का राधा?.. आणि मग मला असं वाटलं.. तेंव्हा आपण एकत्र आलो.. अन नंतर समजा मी आणि राधा एकत्र आलो.. तर तुला उगाच फ़सवलं असं होईल.. सो…”

रतीने कप खाली ठेवला आणि ती जोर-जोरात हसायला लागली…

“शट-अप रती.. हसायला काय झालं?”, कबीर चिडून म्हणाला

“फ़सवल्यासारखं काय होईल अरे…”, रतीला अजूनच जोरात हसायला आलं…

“हो मग.. मी तेंव्हा तुला मिठी मारली असती आणि नंतर…”

फ़िस्स… रती हसु दाबायचा प्रयत्न करत होती.. पण पुन्हा एकदा ती अजूनच जोरात हसायला लागली…

“खरंय हो कबीर तुझं.. उगाच मी तुझ्यावर फ़ौजदारी दावा वगैरे दा्खल केला असता.. मला मिठी मारल्याबद्दल कलम क्रमांक सो ॲन्ड सो अंतर्गत जज-साब इसे कडी-सेक-कडी सजा दी जाये… अशक्य.. केवळ अशक्य..”, असं म्हणून रती पुन्हा हसायला लागली

हसून हसून हसून तिच्या डोळ्यातून पाणी यायला लागले…

सहन होईना म्हणून ती ख्रुचीतून उठली आणि दारात जाऊन उभी राहीली…

“जस-साब..ध्यान से देखीये इस दरींदे को.. समाज मै दहशत मचानेवाला ये मासुम चेहरा एक दरींदे को छुपाए रख्खा है।” रती स्वतःशीच बोलत होती.

कबीर खुर्चीतून तडक उठला, रती जेथे उभी होती तेथे गेला, तिला हाताला धरून मागे फ़िरवले आणि आपले ओठ तिच्या ओठांवर टेकवले..

रतीने प्रतिक्षीप्त क्रियेने कबीरला दूर ढकलायचा प्रयत्न केला, पण कबीरच्या घट्ट मिठीतून ती स्वतःची सुटका करु शकली नाही…

काही सेकंद.. आणि मग कबीरने तिला दूर लोटले आणि म्हणाला.. “शिक्षा भोगायचीच असेल तर निरपराध होऊन भोगण्यापेक्षा गुन्हा करून भोगलेली काय वाईट..” असं म्हणून तो पुन्हा जागेवर जाऊन बसला.

थोड्यावेळाने रतीसुध्दा पुन्हा तिच्या जागेवर बसली..

कॉफ़ी संपेपर्यंत दोघंही काहीच बोलले नाहीत…

“निघुयात?”, कॉफ़ी संपल्यावर कबीर म्हणाला..

“हम्म..”

कबीरने बिल भरले आणि दोघंही बाहेर पडले. कारपर्यंत येईपर्यंतच काय, पण नंतर रतीच्या घरापर्यंतही कुणीच काही बोलले नाही.

“चलो देन.. बाय..”, कारचं दार उघडत रती म्हणाली..

“रती..”, कबीर.. “मला तुला परत भेटायचंय..”

“का?”

“देअर इज समथींग बिटवीन टु ऑफ़ अस.. आय डोंन्ट नो व्हॉट इट इज..बट आय कॅन फ़िल इट.. अ‍ॅन्ड आय वॉट टु सी.. आय वॉन्ट टु नो व्हॉट इट इज.. भेटशील?”, कबीर

“कबीर.. ईट्स नॉट राईट.. तू आणि राधा.. बोथ आर कमीटेड.. तुम्ही जगजाहीर केलंय.. तुला असं माझ्याबरोबर फ़िरताना कुणी बघीतलं तर.. ते बरोबर नाही दिसणार..”, रती

“विकडे ला भेटु.. सधारण शंभर एक किलोमीटर वर आमचं फ़ार्म-हाऊसचं काम चालू आहे.. बरंचसं झालय पूर्ण, तिकडे जाऊ आपण, जवळपास छोटे-मोठे रेस्टॉरंट्स, बार आहेत.. ओके?”

“पण कबीर…”

“बरं, असा विचार करं, मी साईट-व्हिजीटला चाललो आहे.. राधा, रोहन, मोनिका सगळे कामात आहेत, मला एकट्याला जायचा कंटाळा आलाय.. एक मैत्रीण म्हणून तर तू येऊ शकतेसच की बरोबर.. इट्स जस्ट अ डे विथ मी ओके?”

“ओके..”, थोडा विचार करून रती म्हणाली..

“कुल.. मग बुधवारी सकाळी सात वाजत येतो मी घरापाशी तुला पिक-अप करायला..”
“नको..घरापाशी नको, कदाचित आई-बाबांना आवडणार नाही ते.. मी मेसेज करते तुला कुठे भेटायचं ते..”, असं म्हणून रती निघून गेली.

कबीरनेही गाडी वळवली आणि तो घराकडे वळला.

रतीला असं गुपचूप, लपून-छपून भेटायचंय ह्या विचारानेच त्यांच हृदय दुप्पट वेगाने धडधडत होते.. आणि कदाचित रतीचेही..

**********************

बुधवारी सकाळी रती आणि कबीर निघाले तेंव्हा आकाश काळया पावसाळी ढगांनी काळवंडून गेले होते.

“आज कोसळणार बहुतेक..”, रती आकाशाकडे बघत म्हणाली

“नक्कीच.. कारण फ़ार्महाऊस असं डोंगरात आहे वरती.. सो इथे नसला तरी, तिथे नक्कीच असणार..”, कबीर म्हणाला

“राधा बरी आहे का आता?”

“माहीत नाही.. असेल..”

“म्हणजे? तुम्ही भेटला नाहीत नंतर..?”, रतीने आश्चर्याने विचारले

“नाही.. ती बिझी आहे ऑफ़ीसमध्ये.. कोणतरी डेलीगेट्स येणार होते…”

“ओह.. बरं बरं..”

कार थोडी गावाबाहेर आल्यावर रतीने ए/सी बंद केला आणि कारच्या खिडक्या खाली केल्या तसं थंड हवेचा झोका आतमध्ये शिरला..

“सॉल्लीड गार आहे नै बाहेर…”, रती

“हे घे.. हे घाल गळयात..”, आपल्या गळयातला मफ़लर काढुन रतीला देत कबीर म्हणाला..

“थॅंक्स..”,असं म्हणून रतीने तो मफ़लर गुंडाळला..

रतीने आपले बांधलेले केस मोकळे सोडले आणि खिडकीतून येणारा वारा केसांमध्ये गुंफ़ून गेला.

“नको.. प्लिज नको…”, अचानक कबीर म्हणाला

“का? काय झालं?”

“अपनी इन जुल्फ़ों को इस तरहं से ना लहंरा दें ऐ जालीम, इनकी घनी छटाओं को देख कर कही ये बादल ना शरमा जाएं…”, कबीर हसत हसत म्हणाला..

“अरे व्वा.. एकदम शायरी वगैरे..”

“अगर आप जैसी हसीना साथ मै हो तो...”

“ए हॅल्लो.. तू फ़्लर्ट करतोएस का माझ्याशी...”, रती कबीरला थांबवत म्हणाली..

“बरं राहीलं.. तुला नसेल आवडत तर...”

“मी कुठं म्हणलं मला आवडत नाही....”

“बरं.. आर्ची मॅडम..”, असं कबीर म्हणाला आणि दोघंही हसायला लागले...

रतीने टेप चालू केला... लग जां गले... गाणं चालू होतं..

*हमको मिली हैं आज, ये घड़ियाँ नसीब से*

*जी भर के देख लीजिये हमको क़रीब से*

*फिर आपके नसीब में ये बात हो न हो*

*फिर इस जनम में मुलाक़ात हो न हो*

रतीने अर्थपूर्ण नजरेने कबीरकडे बघीतले...

“सस्सं... *शायद इस जनम मै मुलाकात हो न हो*... काटां आला अंगावर...”, कबीर हातावरून हात फ़िरवत म्हणाला...

काही वेळातच ‘व्हिसलींग वूड्स’ पाटी असलेल्या मोठ्या गेटमधून गाडी आतमध्ये शिरली...

“वॉव्व.. काय मस्त एरीआ आहे रे..”, रती सभोवताली बघत म्हणाली.. “हे तर काहीच नाही.. आपलं फ़ार्म-हाउस तिकडे वरती आहे बरंच डोंगरावर.. तिथून व्ह्यु बघ कसला भारी आहे..”, कबीर डोंगराकडे बोट दाखवत म्हणाला…

“आपलं?”

“हां.. म्हणजे.. आपलं.. आम्ही संस्थानिक आपलं असंच म्हणतो..”, कबीर हसत म्हणाला..

पंधरा मिनीटांच्या ड्राईव्ह नंतर कबीर त्याच्या फ़ार्महाऊसवर पोहोचला.. बरंचसं बांधकाम पूर्णत्वास आलेलं होतं.

“धिस इज सिरीयसली गुड..”, रती म्हणाली..

“आय नो.. हे पुर्ण झालं ना की मी तर विचार करतोय इथंच येऊन रहावं.. एकदम शांत.. पुस्तक लिहायला परफ़ेक्ट आहे एकदम..”

“राधाला दाखवलंस हे?”

“नाही अजून.. पण मला नाही वाटत तिला आवडेल.. तिला अश्या हॅपनींग जागा लागतात.. इथली शांतता बोचेल तिला…”, कबीर

“जे काय आहे ते आहे.. आता तुम्ही ॲडजस्टमेंट्स करणार.. त्यावरंच तुमचं नात बेतलेलं आहे म्हणल्यावर…”

“टॉन्ट होता का हा?”, कबीर रतीकडे रोखून बघत म्हणाला..

रती काहीच बोलली नाही..

दोघांनीही मग फ़ार्म-हाऊसची पहाणी केली.. कबीरने त्याची ड्राईंग-रुम रतीला दाखवली.. दोघांनीही इंटेरीअर कसं करता येईल, काय वेगळं ठेवता येईल यावर चर्चा केली.

"ए इथे ना.. तो जुन्या काळचा रेकॉर्डर मिळतो नं तो ठेव..."

"इथे मी त्या लाइट्सच्या माळा लावून घेणार आहे.. तुझ्या खोलीत होत्या ना, तश्या.. मला खूप आवडलं ते.."

"भिंतीला काय करणार आहेस.. ते नविन म्युरल्सचा प्रकार आलाय बघ.. असं पुस्तकांचे म्युरल्स करून घे एका कॉलमला भारी दिसेल.. लेखकाचं घरं वाटलं पाहीजे.."

"आणि किचेनला काय करु..?" कबीरने अर्थपूर्ण नजरेने रतीकडे बघीतले.. रतीला त्याच्या प्रश्नाचा रोख लक्षात आला.. "ते आता मी कसं सांगू.. ते राधाला विचार नं.. ती असणारे किचेन मध्ये..मी थोडं नं असणारे... उगाच मी सांगायचे आणि तिला नाही आवडलं तर...", रती गालातल्या गालात हसत म्हणाली..

रतीने जमीनीवर पडलेला एक विटेचा तुकडा उचलला आणि भिंतीवर K हार्ट R असे लिहीले.

"R?"

"R फ़ॉर राधा.."

"हो हो.. खरंच राधाच.. पण मग असं अर्धवट कश्याला? पूर्ण राधाचं लिही नं.." काहीसं चिडून कबीर म्हणाला

"ओके.. अ‍ॅज यु विश.." असं म्हणून रतीने तिथे 'राधा' लिहीले आणि ती बाहेर निघून गेली..

"जळल्याचा वास येतोय काही तरी.. हे कामगार लोकं ना.. सगळा कचरा पेटवून देतात इथे..", मुद्दाम रतीच्या जवळून बोलत जात कबीर म्हणाला..

"ए चल.. भूक लागलीए.. खाऊयात का काही तरी?"

“येस, चल्ल, इथे पुढेच एक मस्त हॉटेल आहे..”

दोघंही बाहेर पडले..

थोडं चालून पुढे गेल्यावर अचानक रती म्हणाली.. “ओह् शट्ट…”

“काय झालं?”

“पुढे बघ.. तुझे आई-बाबा…”

कबीरने समोर बघीतलं.. समोरूनच त्याचे आई-बाबा येत होते. त्यांनीही कबीर-रतीला बघीतलं.. मागे वळून लपायला ही जागा नव्हती..

“अरे बाबा.. तुम्ही इथे?”, कबीर नॉर्मल साऊंड करत म्हणाला..

“हो.. कंटाळा आला होता.. आणि हवा पण मस्त होती.. म्हणलं तुझ्या आईला घेऊन जावं फ़िरायला.. तू कसा इथे?

“पण तू कसा इथे?”

“सहजच, आलो होतो किती काम झालंय ते बघायला..”

“राधा नाही आली?”

“अं.. नाही.. तिला काम होतं.. आम्ही दोघंच येणार होतो.. पण ऐन वेळी तिला काम आलं.. म्हणून मग हिला घेऊन आलो..”, कबीर म्हणाला..

“तू रती ना?”, कबीरची आई रतीकडे बघत म्हणाली..

“हो.. आई.. अं.. काकु..”, रती

“चालेल गं.. आई म्हणालीस तरी चालेल..”

समहाऊ.. कबीरची आई रतीला बघून खुश वाटत होती..

“चला.. आम्ही रेस्टॉरंट मध्ये चाललोय.. येताय?”, कबीर म्हणाला..

“हो.. चला..”, कबीरचे बाबा म्हणाले.. आणि चौघही रेस्टॉरंटमध्ये आले..

चौघंही छान गप्पा मारत होते..

“कबीर.. चल जरा बाहेर जाऊ..”, कबीरचे बाबा म्हणाले..

दोघंही बाहेर आले.

“काय झालं?”, कबीर..

“अरे काही नाही.. ड्रींक्स करायचा मुड होता.. तुझ्या आईला आवडत नाही नं सकाळी ड्रींक्स घेतलेली.. म्हणून इथे बाहेर घेऊ गपचुप..”

दोघांनी दोन स्मॉल पेग्स घेतले..

“आई आज सॉल्लीड मुड मध्ये आहे नै..”, कबीर म्हणाला.. “रतीशी चांगलं जमत आईचं..”

“कबीर.. स्टॉप-इट..”, कबीरला थांबवत बाबा म्हणाले.. “मला माहीतीए तुला काय म्हणायचंय.. कबीर.. आपण तशी लोकं नाहीओत.. तुझं आणि राधाचं लग्न ठरलेय, तुम्ही दोघांनी मिळून, विचार करून ठरवलेय.... आणि तिला दुखवुन, ते ठरलेलं लग्न मोडून तू रतीशी लग्न केलेलं मला आवडणार नाही..”

“पण बाबा.. एकदा घडलेली चुक.. खुप पुढे जायच्या आधीच सुधारलेली काय वाईट?”

“चूक? तुला आत्ताच चूक वाटतेय ती? कबीर आधी मोनिका.. मग राधा.. आता रती आवडतेय का तुला? कधीतरी स्वतःच्या निर्णयावर ठाम रहा तु.. कश्यावरून उद्या तुला अजून

तिसरीच कोणी आवडणार नाही.. ग्रो अप नाऊ.. कॉलेजमधला मुलगा नाहीएस तू थिल्लर प्रेमं करायला…"

"ओके.. चुक असं नाही.. पण बाबा असं कधी कधी होतं ना.. आपण एखाद्या रस्त्याने आपण चालत असतो.. चालत चालत, अंदाज घेत आपण बरंच पुढे जातो.. आणि मग जाणवतं, अरे हा तो रस्ता नाहीचे जिथे आपल्याला जायचंय.. हे तेंव्हाच कळतं ना जेंव्हा आपण त्या रस्त्याने पुढे जातो.. रस्त्याच्या सुरुवातीला नाही कळत.. मग तेंव्हा काय करायचं? चालत राहीचं? माहीती असूनही की आपण चुकीच्या रस्त्याने चाललोय..?", कबीर..

कबीरचे बाबा काहीच बोलले नाहीत, त्यांनी पेग संपवला आणि कबीरची वाट न बघता ते निघून गेले..

कबीर परत येताना गाडीत शांतच होता..

"काय झालं कबीर? मुड का ऑफ़ आहे?", रतीने विचारायचा प्रयत्न केला, पण कबीरने 'काही नाही' म्हणून तो विषय तिथेच संपवला…

**********************

घरी परतल्यावर दोन दिवसांनी रतीने रोहनला फोन केला..

"बोला रती मॅडम.. आज चक्क आम्हाला फोन? काय काम काढलंत?", रोहन

"ए.. काय रे.. कामा शिवाय फोन करु नये का मी तुला?", रती

“नाही.. तसं काही नाही.. पण आत्ता काम तर काही तरी नक्कीच असणारे.. हो ना?”

“हम्म.. अरे मला सॉल्लीड गिल्ट कॉन्शीअस आलाय... अं.. कबीर काही बोलला का तुला बुधवारचं?”, रती

“नाही.. का? काय झालं?”

“मग त्या दिवशीच्या पार्टीच्या नाईटचं?”

“नाही.. काहीच नाही.. काय केलत आता?”

“चं.. नाही रे.. काही केलं नाही.. असं फोन वर नाही बोलता येणार सगळं.. भेटूयात का? तू मी आणि मोनिका फ़क्त.. कबीर नकोय..”

“हम्म.. भेटू.. उद्या कधी पण चालेल.. कबीर दिवसभर नाहीए.. कुठे तरी जाणारे..”

“हो? कुठे?”

“माहीत नाही, काही तरी काम आहे म्हणला बुवा.. मी पण जास्ती नादी नाही लागत त्याच्या..”

“बरं.. उद्या संध्याकाळी भेटू.. जर्मन बेकरी चालेल?”

“डन.. संध्याकाळी ७.३० ला भेटु मग..मी मोनिकाला पण सांगतो..”

“बाय देन..”

“बाय..”

ठरल्या वेळेला रती, रोहन आणि मोनिका जर्मन बेकरीमध्ये भेटले.. पट्कन जे सुचेल ते ऑर्डर देऊन टाकली. खाण्यात तसाही कुणाला उत्साह नव्हता. रोहन आणि मोनिकाला तर कधी एकदा रतीला भेटतोय आणि काय घोळ झालाय हे जाणून घेतोय असं झालं होतं..

“हम्म.. बोल पट्कन.. काय झालं..”

“कबीरने त्या दिवशी पार्टीच्या रात्री.. तुम्ही गेल्यानंतर काय झालं ह्याबद्दल काहीच सांगीतलं नाही का तुला?”, रतीने विचारलं..

“अगं नाही बाई.. काहीच बोलला नाही तो.. काय झालंय…”, रोहन

“त्या दिवशी तुम्ही गेलात.. आणि मग कबीर म्हणाला कॉफ़ी घेऊयात का स्टार-बक्सला…”, असं म्हणून रतीने तो सगळा किस्सा इत्युंभुत.. जश्याच्या तसा.. कोण-कुणास-काय म्हणाले तत्वावर मोनिका-रोहनला सांगीतला…

“आईशप्पथ..कबीरने किस केलं तुला… वॉव..सो रोमॅंटीक..”, मोनिका म्हणाली..

“च्यायला त्या कबीरच्या.. एकावेळी दोन दगडांवर पाय ठेवून उभा आहे..”, रोहन वैतागून म्हणाला..

“बरं.. मग बुधवारचं काय म्हणत होतीस?”, रोहन

“हम्म.. तर मग आम्ही बुधवारी परत भेटलो..”

एव्हढ्यात त्यांची ऑर्डर आली.. प्लेट मांडून, सर्व्ह करून वेटर जाई पर्यंत रती थांबली…

“हम्म पुढे.. बुधवारी तुम्ही भेटलात.. कधी.. कुठे?”

"सकाळी ७ वाजता.." हसत हसत रती म्हणाली...

"हम्म.. आग दोनो तरफ़ से लगी है..", मोनिका

"ए.. मोना.. तुझे फ़िल्मी डायलॉग्स बंद कर.. आणि मध्ये बोलु नकोस.. रती.. कंटीन्यु.. ७ वाजता भेटलात.. सकाळी.. मग..", रोहन

"हां.. तर मग..", असं म्हणून रती तो पुर्ण दिवस कथन केला..

टेबलावरचं खाणं गार होऊन गेलं, पण कुणीही एक घास खायचा कष्ट घेतला नाही, किंबहुना कुणाला त्याचे भानही नव्हते..

"रोहन, मला सॉल्लीड गिल्टी फ़िल होतेय रे.. मी असं त्याला भेटायला नको होते..आणि मी असं भावनेच्या भरात बरंच काही बोलून गेले.. उगाच त्याच्या मनात काही नसेल ना रे आले...", रती..

"गप्प बस.. गिल्टी काय वाटायचेय त्यात.. त्याने बोलावले होते तुला.. तू गेलीस.. इट्स दॅट सिंपल..", रोहन

"नाही रे.. बहुतेक कबीरच्या बाबांना आवडलं नाही, माझं तिथे त्याच्याबरोबर असणं.. ते बाहेर जाऊन बहुतेक कबीरला काहीतरी बोलले नंतर त्याचा मुड खुप ऑफ़ होता.. मी विचारलं त्याला 'काय झालं?', पण काहीच बोलला नाही.. तू बघ ना काही कळतंय का काय झालं..", रती काळजीने म्हणाली...

"पण मी कसं विचारणार.. त्याने मला काहीच सांगीतलं नाहीए.. तुम्ही त्या दिवशी भेटल्याचं...", रोहन

इतक्यात रोहनचा फोन वाजला...

"राधाचा फोन..", आश्चर्यचकीत आणि हायपर होत रोहन म्हणाला...

“हाय राधा.. बोल काय म्हणतेस..”, रोहन

“रोहन.. भेटायचंय मला.. आत्ताच्या आत्ता.. भेटू शकतोस?”

“अं.. का गं काय झालं? मी बाहेर आहे आत्ता..”

“कुठे आहेस? मी जास्त वेळ नाही घेणार..”

“आम्ही जेवायला आलोय बाहेर.. मी, मोनिका.. रती..”

“ओह ग्रेट.. रती पण आहे नं.. बरं झालं. मी येते.. कुठे आहात तुम्ही..”

“जर्मन बेकरी.. पण काय झालं काय?”

“येते मी दहा मिनीटांत.. आल्यावर बोलु ना..”, असं म्हणून राधाने फोन बंद केला..

“राधा येतीय..”, फोन ठेवल्यावर रोहन म्हणाला

“का? काय झालं?”, मोनिका आणि रती एकदमच म्हणाल्या..

“काय माहीत काय झालं.. आत्ताच्या आत्ता भेटायचंय म्हणाली..”, रोहन

“ठिके.. चला आपण खाऊन घेऊ तोपर्यंत..”, असं म्हणून तिघांनी ऑर्डर केलेलं खायला सुरुवात केली..

म्हणल्याप्रमाणे बरोब्बर दहा मिनिटांतच राधा तेथे पोहोचली.

“हाय गाईज..”, हॅन्डबॅग टेबलावर ठेवत राधा म्हणाली.. “नमस्ते वहीनी..”, रोहन हसत हसत म्हणाला..”बोला काय खाणार..?”

वहीनी म्हणताना मुद्दाम त्याने हळुच रतीकडे बघीतलं. रतीने त्याला एक खूनशी लुक दिला.

“ए.. श्शी.. वहीनी काय? एकदम १० वर्षांनी म्हातारं झाल्यासारखं वाटलं.. राधाच ठिक आहे हं.. आणि खायला नकोय काही.. एक आईस्ड टी सांगते..”, असं म्हणून तिने ऑर्डर दिली..

“बरं झालं, तुम्ही सगळे इथेच भेटलात…”, राधा

“काय झालं? एकदम गडबडीत भेटायचं म्हणालीस म्हणून विचारलं..”, रोहन

“सांगते.. आज मी आणि कबीर दिवसभर बाहेर गेलो होतो..”

“अरे व्वा.. सहीच की.. कुठे?”, रोहन

“त्याचं नविन फ़ार्म-हाऊस बनतंय.. व्हिसअलींग वुड्स मध्ये.. तिकडे गेलो होतो..”

लगेच हळुच रोहन-मोनिका-रतीची एक चोरटी नजरा-नजर झाली..

“अच्छा, तरीच सकाळपासून कबीर गायब होता… कुठे आहे कुठे तो मग आत्ता.. त्याला पण घेऊन यायचंस ना..”, रोहन

“नाही.. नको.. तो नसतानाच मला जरा बोलायचं होतं.. बोलु का मी पुढे??”

“ओके ओके.. बोल..”

“हम्म.. तर आम्ही दोघं तिकडेच गेलो होतो.. बोलता बोलता सहज म्हणाला.. लग्नानंतर आपण इकडे यायचं का रहायला? आता मी दहा वेळा त्याला सांगीतलंय.. मला एका जागी सेट नाही व्हायचंय.. त्यात इतक्या लांब शहरापासून कसं शक्य आहे?”

“मग? तू नाही म्हणालीस का?”

“नाही.. मी तसं काहीच बोलले नाही.. मग तो मला इंटेरीअर वगैरे काय करायचं ते विचारत होता.. मला एक तर त्यातलं फ़ारसं कळत नाही, आणि मला विचाराल तर.. मला

वाटतं खरी लाईफ़ घराच्या बाहेर आहेत.. चार भिंतीच्या आत नाही.. मग त्या निर्जीव भिंतीवर काय पैसे खर्च करायचे पाण्यासारखे.. मी म्हणले तसं त्याला.. तर मला म्हणाला तू खुप ब्लंट आहेस..”

“अजूनही अश्या काही बारीक-सारीक गोष्टींवरून आमचे खटके उडाले.. म्हणजे प्रेम करतो रे तो माझ्यावर खूप.. त्याने ना त्याच्या ड्राईंग रुममधल्या भिंतीवर विटेने कबीर लव्ह्ज राधा असं लिहीलं होतं.. हाऊ क्युट ना..”

पुन्हा एकदा रोहन-रती-मोनिकाची नजरानजर झाली.. तिघांनाही माहीती होतं की ते कबीरने नाही, रतीने लिहीलं होतं.

“सो क्युट..”, मोनिका मुद्दाम म्हणाली..

“हो नं.. आय मीन.. त्याला मी आवडते ह्यात शंकाच नाही, मलाही तो नक्कीच आवडतो.. आयुष्यातल्या प्रत्येक क्षणी तो माझ्याबरोबर असावा असं मला वाटतं.. बट सिरीयसली.. लग्नासाठी ही एकच गोष्ट पुरेशी आहे का?”

तिघांचेही डोळे एकदम मोठ्ठे झाले.. पण राधाचं लक्ष नव्हतं.. ती बोलण्यात मग्न होती..

“लग्नाच्या आधीच आमच्यात डिफ़रंन्सेस आहेत.. जसं जसं लग्न जवळ यायला लागलंय.. तसं तसं मला असं सफ़ोकेट झाल्यासारखं वाटतंय.. असं वाटतं.. कबीरशी लग्न हा माझा योग्य निर्णय तर आहे ना? त्याला जे आयुष्य अपेक्षीत आहे.. ते मी देऊ शकेन ना?.. काय वाटतं तुम्हाला.. आम्ही हा योग्य निर्णय घेतलाय ना?”, राधाने आळीपाळीने तिघांकडेही बघीतलं..

बराचवेळ शांततेतच गेला..

“मला वाटतं योग्य निर्णय आहे.. तुम्ही दोघंही एकमेकांना हवा आहात.. तुमचं दोघांचही एकमेकांवर प्रेम आहे.. तू नेहमीच कबीरच्या मनात होतीस.. रहाशील.. मला वाटतं

रिलेशनशीप मध्ये सगळ्यात महत्वाच काय असतं तर ते एकमेकांवर असलेल घट्ट प्रेम.. जर ते असेल तर बाकीच्या गोष्टी दुय्यम आहेत.. मला वाटतं.. तुम्ही थोडी मॅच्युरीटी दाखवलीत तर तुमच्यातले हे डिफ़रंन्सेसही नाहीशे होतील..", अनपेक्षीतपणे रती म्हणाली.. "आणि माझं मत विचारशील तर मला तुम्ही दोघंही आनंदी हवे आहात..."

मोनिकाने हळुच टेबलाखालून रतीला एक लाथ मारली..

"थॅंक्स रती.. खुप छान वाटलं ऐकून.. मला कळत नाहीए.. मी खुप ओव्हर-रिॲक्ट होतेय की काय... आजचा दिवस इतका वाईट गेला ना आमचा.. आय थिंक ही शुड अंडरस्टॅंड यार.. मी नाही राहू शकत इतक्या दूर असं एकांतवासात..", राधा

"डोंन्ट वरी.. सगळं ठिक होईल..", रती

"थॅंक्स यार.. आणि रती.. मला थोडी शॉपींगला हेल्प करशील प्लिज.. यु नो ना.. माझ्याबरोबर माझ्या नात्यातलं असं कोणीच नाही.. ऑफ़ीसमधलं रिलेशन इतके पण जवळचे नाहीत की मी त्यांच्याबरोबर शॉपिंग वगैरे करेन..", राधा
"व्हाय नॉट.. नक्की..", रती

"सर.. एक स्किम चालु आहे.. तुमचा सेल्फ़ी काढुन आमच्या पेजवर अपलोड करा.. १०% डिस्काऊंट आहे..", एक वेटर टेबलापाशी येत रोहनला म्हणाला..

"अरे व्वा.. व्हाय नॉट....या रे.. इकडे सगळे..", असं म्हणून रोहनने आपल्या मोबाईलमधून एक ग्रुप-फ़ोटो काढला

"ओके देन.. यु गाईज कॅरी ऑन.. मी पळते...आणि मला प्लिज व्हॉट्स-ॲप करा हा फ़ोटो"

टेबलावरचा आईस्ड-टी संपवला आणि बॅग उचलून राधा निघून गेली..

राधा गेल्या गेल्या रोहन आणि मोनिका दोघंही रतीकडे वळले.

“मुर्ख आहेस का तु? चांगली संधी होती तुला.. उलट तिला सांगायला हवं होतंस कि हा निर्णय चुकीचा आहे.. तुम्ही दोघं अनुरुप नाही एकमेकांना वगैरे.. ते राहीलं बाजुला .. आणि तु..” रोहन चिडून म्हणाला..

“नाही तर काय.. एव्हढी साधी नको राहूस रती तु..”, मोनिका

“कुल डाऊन गाईज.. आय एम नॉट अ बिच.. अ‍ॅन्ड आय डोंन्ट वॉट टु.. मला कुणाच्या लग्न मोडण्याचं कारण नाही बनायचंय..”, रती

“अगं पण.. तुला आवडतो ना कबीर. मग? जर का त्यांच लग्न व्हावं असं वाटतंय.. तर कश्याला गेलीस मग त्या दिवशी कबीर बरोबर.. स्पष्ट दिसतंय की कबीर आज राधाला तिथे का घेऊन गेला ते.. तो सरळ सरळ कंपेअर करतोय राधाला तुझ्याशी..”, मोनिका

“पण आम्ही जस्ट भेटलो होतो.. ते पण तो म्हणाला म्हणून..”, रती

“राईट.. आणि किती दिवस हे असं भेटणं चालणार? राधापासून लपवुन.. कबीरचं लग्न होईपर्यंत? का त्यांच्या पहील्या वाढदिवसापर्यंत?? का त्यांना मुल-बाळ होईपर्यंत??’, रोहन..

“रोहन.. कबीरचं अजून लग्न झालेलं नाहीए.. सो भेटायला काय हरकत आहे..?”, रती

“खरंय.. पण त्याने त्याचा निर्णय बदलला आहे का? तो म्हणाला का की रती माझं तुझ्यावरंच प्रेम आहे.. माझा निर्णय चुकलाय.. मी राधाला सांगतो मी तुझ्याशी नाही.. रतीशी लग्न करतोय.. म्हणाला का तसं तो..”, रोहन

रती काहीच बोलली नाही

“बरं त्याचं नाही तर नाही.. तू तर बोललीस का? उलट त्याच्या भिंतींवर कबीर लव्हज राधा लिहून आलीस.. कमाल आहे तुझी..”

“रोहन मी प्रेम करते कबीरवर.. आणि जरी तो माझ्यावर प्रेम करत असेल, तरी हे ही खरं आहे की तो राधावरही प्रेम करतो.. आणि मला त्याचं प्रेम त्याच्यापासून हिरावून घ्यायचं नाहीए.. त्याला आम्हा दोघींमधलं कोण हवंय हे त्याला ठरवु दे.. त्याचा निर्णय त्याला घेऊ दे.. कदाचित माझ्यावर नसेलही प्रेम त्याचं, राधाला त्याच्यापासून दुरावून मला त्याला दुःखी नाही करायंचंय रोहन..”, रती

“रती.. कबीर खरंच मुर्ख आहे.. तो स्वतःहून कुठलाही स्टॅन्ड घेणार नाही.. तो तुला प्रपोज करणार नाही.. तू त्याला विचारणार नाही.. राधा त्याला सोडणार नाही.. कबीर आयुष्यात जे घडेल तसे त्या फ़्लो मध्ये जात रहातो.. प्रवाहाविरुध्द पोहायची धमक नाही त्याच्यात. तो काहीही बदल करणार नाही.. दोन आठवड्यांत त्यांच लग्न होईल रती.. कळतंय का तुला मी काय म्हणतोय???”, रोहन पोटतिडकीने म्हणत होता..

“रोहन मला वाटतं.. आपल्यालाच काहीतरी करावं लागणार आहे आता..”, मोनिका

“नाही मोनिका.. कुणी काही करायची गरज नाहीए.. तुम्हाला माहीते.. मी ते विपश्यनेला गेले होते ना.. तिथे एक गोष्ट आम्हाला शिकवली.. आपल्याला जर एखादी गोष्ट खरंच हवी असेल ना.. तर ती गोष्ट आपण ना युनिव्हर्सकडे मागायची.. अगदी मनापासनं.. आणि मग ती गोष्ट आपल्याला मिळवून देण्यासाठी सगळी शक्ती पणाला लावते. मी रोज सकाळ संध्याकाळ युनिव्हर्सकडे कबीरला मागतेय..”, रती म्हणाली..

“ॲज यु विश..”, मोनिका म्हणाली.. “आय होप.. जेंव्हा तू जागी होशील तेंव्हा खूप उशीर झालेला नसेल.. लेट्स गो रोहन..”

रतीने बिल भरलं आणि तिघंही जण बाहेर पडले.

रात्रीचे १२.३० वाजून गेले होते. कबीर झोपेत बुडून गेला होता इतक्यात त्याचं दार वाजलं.

कबीर चरफडत उठला.. घड्याळात वेळ बघीतली.. इतक्या रात्रीचं कोण आलं असेल असा विचार करत त्याने दार उघडलं..

दारात राधा उभी होती.

“राधा.. तु? इतक्या उशीरा? ये आत ये…”, कबीरने दार पुर्ण उघडलं.. राधाने दारु प्यायलेली होती. अडखळत अडखळत ती हॉलमध्ये आली आणि तिने सोफ़्यावर स्वतःला झोकून दिले..

“झोपला होतास कबीर..”, अडखळत तिने विचारलं..

“हे घे.. पाणी पी आधी..”, कबीरने फ्रिजमधून गार पाण्याची बाटली आणली आणि ग्लासमध्ये पाणी भरून राधाला देत म्हणाला.

“झोपला होतास का? माझी झोप उडवुन?’, राधाने परत विचारलं..

“हम्म.. झोपलो होतो.. बोल.. काय झालं?”

“हे बघ…”, राधाने आपला मोबाईल सुरु केला आणि कबीरसमोर धरला.. मोबाईलवर रोहन-राधा-रती आणि मोनिकाचा तो हॉटेलमध्ये काढलेला ग्रुप फोटो होता..

“आज संध्याकाळी मी भेटले ह्यांना.. सहजच..”, राधा म्हणाली..

“अरे व्वा.. मस्त की..”, कबीर.. “पण मला सोडून का भेटलात? मला सांगीतलं असतं तर मी पण आलो असतो की..”

"तू तर भेटतच असतोस रे.. म्हणून नसेल सांगीतलं..", कसनुस हसत राधा म्हणाली..

"छे गं.. म्हणजे रोहन भेटतो.. तू भेटतेस.. पण मोनिका आणि रती.. नाही भेट होतं जास्ती…", कबीर..

"म्हणजे? तू रतीला भेटलाच नाहीस इतक्यात?"

"नाही.. आपल्या पार्टीला जी भेट झाली तिच शेवटची.. का? असं का विचारलंस..?" थोडंस चाचपून कबीर म्हणाला

राधाने तो फ़ोटो रतीवर झुम केला आणि म्हणाली.. "निट बघ कबीर.. रतीचा ड्रेस बघ.. तिच्या गळयात बघ काय आहे.. हा तोच मफ़लर आहे ना जो मी तुला गिफ़्ट केला होता.. आपल्या लग्नाच्या पार्टीला?"

कबीर काहीच बोलला नाही…

"कधीपासून चालु आहे तुम्हा दोघांचं?", राधा

"तसं काही नाहीए राधा.. उलट ती मला नेहमी समजावतेच की राधाशी जुळवून घे.. लग्नानंतर सगळं ठिक होईल वगैरे..", कबीर

"तेच तर मला कळत नाही.. आज मला पण ती तेच म्हणाली.. पण मी तुला आधी पण म्हणाले होते.. आत्ता पण म्हणतेय.. शी लव्हज यु.. तिचं प्रेम आहे तुझ्यावर.. स्पष्ट दिसतं तिच्या चेहऱ्यावर विशेषतः तेंव्हा जेंव्हा ती तुझ्याबद्दल बोलत असते..", राधा

"राधा प्लिज..तुला जास्त झालीए.. आपण नंतर बोलुयात का?", कबीर.. "तू एक काम कर.. इथेच झोप.. उद्या सकाळी निवांत बोलु.."

"नाही कबीर.. उद्या नाही.. तुला उतरवायला आज इतकी प्यावी लागली.. आजच सगळं बोलु दे.. आत्ताच.."

कबीरने पंखा चालु केला आणि तो राधाच्या समोरच्या खुर्चीत बसला..

“कबीर.. अगदी खरं खरं सांग.. प्लिज.. आय नो.. यु लव्ह मी.. पण रती.. तुला रती पण आवडते ना? प्लिज आता खोटं नको बोलुस..”

“हम्म.. आवडते..”

“माझ्यापेक्षाही जास्त?”

“माहीत नाही.. खरंच माहीत नाही.. जेंव्हा तू समोर असतेस तेंव्हा मी तुझाच असतो.. पण ती समोर आली की मला कळत नाही मला काय होतं.. वेडा होऊन जातो मी तिच्यासाठी..”, कबीर खाली मान घालून म्हणाला..

टेबलावरचा पाण्याचा ग्लास घेण्यासाठी राधा उठायला गेली, पण तिचा तोल गेला तसा तिला सावरायला कबीर खुर्चीतून उठु लागला, पण राधाने त्याला थांबवले. सोफ़्याचा आधार घेऊन तिने पाण्याचा ग्लास उचलून ओठाला लावला..

“कबीर.. तुला वाटतंय की आपण लग्न करून चुक करतोय? मला वाटतं तसं.. ह्याचा अर्थ असा नाही होत, की मी तुझ्यावर चिडलेय.. किंवा तू मला आवडत नाहीस, पण.. लग्न.. आणि आपण दोघं.. ह्या बाबतीत मला वाटतंय आपण भिन्न विचारांचे आहोत.. आपलं खरंच जमेल एकत्र लग्नानंतर?”

कबीर काहीच बोलला नाही.

“ओ लेखक.. अहो बोला आता जरा..”, राधा म्हणाली

“मान्य आहे आपले विचार, आपली मतं अगदी विरुध्द टोकाची आहेत.. पण आत्ता तू जे बोललीस ना, तेच अगदी तंतोतंत माझ्या मनातही आहे..”, कबीर..

“तू माझ्याशी.. किंवा मी तुझ्याशी नवरा-बायको म्हणून कितपत जुळवून घेऊ शकु माहीती नाही..”, राधा म्हणाली..

काही वेळ शांततेत गेला…

“मोडुयात लग्न?”, काहीश्या अस्पष्ट आवाजात राधा म्हणाली.. कबीरने अविश्वासाने तिच्याकडे बघीतले

“राधा.. हे बघ.. हा निर्णय असा तडकाफ़डकी नको घ्यायला.. तू पण आत्ता भानावर नाहीएस.. उद्या..”

“मी पुर्ण भानावर आहे कबीर.. तू तुझा निर्णय सांग.. हे बघ, मला वाईट वगैरे आज्जीबात वाटणार नाही.. मला वाटतं राधा नावालाच शाप आहे.. तिला हवं असलेलं प्रेम तर मिळालं.. पण ती त्याची कधीच होऊ शकली नाही.. सो इट्स ओके..”

कबीरने खुप वेळ घेतला आणि मग म्हणाला.. “राधा.. आपण लग्न नको करुयात.. पुढे जाऊन एकमेकांना दुखावण्यापेक्षा.. आत्ताच…” पण बोलताना कबीरचा आवाज कापरा झाला होता..

“वेडा रे वेडा तु..”, सोफ़्यात सावरून बसत राधा म्हणाली.. “तुला तो दुनियादारी सिनेमातला डायलॉग आठवतो?”

“कुठला?”

“तोच.. हातात कॅडबरी असताना समोर आलेलं बिस्कीट सुद्धा तुला सोडवत नाही… बच्चूच आहेस तू.. खरंच बच्चू आहेस तू कबीर…” असं म्हणून राधा उठून उभी राहीली

“कुठे निघालीस राधा?” कबीर तिला थांबवत म्हणाला..

“घरी.. आता इथे थांबुन काय उपयोग..”

“मी.. मी येतो सोडायला..”

“नको कबीर.. खाली पुनम थांबलीय.. तिला घेऊनच आले होते बरोबर.. माझी नको काळजी करुस.. तू जा रतीकडे.. सांग तिला.. तू तिचाच आहेस म्हणून..”, राधा दार उघडत म्हणाली..

“अगं.. पण झोपली असेल ती आत्ता…”

“तिची झोप उडली असेल रे.. चार दिवसांवर लग्न आलं आपलं.. जागीच असेल ती.. खरंच गोड मुलगी आहे.. आणि तुला डिझर्व्ह करते.. पण एक मात्र नक्की..”, राधा

“काय?”

“देव न करो.. पण पन्नाशीनंतर तुम्ही एकत्र नसलात.. तर माझी आठवण काढ.. निदान तेंव्हा तरी आपल्याला लग्नाची गरज भासणार नाही.. कबीर-राधा.. तेंव्हा तरी एकत्र येतील.. चलो येते मी.. आणि आता जास्ती उशीर न करता.. लग्न करून टाक.. इश्कच्या पुढचा भागाचे पुस्तक नक्की वाचेन मी..”

“राधा..”, कबीर म्हणाला.. “जायच्या आधी एक मिठी??”

“शुअर…”

राधाने कबीरला घट्ट मिठी मारली.. दोघांच्याही डोळयांतून अश्रुंच्या धारा लागल्या होत्या.. पण त्या दुःखाबरोबरच योग्य वेळी योग्य निर्णय घेऊन सगळयांचंच आयुष्य सावरल्याचा, सगळयांनाच हवं ते मिळाल्याच्या आनंदाच्या ही होत्या.

कबीरला बाय करून राधा निघून गेली.

थोड्यावेळाने खाली गाडी चालु झाल्याचा आवाज आला आणि ती गाडी तेथून निघून गेली.

पुन्हा सर्वत्र सामसुम झाली.

कबीर बराच वेळ सुन्न होऊन बसला होता. जे काही घडलं त्याच्यावर त्याचा अजूनही विश्वास बसत नव्हता.. पण जे घडलं ते सर्वदृष्टीने तिघांच्याही भल्याचंच होतं ह्याची त्याला मनोमन खात्री होती. त्याला अपेक्षीत असलेल्या चौकोनी आयुष्याच्या बंधनात राधा नावाच वादळं कधीच थांबुन राहीलं नसतं.. ते वादळ असंच मोकळं दऱ्या-खोऱ्यांतून, पर्वतांतून.. समुद्रांवरून घोंघावत राहायला हवं तरच त्याचं मार्दवी सौदर्य अनुभवता येणार होतं.

कबीरने तोंडावर पाण्याचा शिडकावा केला.. कपडे बदलले आणि मोबाईल चालु केला..

व्हॉटस-ॲपवर रतीचं लास्ट सिन १० मिनीटांपुर्वीचंच होतं.

राधा म्हणाली होती ते खरंच होतं तर..

कबीर खाली गाडीत येऊन बसला आणि स्वतःशीच म्हणाला.. “स्टे-अवेक रती.. आय एम कमींग टु टेक-यु अवे…”

कबीरच्या मनाची स्थिती सांगता येण्यापलीकडची झाली होती. एका बाजुला राधाला गमावल्याचं दुःखं होतं तर दुसरीकडे उर्वरीत पूर्ण आयुष्यभर लाभणाऱ्या रतीच्या साथीचं सूख.

कबीरला हा क्षण अजरामर करायचा होता. त्याच्या ह्या विचित्र वागण्याचा जितका त्रास त्याला झाला होता तितकाच नक्कीच रतीला ही झालेला होता ते तो जाणून होता.

पण कसं?

काय करावं?

त्याला काहीच सुचत नव्हतं.

तो डोळे मिटून स्टेअरींगवर डोकं ठेवून बसला होता इतक्यात खिडकीच्या काचेवर टकटक झाली म्हणून त्याने दचकून डोळे उघडून बघीतले आणि त्याला आश्चर्याचा धक्का बसला.

समोर राधा उभी होती.

“राधा.. तु??”, दार उघडून बाहेर येत कबीर म्हणाला..

“हो.. मी आले परत…”

“परत???? म्हणजे???”, कबीर संभ्रमात पडत म्हणाला..

“घाबरु नकोस.. परत म्हणजे तशी नाही परत आलेय मी.. परत म्हणजे.. मी उतरले पुनमच्या गाडीतून आणि परत आले.. काही सुचलं नसेल ना? रतीला कसं प्रपोज करायचं?”

कबीर कसनुसं हसला..

“मला माहीती होतं.. डोंन्ट वरी.. मी हेल्प करते तुला…”

“तु? तू कशी हेल्प करणार मला..”

“हे बघ.. टुरीझम इंडस्ट्रीमध्ये एक गोष्ट शिकले मी.. लोकांना त्यांच्या मुळ ठिकाणी जायला जास्ती आवडतं.. किंवा असं ठिकाणं जेथे त्यांच्या आठवणी असतात… तुझ्या बाबतीत..तुझी आणि रतीची पहीली भेट..”

“मला सांग.. तुझी आणि रतीची पहीली भेट कुठे आणि कशी झाली?”

“अं.. मॅरीएट मध्ये.. टॉप-फ्लोअरला, ‘पाशा’ रेस्तॉरंट आहे.. तेथे…”

“चं.. असं अर्धवट नाही.. मला सगळ हवंय पहील्यापासून.. तिने काय घातलं होतं.. कुठे बसला होतात.. सगळं.. बारीकसारीक तपशील हवेत…”

“ओके.. सांगतो..”, असं म्हणून कबीरने तो प्रसंग जश्याच्या तसा राधाला ऐकवला..

“पिवळी लिलीची फुलं.. अं.. मॅनेज होउ शकतील.. कॅम्पमध्ये एक फ्लॉवरीस्ट आहे.. रात्रभर चालु असतो तो.. तिनं काय घातलं होतं म्हणालास? मरून रंगाची साडी?? अं मला वाटतं.. तो त्यांचा ड्रेस-कोडंच असावा.. मॅरीएटचा.. ना?”

“मला काय माहीती.. मी थोडं नं तेथे काम करतो.. पण.. मला कळत नाहीए.. तुझ्या डोक्यात काय शिजतेय??”

“थांब रे.. डिस्टर्ब नको करुस…”

राधा आपल्याच विचारात मग्न होती, तर कबीर अस्वस्थपणे इकडून-तिकडे येरझाऱ्या घालत होता..

“गॉट इट.. चल.. मॅरीएटला जाऊ आपण..”, गाडीत बसत राधा म्हणाली..

“मला कळलं असतं तर…”, पण राधाने चिडून कबीरकडे बघीतलं तसं कबीर काही न बोलता गाडीत बसला.

“ठिके.. नाही विचारत.. पण हे सगळं तू का करतीएस..? इतकं चांगलं नसतं अगं कुणी ! आत्ताच आपला ब्रेक-अप झालाय आणि तू माझ्यासाठी.. रतीसाठी हे सगळं प्लॅन अरतीएस..”

“मग काय झालं..? हे बघ.. मी जेंव्हा इटलीवरून परत आले.. परत कश्याला.. तिकडे असतानाच तू जे फोटो पाठवत होतास.. त्यावरूनच मला कळत होतं की तुझ्या-आणि रतीमध्ये काही तरी आहे.. पण मी काय केलं?? कसलाही विचार न करता मी घुसले मध्ये तुमच्या दोघांच्या.. आणि तू ही वेड्यासारखा तिला सोडून आलास माझ्या मागे.. खरं सांगू? रती नसती ना.. तर कदाचित मी तुला लग्नाचं विचारलंही नसतं.. पण तिला तुझ्याबरोबर.. तुला तिच्याबरोबर बघून खूप जेलस फिल झालं.. वाटलं्.. आजवर जो इतके दिवस आपल्या मागे होता.. आज तो दुसऱ्या कुणाबरोबर.. ”

राधा काहीवेळ शांत झाली आणि मग एक दीर्घ उसासा घेऊन म्हणाली, “आपलं मन.. आपलं हृदय एक वेगळंच रसायन आहे रे.. ते कधी, कसं वागेल कुणीच सांगू शकत नाही ना.. तू मला गोकर्णला पोलिसांच्या तावडीतून सोडवलंस.. तेंव्हा मी तुला म्हणाले होते.. ‘आय ओ यु अ बिग थिंग..’ आज समज मी त्याची परतफ़ेड करतेय..”

“राधा.. कदाचित मी तुला समजण्यात कमी पडलो.. कधी कधी वाटायंच, तू खूप सेल्फ़ीश आहेस.. दुसऱ्याचा विचार न करता.. स्वतःला हवं ते, हवं तसं करणारी राधा.. पण आज तू मला खोटं ठरवंलस.. इतका त्याग.. कुणीच कुणासाठी करत नाही...”

“सेल्फ़ीश..? आहेचे मी.. पण आपण प्रेम करतो तेंव्हा फ़क्त स्वतःचा विचार काय कामाचा? अनुराग आणि माझ्या नात्यांत आम्ही दोघांनीही फ़क्त आपला-आपलाच विचार केला.. काय साध्य केलं आम्ही? काहीच नाही.. आज तुझा चेहरा बघ.. रात्री एक वाजता सुध्दा रतीकडे जायचं आहे ह्या विचारानेच किती खुश दिसतो आहेस तु.. तुझा हा आनंदच तर मी माझ्या प्रेमात जिंकलाय आज.. मग सेल्फ़ीश कशी नाही मी? आपण दोघं एकत्र असतो तर हा आनंद किती दिवस राहीला असता? अं..”

कबीर काही नं बोलता राधाकडे बघत होता..

काही क्षण शांततेत गेल्यावर त्याने बोलण्यासाठी तोंड उघडले, पण राधा आधीच त्याला म्हणाली.. “प्लिज काही बोलु नकोस. मला माहीती आहे.. तू काय बोलणारेस..आणि आत्ता मला अजून रडायची आज्जीब्बात इच्छा नाहीए.. सो लेट्स गो..”

कबीरने गाडी मॅरीएटकडे वळवली…

“ओके.. सो फ़र्स्ट थिंग फ़र्स्ट.. आपल्याला बघायचं आहे की मरून साडी मॅरीएटचा ड्रेसकोड आहे की नाही..”, राधा फोनवर काही तरी शोधता शोधता म्हणाली.. “त्यासाठी आपल्याला आधी मॅरीएटला जावं लागेल.. तो पर्यंत मी पिवळ्या लिलींचा बंदोबस्त करते…”

रात्रीचा मोकळा रस्ता.. त्यात कबीर अंगात वारं भरल्यासारखा उत्साहाने भरलेला होता. १२०च्या वेगाने तो पंधरा मिनिटांतच तो मॅरीएटपाशी पोहोचला..

“गाडी बाहेरच लाव, आपल्याला लगेच जायचं आहे..”, गाडीतून उतरत राधा म्हणाली..

“ओके..” असं म्हणून कबीरने कार रस्त्याच्या कडेलाच उभी केली आणि दोघंही पोर्चमधून आतमध्ये आले.

रिसेप्शनला नाईट-ड्युटीसाठी दोन तीन तरुण मुली त्या दिवशी रतीने घातली होती तश्शीच मरून रंगाची साडी नेसून बसल्या होता..

“दे टाळी..”, हात पुढे करत राधा म्हणाली..

“आता तरी सांगशील प्लिज.. विचार करून करून डोकं भणभणायला लागलेय..”, कबीर म्हणाला..

“सांगते.. आपण रतीला इकडे बोलवायचं आहे आत्ता…”, राधा रिसेप्शनकडे जात म्हणाली..

“आत्ता? अगं वेडी झालीएस का? रात्रीचा दीड वाजत आलाय..” मनगटातलं घड्याळ राधाच्या डोळयापुढे नाचवत कबीर म्हणाला.

पण राधाने त्याच्याकडे दुर्लक्ष केलं आणि ती रिसेप्शनला गेली..

“एक्सक्युज मी..”, टेबलावर आपली नेल-आर्टची बोटं वाजवत राधा म्हणाली..

“येस मॅम? हाऊ मे आय हेल्प यु?”, यांत्रीकी आवाजात समोरच्या तरुणीने विचारलं..

“अं.. तुमचं पाशा रेस्तॉं.. कधी पर्यंत चालु असतं..?”

“सॉरी मॅम.. इट्स क्लोज्ड नाऊ..”

“अं.. मिडनाईट बफ़े.. असतो ना चालू पण?”

“हो.. असतो चालू… पण १२-१च वेळ आहे त्याची…”

“अं.. फ़क्त तासाभरासाठी.. नाही का चालू करता येणार..”

“सॉरी मॅम.. किचन पण बंद झालं..”

“ठिके.. पण निदान कॉफ़ी.. चॉकलेट केक.. इतपत तरी मिळु शकेलच की..”

“सॉरी मॅम..”

“अं.. तुम्ही रतीला ओळखता?”

“रती? डे-शिफ़्टला असते ती ना? हो.. म्हणजे अगदी जवळची ओळख नाही.. पण माहीती आहे…”

“कुल.. तो मागे उभा आहे.. तो दिसतोय..?” कबीरकडे बोट दाखवत राधा म्हणाली..

“हम्म.. कोण आहे तो?”

“ही इज अ वेल नोन रायटर..कबीर.. आत्ताच त्याचं पुस्तकाचा पहीला भाग येऊन गेला.. इश्क..”

“रिअल्ली… येस्स.. मी वाचलं नाहीए ते पुस्तक.. पण ऐकलंय..”, एस्काईट होऊन ती तरूणी म्हणाली.. “बरं मग..?”

“तुम्ही जर पाशा एक तासभर चालु ठेवलंत.. तर त्याच्या पुस्तकाच्या पुढच्या भागाचं पब्लीकेशन तो मॅरीएटमध्ये करेल. बघा.. कित्ती पब्लीसीटी होईल…”

“पण.. त्याचा पाशाशी काय संबंध? आणि रतीचं काय?
“ही इज गोईंग टु प्रपोज रती टुनाईट..पाशामध्ये..”

“आत्ता? इतक्या उशीरा” वॉव्व.. हाउ रोमॅन्टीक अ‍ॅन्ड थ्रिल्लींग.. पण पाशामध्ये का?”

“आता ते सगळं तुला पुस्तकाचा पहीला आणि नंतर पब्लीश होणारा दुसरा भाग वाचल्यावर कळेल.. आणि नावं काय तुझं?” छातीला लावलेल्या छोट्याश्या बोर्डवरचं नाव वाचण्याचा प्रयत्न करत राधा म्हणाली..

“रोहीणी..”

“रोहीणी, इफ़ यु हेल्प हीम नाऊ.. तुझं नाव येईल त्या पुस्तकात.. धिस मोमेंट इज द क्लायमॅक्स.. अ‍ॅन्ड यु आर गोईंग टु प्ले अ व्हेरी इंपॉर्टंट रोल इन इट…”

राधाने योग्य जागी तिर मारला होता… रोहीणी विचारात पडली…

“मॅम.. मला परमीशन घ्यावी लागेल… आणि इतक्या रात्री आत्ता सरांना फोन करणं..”

“अगं कश्याची परमीशन? तुला फ़क्त चार दिवे लावायचे आहेत टेरेसवरचे.. थोड्या कॅन्डल्स.. दॅट्स इट.. कॉफ़ी.. चॉकलेट केक… हु केअर्स…”

“ओके डन मॅम.. हु केअर्स… आय विल अ‍ॅरेंज..”

“गुड.. आता दुसरं काम.. रतीला आत्ता फोन करायचा इथल्याच नंबरवरून आणि मी सांगते ते सांगायचं.. ओके?”

“येस्स मॅम..”

रोहीणीला एकुणच तो क्लायमॅक्स प्रसंग.. आपली महत्वाची भुमीका वगैरे आवडलं होतं.. ती राधा जे सांगेल ते सगळं करायला तयार होती..

राधाने तिला सगळं समजावून सांगीतलं आणि मग ती कबीरकडे गेली आणि म्हणाली.. “रती येईल.. तोपर्यंत आपण ते पिवळी लिली घेऊन येऊ.. चल..”

राधा आणि कबीर बाहेर पडले तेंव्हा रोहीणी रतीचा नंबर फ़िरवत होती.

रती झोपायचा अतोनात प्रयत्न करत होती, पण काही केल्या झोप लागतच नव्हती. शेवटी कॉफ़ी करावी म्हणून ती अंथरुणातून उठली तोच तिचा फोन वाजला. मॅरीएटचा नंबर बघून तिला आश्चर्यंच वाटलं..

“हॅल्लो?”

“हॅल्लो.. रती ना? मी रोहीणी बोलते.. मॅरीएट डेस्क..”

“हा रोहीणी.. काय झालं? इतक्या रात्री फोन केलास…”

“सॉरी यार.. तुझी झोपमोड केली.. पण कामच तसं महत्वाचं आहे…”

“हम्म.. इट्स ओके.. बोल..”

“रती.. अगं आत्ता सरांचा फोन आला होता.. इथे पाशामध्ये एका मराठी मुव्हीचा सिन शुट होणारे.. १०-१२ लोकांचा क्रु येणारे… तर तुला यावं लागेल इकडे .. जास्त वेळ नाही.. एक तासभर तरी..”

“आत्ता.. ?? अगं नाही जमायचं.. अर्धवट झोप झालीए…”

“सॉरी यार.. बट कान्ट हेल्प.. सर पण निघालेत यायला.. ते म्हणाले.. निट सपोर्ट करा त्यांना.. पाशा पण चालु केलंय आत्ता..”

“शट्ट यार.. काय मुर्खपणा आहे.. थांब मी बोलते सरांशी..”

“त्यांची बॅटरी डाऊन आहे.. ते ऑन-द-वेच आहेत.. म्हणून तर मी केला नं फोन… प्लिज.. तू ये ना.. नेमकी मेरी पण ऑफ़ आहे आज.. मी कॅब बुक करते तुझ्यासाठी.. तुझं आवरून होईपर्यंत येईल घरापाशी…”

रतीला तशीही झोप येत नव्हती.. शुटींग वगैरे तेव्हढीच करमणुक होईल म्हणून ती तयार झाली..

“हे बघ.. आणि रेग्युलर आपला ड्रेसच ए हा.. मरून साडी घालून ये… बाय फ़ॉर नाऊ.. आणि खरंच सॉरी…”

“नो प्रॉब्लेम डिअर… कॅबचा नंबर एस.एम.एस. कर.. बाय..”

रतीने खोलीतला लाईट लावला.. तोंडावर पाणी मारून फ्रेश झाली आणि हलकासा मेक-अप करून ती तयार झाली..

रतीच्या खोलीतल्या आवाजाने तिच्या आईला जाग आली होती.. ती वरती खोलीत काय गडबड बघायला आली..

“झोप आई तु.. काही विशेष नाही.. मी जरावेळ ऑफ़ीसला चालले आहे..”, असं म्हणून रतीने तिला थोडक्यात कल्पना दिली. तोपर्यंत कॅब दारापाशी येऊन थांबली होतीच..

“काळजी करु नकोस.. मी येते २ तासात.. झोप तु.. बाय..”, असं म्हणून रती घराबाहेर पडली..

“दादा.. जरा फ्रेश द्या की फुलं..”, कबीर त्या फ्लॉवरीस्टशी वाद घालत होता..

“अहो. फ्रेशच आहेत.. हे घ्या.. हे काढुन.. ही दोन घालतो झालं?”

इतक्यात राधाचा फोन वाजला..

“रती निघालीए घरातून.. कॅब मध्ये आहे..”, रोहीणी..

“मस्त.. फ़ार भारी काम केलंस तु.. आता ते वरचं…”, राधा

“येस्स.. लोकांना लावलंय कामाला.. बट यु बेटर हरी अप.. रती २० मिनीटांत पोहोचेल…”

“येस्स.. निघालोच आम्ही..”, असं म्हणून राधाने फोन ठेवून दिला..

“कबीर.. चल.. रती निघालीए घरून..”, कबीरला घाई करत राधा म्हणाली

“अगं हो.. पण ही फुल..”, कबीर..

“हायपर नको होऊस कबीर.. छान आहेत फुल… दादा.. एक मस्त रिबीन लावून टाका फुलांना…”, असं म्हणून राधाने पैसे दिले आणि फुलांचा गुच्छ घेऊन कबीरला ओढत गाडीत बसवले..

“चल लवकर.. तुमच्या मॅडम पोहोचायच्या आधी आपल्याला पोहोचायचं आहे..”

कबीरने गाडी वळवली आणि तो वेगाने मॅरीएटकडे निघाला..

कबीर-राधा पोर्चमध्ये पोहोचले तेंव्हा रोहीणी अस्वस्थपणे येरझाऱ्या घालत होती… “हाऊ मच मोर टाईम”, राधाने धावत धावतच जाऊन तिला गाठलं आणि विचारलं..

“जस्ट जि.पी.एस. चेक केलं.. जास्तीत जास्त ५ मिनिटं.. पोहोचतीच आहे कॅब..”, रोहीणी म्हणाली..

“ओके.. चल वरती बघु काय काय झालंय..”, राधा

कबीरला काहीही सुधरत नव्हते.. झपाटल्यासारखा तो नुसता राधाच्या मागून चालत होता.

तिघेही जणं लिफ़्टने अकराव्या मजल्यावरच्या टेरेसवर पोहोचले..

रंगेबीरंगी मंद दिव्यांच्या माळांनी पाशाचा टेरेस प्रकाशला होता.. बरोब्बर तेच टेबल जिथे रती आणि कबीर पहील्यांदा भेटले होते ते सजवले होते.. दोन कॅन्डल टेबलावर लावलेल्या होत्या..

“टेबलाची जागा हीच आहे ना?”, राधाने विचारले.. “येस.. येस्स. हीच जागा..”, कबीर मान डोलावत म्हणाला..

इतक्यात रोहीणीच्या वॉकी-टॉकीवर मेसेज आला.. “रोहीणी.. रती आलीए.. काय करु?”

रोहीणीने प्रश्नार्थक नजरेने राधाकडे बघीतले. “वरती यायला सांग…”, राधा खुणेनेच म्हणाली..

रोहीणीने तिला थंम्ब्स अपची खुण केली आणि तिने रतीला वर पाठवायला सांगीतले..

“ओके... कबीर.. तू इथे लपून बस.. रती आली की आम्ही तिला इथे बसायला सांगणारे... आणि आम्ही निघून गेलो की इट्स ऑल युअर्स.. तुला जे काय करायचं ते कर ओके..”, राधा भराभरा बोलत होती..

“राधा प्लिज.. मला तू हवीएस इथे.. तु.. तू थांब ना इथेच लपुन..”, कबीर म्हणाला..

“अरे वेडा एस का.. मला नाही बघायचंय तुमचं प्रणय.. आम्ही आपलं जातो... आणि हो.. रतीला कळता कामा नये.. मी इथे होते.. ओके??” रोहीणी आणि कबीरकडे बघत राधा म्हणाली...

“पण राधा...”

“गो...उद्या मला फोन करून सांग काय झालं..मी पळतेय घरी.. बाय अॅन्ड ऑल-द-बेस्ट”,.. टेरेसच्या लिफ़्टपाशी लिफ़्ट थांबल्याचा आवाज आला तसं राधा कबीरला दुसरीकडे ढकलत म्हणाली... आणि स्वतः सर्व्हीस लिफ़्टकडे निघून गेली..

कबीर थोड्याश्या अंधारलेल्या कोपऱ्यात उभं राहून बघत होता. लिफ़्टचा दार उघडून रती टेरेसवर आली तसं त्याच्या अंगावर सरसरून एक काटा आला.... त्या थंडीतही त्याचे कान.. हात.. पाय गरम झाले..

“रोहीणी.. बोल.. काय सिन आहे..”, रतीने रोहीणीला विचारले..

“हम्म.. २० मिनिटांत टीम पोहोचतेय त्यांची.. इथे टेरेसवरच करणारेत शुट... अं.. त्यांनी फ़्लोवर प्लॅन पाठवलाय तसं इथे मांडणी करायची आहे.. बरं झालं तू आलीस रती..मला सॉल्लीड टेंन्शन आलं होतं..”, रोहीणी म्हणाली..

“टेंन्शन? तू तर उगाचच हसती आहेस.. असं वाटलं मला...”

“हसतीए? नाही.. कुठे.. तेच.. टेंन्शनमुळे हसतीए..”, इकडे तिकडे बघत रोहीणी म्हणाली..

“वेअर्ड.. बर कुठे आहे फ़्लोअर प्लॅन..”

“डॅम्न.. मी डेस्कवरच विसरले.. एक मिनीट बस इथेच मी घेऊन येते…”

“आता तू कश्याला जातेस खाली.. वॉकीवर मेसेज दे ना…”

“नको.. कुणाला माहीत नाहीए.. कुठे ठेवलाय.. आलेच ५ मिनिटांत…”

“ओके..”

असं म्हणून रती ज्या दिशेला कबीर लपला होता तिकडे तोंड करून बसली..

“अं.. इकडे नाही.. इकडे बस…”, विरुध्द खुर्चीकडे बोट दाखवत रोहीणी म्हणाली.. “काय चाललंय.. इथे काय आणि तिथे काय..”, वैतागून उठून दुसऱ्या खुर्चीवर बसत रती म्हणाली..

रतीची आता कबीरकडे पाठ होती..

रोहीणीने हळुच अंदाजाने कबीरच्या दिशेने ऑल-द-बेस्टची खुण केली आणि ती लिफ़्टने निघून गेली..

त्या टेरेसवर आता रती आणि कबीरशिवाय दुसरं कोणीच नव्हते.. अकराव्या मजल्यावर असल्याने रात्रीच्या वेळी सुटलेल्या बेफ़ाम वाऱ्याचा आवाज कानांत भरत होता… रती आपले केस निट करण्यात मग्न होती.

कबीर दबक्या पावलांनी.. फुलांचा तो गुच्छ पाठीमागे लपवत.. त्याचा आवाज येणार नाही याची काळजी घेत रतीच्या अगदी जवळ गेला.. कबीरचं ह्रुदय सॉल्लीड धडधडत होते..

कबीर रतीच्या अगदी जवळ गेला आणि म्हणाला… “रती..”

रती खाड्कन दचकून उभी राहीली.. कबीरला समोर बघून तिला काही सुचेचनाच... "कबीर?? तू इथे??"

कबीरने पाठीमागे दडवलेला तो पिवळ्या लिलींचा गुच्छ तिच्या समोर धरला आणि म्हणाला.. "एकदा इथेच.. तू मला अश्याच पिवळ्या लिलींचा गुच्छ भेट म्हणून दिला होतास आठवतंय? हेच टेबल होतं ना ते??"

रतीचे डोळे विस्फ़ारले होते..

कबीर आपल्या गुडघ्यांवर ओणवा झाला..

"नो.. कबीर.. प्लिज..स्टॉप.. निट उभा रहा.. काय करतोएस..", दोन पावलं मागे सरकत रती म्हणाली..

"तेच.. जे मला खूप आधी करायला हवं होतं..", कबीर..

"नो कबीर.. यु आर आऊट ऑफ़ युअर माईंड.. हे.. हे सगळं.. तू घडवून आणलएस? इथे काही शुटींग वगैरे नाहीए.. हो ना?"

"हम्म.."

"धिस इज इन्सेन.. कबीर.. प्लिज उठ आणि घरी जा.. ४ दिवसांनी तुझं राधाबरोबर लग्न आहे.. विसरलाएस का?"

"लग्न आहे नाही.. होतं...", कबीर रतीच्या जवळ जात म्हणाला..

"होतं? म्हणजे.. कबीर.. तू लग्न मोडून आलाएस?", रती चिडून म्हणाली..

"नाही... राधा आणि मी एकमेकांच्या संमतीने मोडलेय..", कबीर "का? वेडे आहात का तुम्ही?.. राधाचा नंबर दे...आत्ताच्या आत्ता.. काही लग्न मोडलं वगैरे नाहिए..", मोकळे केस बांधत रती म्हणाली..

फोनसाठी पुढे केलेला रतीचा हात कबीरने सावकाश खाली केला.. मग दुसऱ्या हाताने.. तिने बांधलेले केस हळुवारपणे परत मोकळे सोडले.. “केस बांधत नको जाऊस प्लिज.. अशीच छान दिसतेस..”

“अरे काय चाल्लय.. कबीर लग्न काय खेळ आहे का रे.. असं कसं मोडलंत…” “आज नसतं मोडलं तर कधी ना कधी मोडलंच असतं रती.. ट्रस्ट मी.. मी एकट्याने नाही मोडलं.. खरं तर.. राधानेच स्वतःहून विचारलं मला तसं…” “कधी?”

मग कबीरने काही तासांपुर्वी घडलेला किस्सा तिला ऐकवला…

रती कबीर बोलत असताना टेबलावर डोक्याला हात लावून बसली होती..

“मग आता मी का? राधा नाही म्हणली तर मी.. आणि मी समजा नाही म्हणले तर? मग परत राधा? की मोनिका? की तिसरं अजून कोणी…”

कबीर रतीच्या समोर बसला…

“रती…माझ्याकडे बघ… काय दिसतंय तुला?”

“काहीच नाही.. कित्ती अंधार आहे इथे..”, कसंबसं हसत रती म्हणाली..

“मग तू नाही.. आता फ़क्त आणि फ़क्त तुच रती.. मला माहीत नाही मला काय झालंय.. राधा मला आवडायची.. आवडते.. पण तिच्याबरोबर मी आयुष्य नाही घालवु शकत.. मी खुप भरकटलो.. वाट्टेल ते निर्णय घेतले.. खुपजण घेतात.. पण कधीतरी आपल्याला जाणीव होतीच ना खऱ्या प्रेमाची…”, कबीर..

“हो? मग ही अशी अचानक कशी बुवा जाणीव झाली तुला?”, रती

“तू ते तंत्र-मंत्र शिकून आलीस बहुतेक विपश्यनेला जाऊन.. तेंव्हापासून जादु झालीए माझ्यावर... तू नसताना मी किती तडपलोए.. तुझ्यासाठी कित्ती आसुसलोय हे कदाचित कुणीच जाणु शकणार नाही...”

“कश्यावरून तू उद्या परत निर्णय बदलणार नाहीस?”, रतीने विचारले

“तुला शंका येण साहजिक आहे.. मी वागलोच आहे तसा.. पण तू वेळ घेऊ शकतेस.. पाहीजे तितका.. मी थांबेन तुझ्यासाठी.. तू माझी पाहीजे ती परीक्षा घे.. फ़क्त नाही म्हणु नकोस प्लिज...”

कबीर पुर्णपणे भावनाविवश झाला होता.. बोलताना त्याचा आवाज कापरा झाला.. तो रतीसमोर मान खाली घालून उभा राहीला..

रतीने त्याच्या हनुवटीला धरून त्याचा चेहरा सरळ केला आणि म्हणाली.. “तू मला इतकं तडपवलंस.. मग मी लगेच हो म्हणायचं का?”

कबीर काहीच बोलला नाही..

“कबीर.. राधाला दुखावलं नाहीस ना रे?”, रतीने विचारले

“बिलीव्ह मी रती.. म्युचुअल निर्णय आहे हा.. हवं तर उद्या तू राधाशी बोल उद्या आणि मग निर्णय घे..”

“नाही त्याची आवश्यकता नाही.. माझा विश्वास आहे तुझ्यावर... मी.. हो म्हणेन.. पण एका अटीवर...”

“मला तुझ्या सगळ्या अटी मान्य आहेत..”, कबीर क्षणाचाही विलंब न करता म्हणाला..

“अरे.. ऐक तरी आधी...”

“हम्म.. बोल..”

“लग्नानंतर नावं बदलतात ना तुमच्यात पण..”

“हम्म.. का?”

“लग्नानंतर मला पण माझं नाव बदलायचं आहे.. रती नाव बदलून राधा…चालेल?”

कबीरचे डोळे मोठ्ठे झाले…

“राधा कबीरची नाही झाली असं होता कामा नये.. राधा ही कबीरचीच होती.. मला माहीती आहे.. तू तिला कधीच विसरणार नाहीस.. आणि विसरु पण नकोस.. मलाही विसरायचं नाहीए.. आज तिने माझं आयुष्य मला परत दिलेय.. राधा-कबीर.. हेच नाव योग्य आहे.. बदलशील माझं नाव?”

कबीरने रतीला घट्ट कडकडून मिठी मारली..

“ए.. आधी प्रपोज कर निट.. “, कबीरला बाजुला ढकलत रती म्हणाली

कबीरने तो दिलेला फुलांचा गुच्छ हातात घेतला आणि पुन्हा गुडघ्यावर ओणवा उभा राहीला..

“अरे.. ती मगाशीच दिलीस ना फुलं? परत तेच गिफ़्ट.. कधी सुधारणार तु…”

“श्शsss…” कबीरने तिला शांत बसायची खुण केली..

“रती…”

“येस्स.. आय लव्ह यु.. आय लव्ह यु… आय लव्ह युssssss……”, मोठ्यांदा ओरडत रती म्हणाली..

रात्रीच्या त्या शांत अंधारात रतीचा तो आनंदाने भारलेला आवाजात आसमंतात भिनुन गेला…

कबीरने हातातली ती फुल हवेत उंच उडवली आणि रतीला मिठीमध्ये घेतले…

तिघांच्या ही डोळयांतून अश्रुंच्या धारा लागल्या होत्या.. रती, कबीर आणि ह्या दोघांपासून अनभिज्ञ, दूर अंधारात सर्व्हिस-लिफ़्टच्या कोनाड्यात लपून हे दृश्य पहात असलेल्या राधाच्या…

[समाप्त]

# अनिकेत समुद्र.




साहित्यिक या बिरुदाशी अगदी फ़टकून रहाणारं व्यक्तिमत्व.

पक्का पुणेकर. कादंबरीची सुरुवात कोरेगाव पार्कने केल्यानंतर कळलं असेलच. भरपूर वाचन, मराठी आणि इंग्लीश. आणि लेखनाची अनावर हौस. पण मराठीतील आजवरच्या कादंबऱ्यांच्या वाटेने न जाता आताच्या तरुण वर्गाच्या जीवनशैलीशी ओळख दाखवणारं त्याचं लेखन आहे. त्यांच्या कादंबऱ्यांचा वेग सुसाट असतो. कथानक अनपेक्षित वळणं घेत जातं. त्यामुळे तरुण वर्गात त्याचा स्वतःचा असा मोठा फ़ॅन वर्ग जगभरात झाला आहे. जगभरात. कारण त्याचं लेखन मुख्यतः ब्लॉग व ई माध्यमांतून प्रसिद्ध आहे.

व्यवसायाने संगणक अभियंता, पुण्यातीलच एका संगणक कंपनीत कार्यरत. फोटोग्राफ़ी आणि लेखनाची आवड जोपासायला आवडते. त्याचा ब्लॉग 'डोक्यात भुणभुणणारा मराठी भुंगा' (http://manaatale.wordpress.com) ला स्टार-माझा (आताचा एबीपी माझा) तर्फ़े पारीतोषक मिळाले होते.

संगणक अभियंता, सॉफ्टवेएर मधील किडे (Bugs) पकडण्याचे काम (Testing) करतो.

मनमिळावु (पुण्याच्या Standard ने), Happy-Go-Lucky, थोडास्सा उर्मट/आगाऊ, खाईन तर तुपाशी नाहीतर उपाशी या पठडीत मोडणारा. छोट्या छोट्या गोष्टींनी मन खट्टु करुन घेणारा आणी तितक्याच छोट्या गोष्टींमध्ये आनंद शोधणारा नवसाहित्यिक अनिकेत समुद्र.

# ई साहित्य प्रतिष्ठान

आता मराठी ई पुस्तकं तुम्ही www.esahity.com वरून डाऊनलोड करा. किंवा esahity@gmail.com ला कळवून मेल ने मिळवा. किंवा 7710980841 या नंबर ला Whatsapp करून पुस्तके whatsapp मार्गे मिळवा. किंवा ई साहित्यचे app.

https://play.google.com/store/apps/details?id=com.esahity.www.esahitybooks या लिंकवर उपलब्ध आहे. download करा.

आता ठरवलंय. मराठी पुस्तकांनी अवघं विश्व व्यापून टाकू. प्रत्येक मराठी सुशिक्षिताच्या मोबाईलमध्ये किमान पन्नास मराठी पुस्तकं असलीच पाहिजेत. प्रत्येक मराठी माणसाच्या!

तुमची साथ असेल तर सहज शक्य आहे हे... कृपया जास्तीत जास्त लोकांना यात सामिल करून घ्या.

टीम ई साहित्य

